# चित्तरंजन




मीमांसाभूषण

पुरुषोत्तम बाळकृष्ण साठे,

सब जज्ज, मेहेकर.

प्रथमावृत्ति—डिसेंबर १९३५.

किंमत १। रुपया

प्रकाशकः—

**यशवंत गोपाळ जोशी,**

८५४ सदाशिव, पेठ पुणे २.







मुद्रकः—

**श्रीपाद रघुनाथ राजगुरु,**

राजगुरु आणि कंपनीचा छापखान

५१३ शनवार, पुणें २.



नागपूरच्या ज्या विद्यालयांत मी चार वर्षें विद्यार्थी होतों, व ज्या विद्यालयांत असतांनाच मला लेखन-वाचनाची व वाङ्मयसेवा करण्याची गोडी लागली त्या **'हिस्लॉप कॉलेज'** या संस्थेस हें पुस्तक आदरपूर्वक मी अर्पण करीत आहें.

— **पुरुषोत्तम बाळकृष्ण साठे.**

# प्रस्तावना



मीं साधारणतः १९२२-२३ सालापासून गोष्टी लिहावयास सुरुवात केली. इ. स. १९२५ या वर्षी माझा पहिला कथासंग्रह "कथापंचक" या नांवानें प्रसिद्ध झाला. आज दहा वर्षांनंतर माझा हा दुसरा कथासंग्रह प्रसिद्ध होण्याचा योग येत आहे याबद्दल मला आनंद वाटत आहे.

या दहा वर्षांत माझ्या बऱ्याच स्फुट गोष्टी मराठींतील निरनिराळ्या मासिकांतून प्रसिद्ध झालेल्या आहेत. अशा गोष्टींपैकी कांहीं निवडक गोष्टी एकत्रित करून त्या पुस्तकरूपानें प्रसिद्ध कराव्यात अशी मला माझ्या कित्येक मित्रांनीं सूचना केली होती. मलाहि पण आपला असा दुसरा कथासंग्रह प्रसिद्ध व्हावा असें वाटत होतें. १९३३ सालीं हा संग्रह प्रसिद्ध होण्याचा योग आला होता, व त्या वेळीं मी या सर्व गोष्टी एकत्रित करून ठेविल्या होत्या; पण कांहीं कारणामुळें त्या वेळी हा संग्रह प्रसिद्ध होऊं शकला नाहीं.

यंदाच्या उन्हाळ्यांत मी पुण्यास गेलों असतांना माझे मित्र रा. ब्रह्मे यांनीं माझी व रा. रा. यशवंत गोपाळ जोशी यांची ओळख करून दिली. रा. जोशी यांनीं माझा कथासंग्रह प्रसिद्ध करण्याची इच्छा दर्शविली. रा. जोशी यांच्यासारखा कसलेला लेखक व प्रकाशक माझ्या गोष्टी प्रसिद्ध करावयास तयार आहे हें पाहून मला आनंद वाटला व मी त्यांना माझ्या गोष्टींचा संग्रह पुस्तकरूपानें प्रसिद्ध करण्यास मोठ्या खुषीनें सम्मति दिली. माझ्या या 'चित्तरंजना'चा हा असा इतिहास आहे.

सुटींतून परत आल्यावर हें पुस्तक प्रसिद्ध करण्याची माझी इच्छा तितकी उत्कट राहिली नाहीं. रा. जोशी यांनीं जर माझ्यामागें लकडा लावला नसता, तर कदाचित् हें पुस्तक यंदा प्रसिद्धहि झालें नसतें. रा. जोशी यांनीं पुस्तकप्रकाशनाची सर्वच जबाबदारी आपल्या शिरावर घेतली आणि म्हणूनच हें पुस्तक आज १९३५ या वर्षी वाचकांच्या हातीं पडत आहे.

स्वतःच्या कामाचा व्याप संभाळून लेखनाकडे लक्ष द्यावयास फारसा वेळ मिळत नाहीं. या पुस्तकांतील सर्वच कथा निरनिराळ्या वेळीं स्वतःच्या चित्ताचें

रंजन व्हावें याच उद्देशानें मी लिहिल्या; आणि म्हणून या कथासंग्रहाला "**चित्तरंजन**" हें नांव देण्याचे हें एक महत्त्वाचें कारण आहे.

या संग्रहांतील सर्वच कथा हेतुप्रधान आहेत. कलेच्या दृष्टीनें त्यांची योग्यता ठरविण्याचें काम वाचकांचें आहे.

**आंधळें प्रेम** व **सुखस्वप्न** या दोन गोष्टींची प्रस्तुत लेखकानेंच केलेलीं इंग्रजी रूपांतरें मद्रासच्या "**त्रिवेणी**" या नांवाच्या एका प्रग्ग्यात इंग्रजी द्वैमासिकांत प्रसिद्ध झालेलीं आहेत.

"**आईबापांची माया**" गोष्टीतील नायिका "माया" खरोखरीच दुर्दैवी आहे. तिच्या आईबापांचें तिच्यावर फारच प्रेम होतें, व मायेला सुख लाभावें म्हणून त्यांनी आपल्याकडून मायेला सुयोग्य वर पाहिला. पण मायेची सुखाची कल्पना व आईबापांची मायेच्या सुखाची कल्पना या फारच भिन्न असल्यामुळें व त्या तशा आहेत याची आईबापांना मुळींच जाणीव नसल्यामुळें आईबापांच्या भलेपणामुळेंच माया दुःखी झाली.

वरून कठोरपणानें वागणारा मनुष्य हाहि प्रेमळ असूं शकतो हें तत्त्व **फणसाचे गरे** या गोष्टींत सांगितले आहे. मनुष्याचा मोठेपणा हा त्याच्या खिशाच्या मोठेपणापेक्षां अंतःकरणाच्या मोठेपणावरच जास्त अवलंबून असतो ही गोष्ट **भिकारी कुबेर** या गोष्टींत सांगितलेली आहे.

पतिपत्नी अत्यंत सुस्वभावी जरी असली आणि त्यांच्या स्वभावांत जर साधर्म्य नसलें तर दोघांचेंहि आयुष्य दुःखमय होण्याचा कधीं कधी संभव असतो, ही गोष्ट "**तारिणी**" या गोष्टींत वाचकांचे पुढें मांडली आहे. लहानग्या तारिणीच्या बाललीलांनीं पतिपत्नींना दोघांनाहि एकच प्रेमविषय मिळाला; व त्यामुळें त्यांच्यांत स्वभाववैचित्र्यामुळे पडलेले अंतर पुढें नाहीसें झालें, अशा तऱ्हेचा या गोष्टीचा शेवट आहे.

सध्यां चोहोंकडे समाजसत्तावादाची लाट उसळली आहे. धानिक लोकांच्यामुळें गोरगरिबांचें फार नुकसान होतें अशीहि पण ओरड आहे. धनिक मनुष्य हा स्वभावतःच दुष्ट नाहीं; येवढेंच नव्हे, तर त्यानें कांहीं गोष्टी सद्धेतुपूर्वक केल्या व त्यांचा जर विपरित परिणाम झाला तर तो त्या धनिकाचा अपराध नव्हे, ही गोष्ट **पंखावाला** या गोष्टींत सांगितली आहे.

**भूगांवचा संभू** स्वभावतः पापी नव्हता व दुष्टहि नव्हता; पण तुरुंगांतून जाऊन आल्यामुळें व तुरुंगांतून सुटून आल्यावर त्याला पुन्हा अत्यंत कठोर-

पणानें वागविल्यामुळें संभू बहकला व पुन्हा तुरुंगांत गेला. मनुष्याच्या हातून जेव्हां गुन्हा होतो तेव्हां त्याच्या मुळाशीं कित्येक वेळां एखादा सामाजिक अन्याय असतो व गुन्हेगाराशीं सहानुभूतीचें वर्तन, त्याला सुधारविण्याचे जर प्रयत्न झाले तर तो मनुष्य सुधारूं शकतो हें तत्त्व या गोष्टींत वाचकांचेपुढें मांडण्यांत आलेलें आहे.

हिंदु कायद्याच्या सुधारणेसंबंधी सध्यां महाराष्ट्रांत बरीच चर्चा चालूं आहे. यासंबंधीं व्यवहारांत नेहमीं येणाऱ्या प्रश्नांवर कांहीं गोष्टी लिहाव्यात असें मला माझ्या कांहीं मित्रांनीं सुचविलें. अशा गोष्टींचा मला माझ्या धंद्यांत नित्य अनुभव येत असल्यामुळें मला ती कल्पना आवडली व त्याप्रमाणें मीं कांहीं गोष्टीहि लिहिल्या.

**विधवेचें जिणें** व **अन्यायी न्याय,** या दोन गोष्टी स्त्रियांच्या हक्कां-संबंधीं आहेत. स्त्रियांना वडिलार्जित इस्टेटींत जितके दिवस हक्क मिळत नाहींत, तितके दिवस स्त्रीपुरुषांच्या समान हक्काच्या गोष्टी व्यर्थ आहेत. आजचें जग हें अर्थशास्त्रीय आहे व आज ज्याला जगांत टिकावयाचें आहे त्याच्या स्वतःच्या मालकीची संपत्ति असावयाला पाहिजे. सध्यांच्या हिंदु कायद्यामुळें स्त्रियांना कसा त्रास होतो याची कल्पना वरील दोन गोष्टींवरून वाचकांना होऊं शकेल.

परलोकी आपल्याला अन्नपाणी देण्याकरिता मनुष्यानें मुलगा दत्तक घ्यावा व त्यानें याच जन्मीं बापाला अन्नपाण्याला महाग करावें, अशी विरोधाभासी उदाहरणें आपल्याला नेहमीं पहावयाला मिळतात. हिंदु धर्मातला दत्तक पुत्र हा आजच्या हिंदु कायद्यांतील दत्तक पुत्रापेक्षां अगदीं निराळा आहे. आजचा दत्तक पुत्र म्हणजे नुसता आयतोबा. पूर्वीच्या हिंदु धर्मशास्त्रांतील दत्तक पितरांना स्वर्गलोकीं अन्नपाणी देण्याकरतां व कुटुंबांतील धार्मिक गोष्टी पुढें चालविण्याकरतां घेतला जाई. आजचा दत्तक म्हणचे नुसता इस्टेटीचा फुकट्या मालक! आजच्या परिस्थितीत आतां दत्तकाची आवश्यकता मुळींच उरलेली नाहीं. इतकेंहि असलें तरी अजूनपर्यंत दत्तक घेतले जातच आहेत, व कोर्टातली पुढें उद्भवणारीं भांडणें ही चालूच आहेत. " **दत्तकपुत्र** " या गोष्टींत हीच गोष्ट वाचकांचेपुढें मांडली आहे.

**वांटणीचे दावे** भांडून शेवटी त्याचेपायीं घरांतील संपत्तीहि **बाहेर** जाते व सरतेशेवटीं वांटणीदारांत वैर मात्र शिल्लक राहतें असें आपण **नेहमीं** पाहतों. वांटणीचा दावा एकदा सुरू झाला, कीं तो कित्येक प्रसंगीं पिढ्यान्‌पिढ्या

चालतो व त्यांत एखाद्या वांटणीदाराच्या मनांत जर वांटणी लवकर व्हावी असे नसले, तर मग कांहीं विचार करावयासच नको. प्रस्तुत गोष्टींतील पितापुत्र प्रेमळ असल्यामुळें शेवटीं दावा आपसांतच मिटला आहे. या गोष्टीवरून वांटणीच्या दाव्यांत होणाऱ्या त्रासाची थोडीशी कल्पना वाचकांना होऊं शकेल.

कांहीं दिवसांपूर्वीं मीं His last command ही एक इंग्रजी गोष्ट वाचली. या गोष्टीच्या धर्तीवर **पैशाचे खेळ** ही गोष्ट लिहिली आहे. संपत्तीचा धूर डोळ्यांवर चढला म्हणजे मग चांगला मनुष्य सुद्धां चढेलपणानें वागूं लागतो व पैशाची धुंदी उतरली म्हणजे मग त्याची त्यालाच आपल्या वर्तनाची खंती वाटूं लागते ही गोष्ट **पैशाचे खेळ** या गोष्टींत प्रामुख्यानें सांगितली आहे.

**त्यांची नळू** ही एक इंग्रजी धाटणीची गोष्ट आहे. ह्या गोष्टीची कल्पना मला Childless या इंग्रजी गोष्टीवरून सुचली आहे. ही इंग्रजी वळणाची नळू वाचकांना आवडेल अशी मला आशा आहे. या गोष्टीची घडणहि Childless या गोष्टीच्या घडणीपेक्षां अगदीं निराळी आहे हें वाचकांच्या लक्षांत येईलच.

**रामराज्य** ही गोष्ट मी मुद्दाम 'मालवसाहित्या'च्या १९३४ साली प्रसिद्ध झालेल्या खास अंकाकरितां लिहिली होती. रामराज्याच्या जुन्या कथेचा नवीन तऱ्हेनें मीं या गोष्टीत अर्थ लावण्याचा प्रयत्न केलेला आहे.

दिवाळीचा खरा आनंद दिव्यांच्या लखलखाटांत नसून अंतःकरणांतील समाधानांत आहे हें तत्त्व **देवाची दिवाळी** या गोष्टीत गोविलें आहे. **काशी-ताईचा काशीवास** या गोष्टींत आपल्या मुलांबाळांतच काशीवासाच्या सुखाचा अनुभव घेणाऱ्या प्रेमळ आजीचे चित्र काढलें आहे. परमेश्वरापाशीं लहान-मोठा, गरीब श्रीमंत असा भेद नाहीं. आपल्या सर्वच लेंकरांवर तो सारखेंच प्रेम करतो, व परमेश्वरानें सर्वांना सारखेंच दिलें आहे अशा तऱ्हेची बापूसाहेबांची विचारसरणी वाचकांना **जगन्नाथाची कृपा** या गोष्टींत वाचावयाला सापडेल.

**लांच्छित चंद्रमा** ही नवीन गोष्ट या संग्रहांत घातली आहे. ह्या गोष्टीची कल्पना मला एका इंग्रजी गोष्टीवरून सुचली आहे. कोणत्याहि मनुष्यानें केलेलें कृत्य बरें आहे कीं वाईट आहे हें ठरवितांना आपण त्या मनुष्यानें तें कृत्य कोणत्या परिस्थितींत केलें व काय म्हणून केलें या गोष्टीकडे बहुशः दुर्लक्ष करतों. कोणत्याहि मनुष्याविरुद्ध आपलें मत बनविण्यापूर्वीं त्याचें म्हणणें काय आहे, व कोणत्या परिस्थितींत तो तसा वागला या गोष्टींचा प्रत्येक सहृदय

मनुष्यानें विचार करून नंतरच त्यानें आपलें मत बनविलें पाहिजे हें तत्त्व वरील गोष्टींत ग्रथित केलें आहे. "दुसऱ्या असहाय प्राण्याची अब्रू बचावण्याकरितां सर्व दोष आपल्यावर ओढवून घेणें व त्या बाबतींत होणारी जहरी लोकनिंदा शांतपणानें सहन करणे या गोष्टीला केवढ्या मोठ्या दगडी छातीची व प्रेमळ अंतःकरणाची जरूर आहे." या मोरोपंतांच्या विचारसरणींत पुष्कळच अर्थ आहे असें वाचकांना वाटेल अशी मला उमेद आहे.

माझ्याजवळील सर्व हस्तलिखितें गोळा करण्यापासून तों पुस्तक प्रसिद्ध करीपर्यंत सर्वच गोष्टींची जबाबदारी रा. जोशी यांनीं आपल्याकडे घेतली व तें काम उत्तम रीतीनें पार पाडलें याबद्दल मी त्यांचा फार आभारी आहें. रा. जोशी यांनीं ही जबाबदारी अंगावर घेतली नसती तर हें पुस्तक कदाचित् प्रसिद्धहि झालें नसतें.

नागपूर येथील हिस्लॉप कॉलेजांत अभ्यास करीत असतांना मला लेखन-वाचनाची गोडी लागली. यंदा माझ्या कॉलेजचा सुवर्णमहोत्सव ( Golden Jubilee ) आहे या वर्षी हें पुस्तक स्वतःच्या विद्यालयालाच अर्पण करावें अशी मला कल्पना सुचली, व त्याला हिस्लॉप कॉलेजचे प्रिन्सिपल रेव्हरेंड गार्डिनर ( Rev. Gardiner ) यांनीं मोठ्या आनंदानें सम्मति दिली याबद्दल मी रेव्हरेंड गार्डिनर यांचाहि आभारी आहें.

या पुस्तकप्रकाशनाचे बाबतींत ज्या लहानथोर व्यक्तींनीं मला प्रेमानें व प्रत्यक्ष किंवा अप्रत्यक्ष रीतीनें मदत केली त्या सर्वांचा मी आभारी आहें.

मेहेकर ( वऱ्हाड ),<br>ता. ४-१२-१९३५.

**पुरुषोत्तम बाळकृष्ण साठे**

## माझें प्रकाशन—

१ वळवांचे पाऊस ( कथासंग्रह )
श्री. वि. वि. बोकील — किंमत १। रुपया

२ पुनर्भेट भाग २ रा ( कथासंग्रह )
श्री. य. गो. जोशी — किंमत १ रुपया

३ दुर्दैवी मोहरे ( ऐतिहासिक चरित्रें )
श्री. वि. गं. लेले — किंमत १ रुपया

४ पैसाच पैसा ( सचित्र नाटक )
श्री. माधवराव जोशी — किंमत १ रुपया

५ जीवन-पथ ( कथासंग्रह )
श्री. एन्. एम्. केळकर — किंमत १ रुपया

६ आवडत्या गोष्टी ( ६१ लेखकांचा कथासंग्रह )
संपादक य. गो. जोशी — किंमत ३ रुपये

७ चित्तरंजन
श्री. पु. बा. साठे. — किंमत १। रुपया

८ फुलबाग ( कविता )
कवि इंदुकान्त. — किंमत १ रुपया

९ वायफळांचा मळा
लेखक—चिं. वि. जोशी. — किंमत २॥ रुपये

शिवाय सर्व तऱ्हेचीं पुस्तकें आर्डरप्रमाणे पाठविलीं जातील.

प्रकाशक—यशवंत गोपाळ जोशी,
८५४ सदाशिव पेठ, पुणें नं. २.

## माझें पुढील प्रकाशन—

१ पुनर्भेट भाग ३ रा ( २० गोष्टींचा संग्रह )

लेखक—श्री. य. गो. जोशी.

२ पांढरे ढग ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

लेखक—श्री. वि. स. खांडेकर.

३ हृदय आणि बटाटे ( स्वतंत्र सामाजिक कादंबरी )

श्री. य. गो. जोशी.

४ आवडत्या गोष्टी ( स्त्री लेखिकांच्या गोष्टींचा संग्रह )

# कथाक्रम







माधव सोमण ब्रदर्स,

१० बुधवार, हुजुरपागेसमोर, पुणें २.




# पैशाचे खेळ : : १

"काय माधवराव! नव्या खेळानं तुमच्या कंपनीला खूपच हात दिला आहे म्हणायचा! काय थिएटर भरलं आहे म्हणतां! तरी आजचा सहावा खेळ आहे हा!"

"आहे खरं बुवा असं!" माधवराव हंसत हंसत म्हणाले, "आजच्या सिनेमाच्या काळांत नाटक मंडळ्यांना पैसा मिळणं मुष्कीलच. त्यांतल्या त्यांत मोठमोठ्या नाटक मंडळ्यांनीं सीनसीनरीकरितां व नटांचे उत्तम संच जवळ ठेवण्याकरितां हजारों रुपये खर्च करायला सुरवात केल्यापासून आमच्यासारख्या लहान नाटक मंडळ्यांना तर जगणंच कठीण झालं आहे. त्यांतल्या त्यांत तुमच्या शहरांतले प्रेक्षक म्हणजे साऱ्या दुनियेंतले नाठाळ. कंपनीला पहिल्या महिन्यांत जेमतेम खर्च भागण्यापुरताच पैसा मिळाला. पण आम्हीं हा नवा खेळ लावला मात्र, आणि जी कांहीं गंमत झाली म्हणतां! अहो, लागोपाठ पहिल्या चार खेळांना नाटकाच्या आदल्या दिवशींच तिकिटं बंद करावीं लागलीं. आजचा हा सहावा खेळ आहे; पण गर्दी पहा कशी तुफान आहे ती! या खेळानं, गणपतराव, आमच्या कंपनीला असा वेळीं हात दिला आहे म्हणतां!"

"पण तुमचा हा खेळ एवढा लोकप्रिय व्हायचं कारण तरी काय माधवराव! गेल्या महिन्यांत मी मुळीं इथं नव्हतोंच. त्यामुळं मला तुमचं नाटक पहायला-वाचायलाहि मिळालं नाहीं."

" अहो, आमचा खेळ लोकप्रिय कां झाला, हें सर्व लोकांना सांगणं मला शक्य नाहीं. मला जर लोकांनीं विचारलं तर मी सांगेन कीं, आमच्या मालकांनीं हें नाटक बसवितांना फारच मेहनत घेतली आहे. पण तुम्हांला मात्र अगदीं खरं कारण सांगायला मला कांहींएक हरकत वाटत नाहीं."

" मग सांगा तर खरं ! " गणपतराव म्हणाले, " हं– घ्या, विडा घ्या."

माधवरावांनीं विडा आपल्या तोंडांत कोंबला व नंतर अगदीं हलक्या व बोबड्या आवाजांत ते बोलूं लागले.

" अहो, आमच्या कंपनींत एक नवीन नट आले आहेत. त्यांचं नांव जयंत देशमुख. देशमुख बी. ए. आहेत, व ते एखाद्या श्रीमंत घराण्यांतले असावेत असं त्यांच्या राहणीवरून व रुबाबावरून दिसतं. आपल्यासंबंधानं जास्त माहिती देण्याची मात्र त्यांची इच्छा नाहीं; व आम्हींहि जास्त चौकशी केली नाहीं. कंपनींत एकदोन वर्षं राहायचं व नंतर एल्एल्. बी.च्या परीक्षेला जायचं असा त्यांचा इरादा दिसतो. आमच्या या नव्या 'पैशाचा खेळ' या नाटकांत ते कुसुमाकराची म्हणजे नायकाची भूमिका करतात. आणि तुम्हांला खरं सांगायचं म्हटलं म्हणजे गणपतराव, जयंतांचं काम अगदीं 'ए वन्' होतं बघा ! जयंतांना आम्हीं कामाची फारशी तालीम दिलीच नाहीं, पण जयंत हे एक उपजतच नट दिसतात. इतकं काम चांगलं होतं कुसुमकराचं त्यांचं गणपतराव, कीं तुम्हांला काय सांगूं ? मला तर वाटतं गणपतराव, कीं गणपतराव जसे हॅम्लेटचं काम सहज रीतीनं करीत तितक्याच सहज रीतीनं व तितकंच चांगलं काम आमचे जयंत कुसुमाकराचं करतात."

" पण जयंतांचं हें काम इतकं चांगलं कां होतं बुवा ? " गणपतरावांनीं विचारलें.

" मला तें सांगतां येणार नाहीं. पण 'पैशाच्या खेळां'तलं कुसुमाकराचं काम म्हणजे त्यांचं हातखंड आहे. आपल्या भूमिकेशीं जयंत इतके समरस होतात कीं, आम्हां सर्वांनाच त्याचं आश्चर्य वाटूं लागतं. 'पैशाच्या खेळां'तील कुसुमाकर हा एक धनाढ्य व्यापाऱ्याचा मुलगा आहे. या नाटकांत पैशाच्या मोहानं मनुष्याच्या कोमल व उदार वृत्तीसुद्धां कशा बदलतात हें दाखवलं आहे; व या सर्व प्रकारानं कंटाळून जाऊन नाटकांतला कुसुमाकर आपल्या ऐश्वर्यावर लाथ मारून घराबाहेर पडतो, आणि गरिबीनं आणि स्वतंत्र धंदा करून दिवस काढूं लागतो, असं या नाटकाचं कथानक आहे."

" असा प्लॉट आहे एकूण !" गणपतराव म्हणाले, " बरं ! चला तर आपण रंगपटांत जाऊन तुमच्या जयंतांची गांठ घेऊं. आमची व जयंतांची ओळख तरी करून द्या माधवराव ! " गणपतराव म्हणाले.

" चला तर " माधवराव म्हणाले व ते दोघेहि मित्र रंगपटांत गेले.

वरील संवाद कोणांमध्यें चालला होता हें वाचकांच्या लक्षांत आलेंच असेल. माधवराव हे चित्तरंजन नाटक मंडळीचे मॅनेजर होते, व गणपतराव हे माधवरावांचे मित्र होते. 'पैशाचे खेळ' हें नाटक विक्रमपुरांत फारच लोकप्रिय झालें होतें; व त्याला कारण जयंतांचें अभिनयचातुर्य हें होतें. जयंतांच्या कामावर लोक बेहद्द खुष होऊन गेलेले होते; तसें म्हटलें तर जयंत हे नुकतेच नाटक मंडळींत आलेले होते, पण पैशाच्या खेळांतील त्यांचें कुसुमाकराचें काम म्हणजे अगदीं नंबर एकच्या दर्जाचें होतें असें नाटकाचे तज्ज्ञ लोकहि म्हणत. आजचा 'पैशाचा खेळ' या नाटकाचा सहावा प्रयोग होता.

* * *

" काय जयंत, झालं का रंगणं ? पहिली घंटा झाली बरं का ! "

" होय का ! बरं तर मग, मी अगदीं तयार आहें. मला जरा दहा मिनिटं विश्रान्ति घेऊं द्या. पहिल्या अंकांतला तिसरा प्रवेश माझा आहे. त्या वेळीं मला हांक मारा म्हणजे झालं."

जयंतांनीं रंगपटांतील आपल्या खोलीचें दार पुढें केलें व आरामखुर्चीवर अंग टाकलें. जयंतांना गाढ झोंप लागली. त्यांच्या गत आयुष्यांतील एकूण एक प्रसंग त्यांच्या मनःश्चक्षूंपुढें हलकें हलकें दिसूं लागले.

* * *

" खरंच सखूताई ! तुमचं हें नवं घर छान आहे, नाहीं ? भाडं दहा रुपये महिना, नाहीं का ? बेश केलं बाई तें जुनं घर सोडलंत. बरं, पण तुमचा बापू आहे तरी कुठं ! इतका गोड मुलगा आहे म्हणतां बापू ! आमच्या घरीं तर तो फारच आवडतो; आणि नेहमीं म्हणायचं होतं कीं, अप्पासाहेबांच्या बापूला आपली कमल द्यायची. घ्याल का आमच्या कमलला सून करून तुम्ही ? पहा बाई ! मुलगी अगदीं नक्षत्रासारखी आहे. चांगली चार यत्ता शिकलेली— आणखी तुम्ही म्हणाल तर तिला इंग्रजी शाळेंतदेखील घालूं."

" पण तुमची कमल आमच्या बापूला द्याल तरी कशी तुम्ही ! तुम्ही पगारदार माणसं. अगदीं पहिल्या तारखेला तुमच्या हातांत दीडशें रुपये येतात.

कसं झालं तरी आम्ही दुकानदार; महिन्याकांठीं सर्व दिवसभर दुकानावर बसून एखादा शेंकडा जर आम्हांला मिळाला तर आम्हांला अगदीं धन्य वाटतं. तुमच्यासारख्या श्रीमंतांची मुलगी आम्हां गरिबाच्या घरीं तुम्ही कशाला द्याल बाई! आमच्या घरांत तर सर्वच काम घरांत आहे. तुमच्या कमलला आमच्या घरीं सुख तरी कसं लागणार शान्ताक्का! शिवाय कमल आमच्या बापूपेक्षां सारी दोनच वर्षांनीं लहान आहे. मुलगी मोठी तेव्हां ती आमच्या बापूला मोठीच नाहीं का व्हायची?" सखूताई म्हणाल्या.

"कांहीं तरीच तुमचं बोलणं! मुलीच्या जातीला कामाचा का कधीं त्रास होतो! अहो, आमच्या घरांत जरी कमलला काम पडत नसलं तरी मीं तिला सगळं घरांतलं काम शिकवलं आहे बघा! तिला येऊंच द्या तुमच्या घरीं, अन् पहा गंमत! काम काम तें काय मेलं! हंसत हंसत आमची कमल सारं काम संपवून टाकील. आतां आमच्या कमलमधें अन् बापूमध्यें फारसं वयाचं अंतर नाहीं म्हणतां! नसूं द्या! नवराबायकोंत वयाचं बरंच अंतर पाहिजे असं थोडंच आहे. आतां माझंच पहा ना; माझ्या लग्नाच्या वेळीं मी होतें सहा वर्षांची, अन् त्या वेळीं इकडचं वय होतं सात. अन् आमचा संसार अगदीं चांगला चालला आहे. अहो, नवराबायको जरी सारख्या वयाचीं असलीं तरी नवराबायको तीं नवराबायको! बायको ही नेहमींच नवऱ्याच्या आज्ञेंत राहायची." शान्ताक्का म्हणाल्या.

"हो बाई, आहे खरं असं! बाकी माझ्याहि मनांत तुमच्या कमलनं या घराची मालकीण व्हावं असं आहे. पण मला वाटत होतं कीं, तुम्ही श्रीमंत तर आम्ही गरीब; तेव्हां हा योग कसा यायचा! आतां तुम्हीच म्हणालांत तेव्हां वादच मिटला, नाहीं का?"

"बरं होईल बाई आमची कमल या घराची मालकीण झाली तर. बरं, जातें मी आतां. करंडा करा बरं तेवढा कुंकवाचा! बरीच संध्याकाळ झाली, नाहीं! बोलूं लागलं कीं वेळ कसा जातो तो मेला समजतच नाहीं."

* * *

'बाकी अप्पासाहेब, नशीबवान बरं का तुम्ही. महायुद्ध सुरू झालं आणि तुम्हां रंगाच्या व्यापाऱ्यांचं उखळ पांढरं झालं. सर्व जगावर संकट आलं; पण तुम्हां रंगवाल्यांचा युद्धानं अलोट फायदा करून दिला अप्पासाहेब. दोन वर्षां-पूर्वीं तुम्ही एखाद्या लहानशा घरकुलांत राहत होतां, आणि तुमची प्राप्ती

महिन्याची शंभर रुपयांचीसुद्धां नव्हती. असं जर आतां कुणाला सांगितलं तर त्याला तें खरंसुद्धां वाटणार नाहीं. 'पुरुषस्य भाग्यं देवो न जानाति' असं म्हटलं आहे तें खरं आहे बुवा ?"

"तुम्ही कांहींहि म्हटलं दादासाहेब, तरी आम्हां रंगाच्या व्यापाऱ्यांना जो पैसा मिळाला आहे तो कांहीं निव्वळ नशिबानं हात दिल्यामुळंच मिळाला आहे असं नाहीं. अहो, डोळे उघडे ठेवून ज्यांनीं बाजार केला त्यांना फायदा झाला. रंगाचा भक्कमसा सांठा आम्हीं आमच्याजवळ ठेवला, कारण जगांतल्या राजकीय परिस्थितीचा आम्हीं अगोदरच अंदाज केला होता. युरोपांत महायुद्ध सुरू होणार व त्यांत इंग्लंडची व जर्मनीची कुस्ती जुंपणार हें आम्हीं अगोदरच भाकीत केलं होतं. जर्मन माल लढाईमुळं हिंदुस्थानांत यायचा थांबला, म्हणजे मग जर्मन रंगाला हिंदुस्थानांत खूप भाव येईल, हें जाणूनच जर्मन रंगांचा आम्हीं खूप सांठा आमच्या दुकानांत ठेवला. तसंच म्हटलं तर......"

"जाऊं द्या हो तें अप्पासाहेब. कोणत्याहि कारणानं लक्ष्मीची तुमच्यावर कृपा झाली यांत सर्व कांहीं झालं. कोणत्याहि कारणानं कां होईना तुम्हांला बरकत आली हें पाहून आमच्यासारख्या तुमच्या मित्रांना आनंदच होतो आहे. बरं पण अप्पासाहेब! आमच्या कमलला आतां कोणते विषय शिकवूं मी! हो! तुमच्या घराची मालकीण व्हायची ती! बापूचा व कमलचा जोडा बाकी दिसेल चांगला बरं का. तुमच्यासारख्या धनाढ्य घराण्यांत कमल पडायची, तेव्हां मला तिच्या शिक्षणाची नीट काळजी घेतलीच पाहिजे, नाहीं का?"

"मला वाटतं दादासाहेब, आपण या गोष्टीचा विचार जरा शान्तपणानंच करायला पाहिजे. तुमची कमल जर आमच्या घराची मालकीण होणार असली, तर तसं घडून येईलच. या साऱ्या योगायोगाच्या गोष्टी आहेत. पण आतांपासूनच जर आम्हीं वडील माणसांनीं अशा गोष्टीचा विचार करायला सुरवात केली तर त्याचा परिणाम मुलांच्या मनावर चांगला व्हायचा नाहीं. मी काय म्हणतों तें आलं का तुमच्या लक्षांत दादासाहेब?"

* * *

चि. बापूस अनेक आशीर्वाद,

आज मी तुला एका महत्त्वाच्या प्रश्नासंबंधानें पूर्ण लिहिणार आहें; व यासंबंधानें विचार करून तूं आपलें मत बनवावेंस असें मला वाटतें.

आपले पूर्वीचे शेजारी रा. दादासाहेब सहस्रबुद्धे हे पुणें येथें बदलून गेले

आहेत. तुझी व दादासाहेबांची चांगली ओळख आहे, व तूं त्यांच्याकडे बराचसा जातयेत असतोस असें माझ्या कानांवर आलें आहे. दादासाहेबांच्या घरीं तूं इतका कां जातोस हें समजणें कठीण नाहीं. त्यांची मुलगी कमल तेथें आहे व तूं कमलकरितांच तेथें जात असतोस हें मला समजतें.

तुझें व कमलचें लग्न व्हावें असें तुझ्या लहानपणीं सर्व लोक म्हणत असत. पण त्या बोलण्याकडे तूं लक्ष देऊं नकोस. आपण श्रीमंत आहोंत व आपले नातेवाईक श्रीमंतच असावयाला पाहिजेत. दादासाहेबांना सध्यां तीनशें रुपये दरमहा पगार मिळतो आहे. पण त्यांच्याच्यानें आपल्यासारख्या श्रीमंतांची बरोबरी होणें कधींहि शक्य नाहीं. त्यांच्याशीं जर आपला संबंध आला तर वरच्या दर्जाच्या समाजांत त्यांना घेऊन आपल्याला वावरतां येणार नाहीं. लग्न हा एक व्यवहार आहे; आणि लग्नाच्या बाबतींत प्रत्येक मनुष्यानें– त्यांतल्या त्यांत श्रीमंतांनीं– अत्यंत व्यावहारिक दृष्टीनेंच वागलें पाहिजे. श्रीमंत व गरीब यांचे संबंध दोघांनाहि त्रासदायक होतात.

ठाणें येथील प्रसिद्ध वकील रावबहादुर सरदेशपांडे तुला ऐकून माहिती असतीलच; त्यांची मुलगी विमल तुला सांगून आली आहे. तूं बी. ए. होतांच रावबहादुर तुला बॅरिस्टर होण्याकरितां विलायतेला पाठविणार आहेत. त्याचबरोबर दहा हजार रुपये हुंडाहि मिळणार आहे. विमल ही कमलपेक्षांहि थोडीशी सुस्वरूप आहे. तेव्हां तूं विमलशीं लग्न करण्याला तयार होशील अशी माझी खात्री आहे.

यापुढें कमलशीं असलेली तुझी ओळख तूं विसरून जा. तुझ्या आयुष्यांत तुला पुष्कळ मोठ्या गोष्टी करावयाच्या आहेत; व त्या वेळीं ही गरिबींतली पोर तुझ्या गळ्यांत नुसतें लोढणेंच होऊन बसेल.

लग्नाचा मुहूर्त कोणता ठरविला जाईल हें मी तुला पुढील पत्रांत कळवितों.

या पत्राबरोबर तुझ्या खर्चाकरितां दोनशें रुपये पाठवीत आहें.

तुझा
अप्पा

* * *

"बापूराव, मीं ऐकलं तें खरं का?"

"होय कमल! तें खरं आहे. बरं झालं तूंच हा प्रश्न काढलास. पुष्कळ दिवसांपासून मी तुझ्याशीं या विषयासंबंधानं बोलेन असं म्हणत होतों; पण

मला धीरच होईना कमल! तुझ्याशीं माझं लग्न व्हायचं असं आपल्या घरांतली सर्व मंडळी नेहमीं म्हणत व पुण्यास तुम्ही आल्यानंतर आपलं लग्न व्हावं असं मलाहि वाटूं लागलं होतं. पण या बाबतींत आमच्या अप्पांचं व माझं बोलणं झालं व तेव्हांपासून आपलं लग्न जर झालं तर त्यापासून आपल्या दोघांनाहि सुख होणार नाहीं असं मलाहि वाटूं लागलं!"

"तें कां?"

"कारण आपल्या दोघांच्याहि दर्जामधें फरक आहे. आजपर्यंतचं तुझं आयुष्य गरिबींत गेलेलं असल्यामुळं तुला श्रीमंती राहणीचा कंटाळा आहे. पण तशा तऱ्हेनं तूं जर न राहिलीस तर वरच्या दर्जाच्या समाजांत तुला कोणी चांगलं म्हणणार नाहीं. तेव्हां एक तर तुला आपलीं मतं वगैरे सारीं गुंडाळून ठेवावीं लागतील, नाहींतर तुझ्यामुळं आम्हांला नेहमीं खालीं पाहण्याचा प्रसंग येत जाईल. सारांश, दोन्ही गोष्टी वाईटच."

"पुरे-पुरे बापूराव! तुम्ही इतके कठोर व्हाल अशी मला कल्पनाहि नव्हती. आज तुम्ही श्रीमंतीच्या येवढ्या गोष्टी सांगतां पण तुमच्या लहानपणीं तुमची काय स्थिति होती हें मात्र तुम्ही विसरतां. असो! पैशाच्या जोरावर आज तुम्ही माझ्या प्रेमाचा असा विचका केलात,—पण सर्वच दिवस सारखे नसतात हें विसरूं नका."

"मला वाटतं, कमल, आपलं संभाषण इथंच थांबलं पाहिजे. हे सारे पैशाचे खेळ आहेत ही गोष्ट मला कबूल आहे; पण तो पैसा आज आमच्याजवळ आहे ही गोष्ट तितकीच खरी आहे. आतां यापुढं आपली गांठ जर पडली तर......"

"ती कोणत्या परिस्थितींत पडेल ती पडो, पण तुम्हीं पैशाच्या जोरावर मला दुखविलं आहे, हें मी केव्हांहि विसरणार नाहीं. बरं आहे, नमस्कार बापूराव."

"नमस्कार मिस् सहस्रबुद्धे."

* * *

रा. रा. दादासाहेब सहस्रबुद्धे यांस,

सा. न. वि. वि.

आमचे येथें श्रीलक्ष्मीकृपेंकरून आमचे चिरंजीव बापूसाहेब यांचा विवाह ठाणें येथील सुप्रसिद्ध वकील रावबहादुर सरदेशपांडे यांची कन्या

कु. विमलाबाई इच्याशीं करण्याचें योजलें आहे. कार्य ता. ८ माहे मे सन १९१९ रोजीं संध्याकाळीं गोरज मुहूर्तावर गांवदेवीवरच्या आमच्या बंगल्यावर होईल. तरी आपण सहकुटुंब सहपरिवारें येऊन कार्यसिद्धि करावी. आपण आल्यानें आम्हांस विशेष आनंद होईल. कळावें,

आपला कृपाकांक्षी

**अप्पासाहेब देशमुख**

* * *

तुला विलायतेला जाऊन आतां चार महिने पुरे झाले आहेत, व तुझा तेथें नीट जम बसला आहे हें ऐकून बरें वाटले. तूं नेटानें अभ्यास करावयाला पाहिजेस. तेथें जाऊन तूं फारच सेन्टिमेंटल व्हावयाला लागला आहेस हें चांगलें नाहीं. चि. विमल सांगत होती कीं, विलायतेंत श्रीमंत लोक व गरीब लोक यांच्या जवळ जवळ जातीच झाल्या आहेत असें तूं तिला लिहिलें आहेस. अरे, जग हें असेंच चालावयाचें. पैसा आहे म्हणूनच हें जग चाललें आहे. तूं विलायतेला गेला आहेस हाहि पैशाचाच खेळ नव्हे का! अभ्यास लक्ष-पूर्वक कर.

तुझ्या आईची प्रकृति ठीक नाहीं. तिला मीं हवापालट करण्याकरितां पांचगणीला पाठविली आहे. चि. विमलहि उद्यां तेथें जाईल.

तूं येथून गेल्यावर एकाच महिन्यांत दादासाहेब सहस्रबुद्धे वारले. त्यांच्या मुलीच्या लग्नाचें कोठें जुळलें नाहीं. आतां ती परिचारिका होणार आहे असें ऐकतों.

तुझा

**अप्पासाहेब**

* * *

पांचगणी

आपल्याला फार दुःखाची गोष्ट मला कळवावी लागत आहे. गेले पंधरा दिवस ती० सौ० सासूबाईंची प्रकृति ठीक नव्हती. मामंजींना मीं येथें येण्याकरितां तार केली होती; पण कोणच्याशा संस्थेच्या वार्षिक सभेची तारीख जवळ आलेली असल्यामुळें व त्या संस्थेचे अध्यक्ष ती० मामंजीच असल्यामुळें त्यांना येतां येणें शक्य नाहीं, अशी मला उलट तार आली. चार दिवसांपूर्वी ती० सासूबाईंनीं आपली फारच आठवण केली, व आपली भेट आतां होणें शक्य नाहीं

असें त्या म्हणाल्या. मला त्यांनीं अगदीं पोटाशीं घेतलें व आपली काळजी घेण्याविषयीं त्यांनीं मला बजावून सांगितलें. पैसा वाटेल तितका येईल व जाईल, पण प्रेम पैशानें मिळत नाहीं व गरिबींत नाहींसें होत नाहीं असें त्या म्हणाल्या. ती० सासूबाईनीं मला अगदीं मुलीसारखें वागविलें. लग्नापूर्वी सासू म्हटली कीं, माझ्या अंगावर भीतीनें कांटा उभा राहत असे; पण आपल्या घराची मी मालकीण झाल्यावर व ती० सासूबाईच्या हाताखालीं कांहीं दिवस राहिल्यावर मला ती० सासूबाई माझ्या आईपेक्षांहि प्रेमळ वाटूं लागल्या. ती० सासूबाईच्या प्रेमळ छत्राखालीं आणखी कांहीं दिवस काढावयाचें मात्र माझ्या नशिबीं नव्हतें. परवां रात्रीं त्यांची प्रकृति एकदम जास्त बिघडली. डॉक्टर मिस् फर्नांडिस व डॉक्टर देवकीनंदन दोघेंहि रात्रभर ती० सासूबाईच्या जवळ बसलीं होतीं. त्यांनीं आपल्याकडून आपल्या कौशल्याची पराकाष्ठा केली; पण जेथें आयुष्याचीच दोरी तुटली तेथें मनुष्याचें काय चालणार? पैशाचे खेळ चालतात कुठवर, तर परमेश्वर ते चालूं देतो तेथपर्यंत. पैसा फार तर चैनीकरितां उपयोगी पडतो; पण जिथें देवाजीच्या मनांत दुसरेंच कांहीं तरी येतें, तिथें पैसा कांहींच उपयोगी पडूं शकत नाहीं. असो.

काल पहाटे ती० सासूबाई परलोकवासी झाल्या. मामंजींची भेट व्हावी असें त्यांना पुष्कळ वाटत होतें; पण देवानें त्यांची ती इच्छा पूर्ण केली नाहीं.

येथली आवराआवर करून मी कांहीं दिवस ठाण्याला जाणार आहें. ती० सासूबाई गेल्यामुळें मला फारच उदास वाटतें आहे. आपल्याला तर फारच त्रास होईल ही गोष्ट ऐकून. तरीपण प्रकृतीची नीट काळजी घ्यावी व दर मेलला पत्र पाठवीत असावें.

आपली आज्ञांकित
**विमल**

* * *

"काय हो परांजपे! मी आपल्या अप्पासाहेब देशमुखांच्यासंबंधानं कांहीं ऐकतों तें खरं कीं काय?"

"म्हणजे असं ऐकलं तरी काय बापट तुम्हीं?"

"मीं ऐकलं कीं, अप्पासाहेब पुन्हा लग्न करणार आहेत म्हणे!"

"होय. मग त्यांत येवढं आश्चर्य वाटण्याजोगं असं काय आहे? अप्पासाहेबांचं वय असेल सारें ४५–५० पर्यंत. पहिली बायको नुकतीच वारलेली,

संपात्ति गडगंज. मग अशा स्थितींत त्यांनीं पुन्हा लग्न करायचं ठरवलं तर त्यांत वावगं काय झालं ?"

"तें एक असो म्हणा! पण मी ऐकतों कीं, अप्पासाहेबांचं लग्न मुंबईच्या कोणी मिस् सहस्रबुद्धे म्हणून एक नर्स आहेत त्यांच्याशीं व्हायचं आहे."

"होय, तेंहि खरं आहे; पण त्यांत हो काय वावगं आहे ?"

"वाहवा! अहो, ह्याच मिस् सहस्रबुद्धे म्हणजे अप्पासाहेबांच्या अगदीं जीवश्चकंठश्च मित्राची मुलगी ना? आम्ही तर ऐकत होतों कीं, ह्या मुलीचं लग्न पहिल्या प्रथम अप्पासाहेबांच्या मुलाशीं व्हायचं होतं."

"मग त्यांत काय झालं? अप्पासाहेब जेव्हां गरीब होते त्या वेळीं बापूरावांच्या लग्नाच्या गोष्टी थट्टेंत होत असतील; म्हणून त्या कोणी पुढं खऱ्या मानतात का? अप्पासाहेब पूर्वीं गरीब होते त्या वेळीं त्यांना दादासाहेबांची मुलगी सून म्हणून चालली असती; पण पुढं अप्पासाहेब श्रीमंत झाले तेव्हां त्यांना गरिबाची मुलगी सून म्हणून कशी चालूं शकणार ?"

"तें खरं, पण आतां तेच स्वतः त्या मुलीशी लग्न करायला कसे तयार झाले आहेत हो?"

"अहो, आतां ते इतके श्रीमंत आहेत कीं, त्यांना आतां पैशाची किमत नाहीं. त्यांना सुंदर बायको पाहिजे आहे व मिस् सहस्रबुद्ध्यांना श्रीमंत नवरा पाहिजे आहे. झालं तर मग. मिया-बिबी राजी झालीं मग आतां बाकीच्यांची काय हरकत असावी बुवा ?"

"आहे खरं बुवा असं. सारे पैशाचे खेळ आहेत हे. बरं, पण मला लवकर घरीं जायला पाहिजे. त्या एल्फिन्स्टनच्या परेराशीं मीं अपॉइंटमेंट केली आहे. पण काय हो परांजपे, तुम्हीं ही गोष्ट बापूरावांना कळवली काय ?"

"होय! मी त्यांना गेल्या मेललाच कार्ड लिहिलं आहे. ही हकीकत वाचून त्यांच्या मनाला फार त्रास होईल, नाहीं? गरीब बिचारा! बरं आहे, नमस्कार."

* * *

हिंदुस्थानांतून गेल्या दोन आठवड्यांत जीं कांहीं पत्रें आलीं त्यांनीं माझ्या मनाला फारच त्रास होत आहे. आपण माझे वडील आहांत, व गेल्या पत्रांत आपण मला अत्यंत सविस्तर अशी हकीकत लिहिली आहे, याबद्दल मी आपला

फारच आभारी आहें. आपण मला अभ्यासाकडे लक्ष देण्याविषयीं लिहितां, पण माझ्या मनाला सध्यां काय यातना होत असतील याची आपल्याला कल्पनाहि होणें शक्य नाहीं. आज चार दिवस परिस्थितीचा मीं खूप विचार केला– अगदीं डोकें फुटून जाईपर्यंत विचार केला– व शेवटीं ठरविलें कीं, आतां यापुढें विलायतेंत राहण्यांत अर्थ नाहीं. गेलीं दोन वर्षें मी विलायतेंत राहिलों, पण आतां माझ्याच्यानें येथे अभ्यास होणें शक्य नाहीं. म्हणून मी पुढच्याच मेलनें परत यावयाला निघतों आहे. मी बॅरिस्टर व्हावें अशी आपली इच्छा होती; पण तसे व्हावयाचें नव्हतें. प्रत्येक गोष्ट थोडीच आपल्या मनाप्रमाणें होत असते ? असो. येथील आवराआवर करून लगेच निघतो. बोटींत बसल्यावर तार करीन. नूतन मातोश्रींस माझे साष्टांग नमस्कार सांगावेत.

आपला आज्ञाधारक

**बापू**

* * *

“ जगाचा मला अत्यंत कटु अनुभव आला आहे विमल, आणि म्हणून प्रत्येक गोष्टीकडे संशयपूर्वक पाहण्याचीच मला इच्छा होते. तूं श्रीमंताची मुलगी आहेस, आणि म्हणूनच मला तुझी भीति वाटते आहे. तुला कष्ट सोसायची संवय नाहीं, आणि यापुढं जर तुला माझ्याबरोबर चलायचं असलं तर गरिबींतच तुला दिवस काढावे लागतील.”

“ पण वडिलांच्या पैशानं आपलं असं नुकसान तरी काय केलं आहे म्हणतें मी ? ”

“ माझं काय नुकसान केलं आहे हें मी तुला शब्दानं सांगूं शकत नाहीं, विमल. पण पैशानं केलेला हा धुमाकूळ पाहिला म्हणजे असं वाटतं, कीं ह्याच्यापासून दूर कुठं तरी बसावं जंगलांत जाऊन. जंगलांत हिंस्र पशु असतील, पण पैशाच्या जोरावर माणुसकी सोडणारीं माणसं तिथं नसतील हा काय थोडा फायदा आहे ? ”

“ आपण मनाला फारच लावून घेतां आहांत. आपण जरा शान्तपणानं विचार करावा व नंतर काय करायचं तें ठरवावं. आपले वडील व माझे बाबा आपल्याला जरूर मदत करतील.”

“ विमल ! मी मनाला उगीचच्या उगीच त्रास करून घेतों आहें असं का तुला वाटतं ? नाहीं–विमल, तसं नाहीं. मी कोणालाहि दोष देत नाहीं. मीं

स्वतःच दोषी आहें. अप्पासाहेबांना एकदम पैसा मिळाला व त्यांची श्रीमंती माझ्या अंगांत आली. आपल्या श्रीमंतीच्या तोऱ्यांत मीं कमलशीं लग्न करण्याचं नाकारलं आणि......"

"...तरीपण तिनं माझा इतक्या भयंकर रीतीनं सूड घ्यायचा नव्हता. दादासाहेबांची मुलगी आमच्या घराची मालकीण झाली खरी, पण ती किती वेगळ्या रीतीनं ? परमेश्वरा ! किती कठोरपणानं मला तूं शिक्षा केली आहेस ही ! "

" हें पहा ! माझं ऐकायचं आहे का थोडंसं ? आपली दृष्टि जर पैशानं धुंद झाली नसती तर आपली व माझी जन्माची गांठहि पडली नसती. झालं तें झालं. प्रत्येक मनुष्याच्या हातून चुका होतात, पण त्या दुरुस्त करण्याचं तरी मनुष्याच्या हातीं असतं ना ? झालं तर मग ! पैशाच्या या राक्षसी खेळांचा आपल्याला फार कडू अनुभव आला, तेव्हां त्याच्यापासून आपण आतां दूर जाऊं या. आपण येथून जाऊं व कुठंहि गरिबीनं दिवस काढूं. पहा बरं मी कसा संसार ठाकठिकीनं करते ती. बायकांना पैसा पाहिजे असतो, पण त्याहि-पेक्षां आम्हीं पतिप्रेमाच्या जास्त भुकेल्या असतों."

" विमल ! मीं चित्तरंजन नाटक मंडळींत जायचं ठरविलं आहे. इथं कॉलेजमध्यें असतांना संमेलनांतलि नाटकांत मी काम करीत असे. माझ्या मित्रांनीं मला कंपनींत जायला सांगितलं आहे, व मलाहि ती कल्पना पसंत आहे. एक-दोन वर्षं मी कंपनींत राहीन, थोडासा पैसा सांचतांच मी एल्‌एल्. बी.चा अभ्यास सुरू करीन. आहे का ही कल्पना तुला पसंत, विमल ? "

" आपल्याला ही कल्पना पसंत आहे ना ? मग झालं तर ! आपण उत्तम नट आहांत, तेव्हां रंगभूमीवर आपण खात्रीनं कीर्ति कमवाल; आणि थोडेसे पैसे सांचल्यावर आपण एल् एल्. बी. होणार हेंहि बरंच. मीहि येतें आपल्याबरोबर. अगदीं दृष्ट लागण्यासारखा आपला संसार होईल हो ! आईनं मला घरांतलीं साऽरीं कामं शिकवलीं आहेत."

" विमल ! "

" काय नाथ ! इश्श, हें काय हें भलतंच ! कोणी पाहील ना ! सोडावं गडे मला ! असं काय तें !...."

* * *

" अहो जयंत, उठा कीं, दुसरा प्रवेश संपत आला, तिसरा प्रवेश तुमचाच. हें घ्या पत्र आलं आहे तें, अन् तयार व्हा कामाला. बरं पण तें असो, ह्या गणपतरावांची व तुमची ओळख करून देतों. हे गणपतराव आपल्या कंपनीचे एक मित्र आहेत."

" असें ! " बापूराव म्हणाले व आदरपूर्वक त्यांनीं गणपतरावांना नमस्कार केला.

" आणि हे आमचे मुख्य नट जयंत देशमुख. यांना बापूराव असंहि म्हणतात. 'पैशाच्या खेळां'त हे कुसुमाकराचं काम करतात."

गणपतरावांनीं बापूरावांना नमस्कार केला व म्हटलें, " आपली कीर्ति मीं पुष्कळ ऐकली आहे, पण आज आपल्या भेटीचा योग आला."

घंटा वाजली. तिसरा प्रवेश सुरू झाला. 'हे सारे पैशाचे खेळ' असें म्हणत कुसुमाकरानें रंगभूमीवर प्रवेश केला. टाळ्यांच्या कडकडाटानें चिकार भरलेल्या प्रेक्षकसमुदायानें कुसुमाकराचें रंगभूमीवर स्वागत केलें.



# देवाची दिवाळी : : २

देवगांवच्या गोपाळकृष्णाचें मंदिर फारच प्रसिद्ध. सुमारें पन्नास वर्षांपूर्वी तें बांधलें गेलें. त्या वेळीं गोपाळशेठजींनीं तें मंदिर बांधलें. गोपाळशेठ देवगांवीं जेव्हां आले तेव्हां अगदीं निष्कांचन स्थितींत होते; पण काटकसरीनें राहून व 'खूप शर्थीनें बेपार करून' तें खूप गबर झाले. पैसा खूप मिळाला, पण शेठजी दुःखीच राहिले.

शेठजींना संतान नसल्यामुळें त्यांना फार षाईट वाटे. शेवटीं गोपाळशेठना परमेश्वराच्या कृपेनें म्हातारपणीं पुत्रसंतान झालें. या आनंदाप्रीत्यर्थ शेठजींनीं कित्येक हजार रुपये खर्चून हें गोपाळकृष्णमंदिर बांधलें होतें. मंदिराचा खर्च चांगल्या तऱ्हेनें चालावा म्हणून शेठजींनीं बरीच मोठी रक्कम बाजूला काढून ठेवली होती. या रकमेच्या व्याजांतून दिवाळींत या मंदिरांत दीपोत्सव होत असे, व लक्ष्मीपूजनाच्या दिवशीं मोठा भंडारा होत असे. ही सर्व व्यवस्था देवळाची पंचकमिटी करीत असे.

गोपाळशेठजींनीं आपल्या पैशानें देवाचा खुप इतजाम केला होता; पण दुसऱ्याहि लोकांनीं मंदिराला जमिनी दिल्या होत्या व रोख रक्कमहि दिली होती. आजच्या घटकेला गोपाळकृष्णाचे मंदिर हें एक संस्थान झालें होतें.

यंदाचा गोपाळकृष्णाच्या मंदिरांतील उत्सव फार मोठ्या प्रमाणावर व्हावयाचा होता. गोपाळशेठचे भाऊ किसनशेठ यांना याच वर्षापासून बेंच मॅजिस्ट्रेटचे अधिकार मिळाले होते. त्याप्रमाणें मोतीगिराच्या मुकादम्यांत त्यांना यंदाच यश आलेलें असल्यामुळें शेठजी फारच खुष झाले होते.

आजच्या भंडाऱ्याकरितां देवळाच्या भव्य आवारांत मोठा शामियाना ठोकला होता. या शामियान्यांत गांवांतील शेठ, सावकार, वकील, डॉक्टर, सरकारी अधिकारी वगैरे प्रतिष्ठित लोक बसावयाचे होते. उरलेल्या जागेंत मोठा मांडव दिलेला होता, व त्यांत इतरेजनांची सोय केलेली होती.

देवाला दोनप्रहरीं नैवेद्य व्हावयाचा होता. शेठजी आपल्या 'व्हिपेट' मधून मंदिरांत दाखल झाले. हळूहळू एकामागून एक मोटारी येऊं लागल्या.

प्रान्तसाहेब आले, रावबहादुर दीक्षित व रावसाहेब अमृतेहि आले. वेदशास्त्रसंपन्न विद्याधरशास्त्री जरीकांठी पितांबर नेसून तयारच होते.

आरती सुरू झाली; निरांजनें लागलीं; अगरबत्त्यांचा घमघमाट चोहोंकडे पसरला. टाळ, मृदंग व झांजा वाजूं लागल्या. सर्व मोठाले लोक देवाच्या मूर्तीपुढें उभे राहिले.

"जयदेव जयदेव जय गोपाळकृष्ण" विद्याधरशास्त्री गाऊं लागले. वाद्यांचा गजर सुरू झाला, व या गजरामुळें देवळांत आरती सुरू झाली आहे असें मांडवांत व मांडवाच्या बाहेर झाडाखालीं बसलेल्या इतरेजनांना समजून आलें.

आरती झाली. मंडळींनीं प्रसाद घेतला. पंगती बसल्या. जिलब्यांचा आग्रह सुरू झाला. रावबहादुर दीक्षितांनींच शेठजींना मोतीगिराचा मुकादमा जिंकून दिला होता, आणि मामलेदार व प्रान्तसाहेबांनींच शेठजींना मॅजिस्ट्रेटीचे अधिकार द्यावेत अशी शिफारस केली होती. त्यामुळें शेठजी या मंडळींना खास आग्रह करीत होते.

खाशा पंगती उठल्या. पानांत उरलेल्या जिलब्यांचीं ताटेंच्या ताटें भरलीं, व हें अन्न मिळण्याकरितां बाहेर बसलेल्या भिकाऱ्यांत मारामाऱ्या सुरू झाल्या.

"देवा, अरे देव्या" शेठजी ओरडले, "अरे ते भिकार कां ओरडते आहे पहा तर खरें, नाहीं तर हांकून दे सगळ्यांना तिथून."

देवाजी हा मंदिरांत नोकरीवर होता. आज भंडाऱ्याचा दिवस. सकाळपासून 'देवा' भिंगरीसारखा फिरत होता; त्याला पाणी पिण्यालासुद्धां फुरसत नव्हती.

आपल्या हातांत उरलेलीं पक्वान्नें घेऊन देव्या बाहेर आला, व जमलेल्या लोकांना थोडें थोडें अन्न देऊं लागला. थोडक्याच वेळांत भिकाऱ्यांचा ओरडा बंद झाला.

खाशा पंगती सरल्यानंतर बाकीच्या पंगती उठल्या. संध्याकाळ झाली.

देवाजी अजून कामांतच होता. रात्रीं दीपोत्सव होता. देवळावर चोहोंबाजूंनीं देवाजी पणत्या ठेवीत होता. घाईघाईनें थोडेंसें खाऊन पाणी पिऊन देवजी देवळाच्या बाजूंनीं पणत्या ठेवण्यांत गर्क झाला होता.

रात्र झाली, सर्व दिवे लागले, चोहोंकडे प्रकाश! अंधाराचें नांवच नाहीं.

रात्रीची आरती झाली.

रात्रीं गोपाळकृष्णाला रत्नजडित अलंकार घातले होते, व भरजरी पोषाख चढविला होता.

देवाचा साज पाहण्याकरितां गांवांतील सर्व प्रतिष्ठित लोकांस शेठजींनीं बोलाविलें होतें.

एकामागून एक मोटारी येऊं लागल्या, टांगे येऊं लागले. सभामंडपांत खाशा लोकांची गर्दी झाली. चित्रविचित्र रंगांची व जरीचीं अशीं लुगडीं नेसलेल्या श्रीमंतांच्या बायकाहि आल्या.

" काय पण मूर्ति सुरेख आहे, अन् दागिनेहि खूपच आहेत बरं का ! " रावबहादुरीणबाई रावसाहेबीणबाईंना सांगत होत्या.

" माझी मोटार अशी चालते म्हणतां. अहो, मी ताशीं पन्नास मैल सहज गाडी चालवितों. आज मी रामगांवाहून आलों पहा. रस्त्यांत एका गाईला माझ्या गाडीचा धक्का लागला, पण मला तेथें थांबायला वेळच नव्हता. शेठजींनीं मी आरतीच्या वेळीं हजर राहिलंच पाहिजे असा मला फारच आग्रह केला होता." रावसाहेब रावबहादुरांना सांगत होते.

नीरांजनें लागलीं. वाद्यें वाजूं लागलीं. सुवासिक फुलांचा व धूपाचा सुवास चोहोंकडे पसरला; व यावरून बाहेरच्या लोकांना कळलें आरती सुरू झाली.

आरती संपली. दीपोत्सव पाहून इतर बडी मंडळी परत गेली.

मंदिरावरचा दीपोत्सव पाहण्यास जवळपासच्या खेड्यांतून शेंकडों लोक आले होते. शेठजींच्या दातृत्वाची प्रशंसा सर्व लोक करीत होते.

देवाजीचें काम आटोपलें. त्यानंतर तो प्रसाद घ्यावयालासुद्धां मंदिरांत राहिला नाहीं. देवाला नमस्कार करून तो झपझप पावलें टाकूं लागला. आपण आपल्या घरीं कधीं जाऊन पोंहोचतों असें त्याला झालें होतें.

देवळावरील दिव्यांचा प्रकाश संपला. देवाजी अंधेरांतून झपझप चालूं लागला.

लांब अंतरावर त्याला एक मिणमिण जळणारा दिवा दिसला. देवाजीला आनंद झाला.

देवाजी आपल्या घराजवळ पोंचला.

बाहेरच्या अंगणांत देवाजीची लक्ष्मी आपल्या छोट्याला घेऊन तिच्या 'देवा'ची वाट पाहत उभी होती.

देवाजी दिसतांच छोट्यानें आपल्या बापाकडे धांव घेतली आणि त्याला जाऊन बिलगला.

" बाबा अन् मा निजले का ? " देवाजीनें हलकेंच विचारलें.

" नाहीं." त्याच्या लक्ष्मीनें उत्तर दिले, " आम्ही सर्व तुमचीच वाट पाहत उभी आहोंत."

देवा आंत गेला. लक्ष्मीनें पानें मांडलीं. म्हातारा, म्हातारी अन् देवाजी जेवायला बसलीं. छोटू बापाच्याच पानांत बसला, व मधून मधून आजाला त्रास देऊं लागला. लक्ष्मी वाढूं लागली.

" आज किनई बाबा, दिवाळी आहे अन् म्हणून 'मा'नें गव्हाची रोटी केली आहे; आज कांही रोजच्यासारखी भाकर अन् तिखट नाहीं. आज गव्हाची रोटी अन् खूप तेल आहे." पांच वर्षांचा छोटू म्हणाला. छोटूला गव्हाची रोटी फार आवडत असे.

देवाजीच्या घरी एकच तेलाचा दिवा होता. दिवाळीनिमित्त त्याच्या लक्ष्मीनें गव्हाची रोटी केली होती.

देवाच्या घरांतली सारी मंडळी लक्ष्मीच्या स्वयंपाकाची तारीफ करीत होती, व त्यामुळें लक्ष्मी अगदीं लाजून चूर होत होती.

गोपाळकृष्णाच्या मंदिरावरील दीपोत्सवाचा प्रकाश लांबवर पडला होता. शेठजींनीं आपल्या देवाची दिवाळी अगदी थाटानें साजरी केली असें सर्व लोक म्हणत होते.

लक्ष्मीच्या देवाची दिवाळी गव्हाच्या रोटीनें साजरी होत होती. देवाजी दुपारीं घरीं आला नव्हता, म्हणून छोट्याखेरीज घरांतली सर्वच मंडळी जेवायची थांबली होती. आणि रात्रीं मोठ्या आनंदानें गप्पागोष्टी करीत जेवत होती.

देवाजीच्या घरीं दीपोत्सव नव्हता. पण त्याच्या घरांत आनंदी आनंद व समाधान होतें.

जेवण झालें, देवाजीचा म्हातारा बाहेर आला.

" अरे देवा ! पाहिली का रे देवाची दिवाळी तूं ! पहा बरं आभाळांत आपल्या गरिबांच्या पांडुरंगानं किती दिवे लावले आहेत. गरिबांच्या देवाची ही दिवाळी नेहमींच असते बरं का देवा ! " म्हातारा देवाजीला म्हणाला.

" सुंदर तें ध्यान उभे विटेवरी " म्हातारा एकतारीवर गाऊं लागला. लक्ष्मी आपल्या मंजुळ आवाजानें म्हाताऱ्याची साथ करूं लागली. म्हातारी चिपळ्या वाजवूं लागली.

देवाची दिवाळी परमेश्वर साजरी करीत होता. आकाशांतल्या विश्वाच्या देवानें लावलेले 'नवलाख दिवे' लुकलुकत होते !



# काशीताईंचा काशीवास : : ३

गेल्या पंधरा वर्षांपासून काशीताईंचा कार्यक्रम जवळ जवळ ठरल्यासारखाच झाला होता. सकाळीं ४–४॥ वाजतां उठावयाचें, केरपोतेरें करावयाचें व घरांतील झाडझूड उरकावयाची; इतक्यांत ६-६॥ वाजत. नंतर त्यांचे चिरंजीव गणपतराव उठावयाचे व त्यांच्या थोडा वेळ अगोदर त्यांच्या सूनबाई सरस्वतीबाई उठावयाच्या. गणपतरावांचें व मुलांचें चहापाणी होतें न होतें तों काशीताई स्नान आटोपून चुलीपुढें बसावयाच्या. शाळेंत जाणारीं मुलें ११ वाजतां शाळेंत गेलीं की काशीताई आपल्या मुलाची वाट पाहत बसायच्या. सरस्वती-बाईंची प्रकृति नेहमीच ठीक नसे, व त्यामुळें त्या मुलांच्याच बरोबर जेवून घेत. गणपतरावांचें जेवण सरतें न सरतें तों दुपारीं मुलें शाळेंतून येत व 'आजी भूक! आजी भूक! असा एकच गिल्ला करीत. त्या वेळी काशीताई मुलांना थोडी थोडी भाकरी तेलाबरोबर किंवा तेल नसलें ( असे प्रसंग महिन्यांतून आतांशा बरेच येत ) तर चटणीबरोबर देत. मुलें खायला बसलीं कीं, काशीताई त्यांच्या-जवळ बसायच्या व मुलांनीं मग त्यांना शाळेंतील खूप गमती सांगायच्या. मुलांचीं खाणीं संपलीं की, काशीताई मुलांचे कपडे शिवीत बसत थोडें ऊन उतरले की, त्या गांवांतील बालाजीला जाऊन येत. तेथून परत आल्या कीं, परत रात्रीच्या स्वयंपाकाची तयारी सुरू होई. रात्रींचीं जेवणें संपली कीं, काशीताई उष्टींखरकटीं आवरीत. सर्व काम संपवून निजावयाला काशीताईंना रात्रीं ११–११॥ तरी वाजत.

काशीताईंचे यजमान शंकरराव हे वऱ्हाडांत मुनसरीम होते. त्यांचा स्वभाव देवभोळा होता. आपलें काम बरें; कीं आपण बरे अशी त्यांची वृत्ति असे. काशीताईंचा स्वभावहि अगदीं तसाच होता. नवराबायकोंचा असा स्वभाव असल्यामुळें शंकररावानी वीस वर्षें नोकरी करूनसुद्धां त्यांच्याजवळ मुळींच माया नव्हती. काशीताईंना त्यांच्या विसाव्या वर्षी एक मुलगा झाला. शंकररावांनीं आपल्या मुलाचें नांव गणपत ठेवलें. या मुलानंतर काशीताईंना दोनचार अपत्यें झालीं पण त्यापैकीं कोणीच वांचलें नाहीं.

गणपती हा १०–११ वर्षांचा असतांना शंकरराव वारले. शंकररावांच्या

नेकीनें वागण्याच्या पद्धतीमुळें त्यांच्याजवळ मुळींच पैसा नव्हता. तरीपण काशीताईनीं धीर सोडला नाहीं. सहस्रबुद्धे वकिलांच्याकडे त्या स्वयंपाकाला राहिल्या, व आपल्या मुलाच्या शिक्षणाची काळजी घेऊं लागल्या. सहस्रबुद्धे वकिलांची बायको काशीताईना फार मान देई. गणपती शाळेंत उनाडक्या करतो व त्याचें शिकण्यांत लक्ष नाहीं हें काशीताईच्या व सहस्रबुद्धे वकिलांच्या बायकोच्या लक्षांत आलें. गणपतीला शाळेंतून काढून कोणत्या तरी धंद्यांत घालावा असें काशीताईना वाटूं लागलें. याच सुमारास वकीलसाहेबांनी नवी मोटार घेतली होती, व तिच्याकरिता त्यांनीं साठ रुपये दरमहाचा एक ड्रायव्हर ठेवला होता. त्या ड्रायव्हरचा चुडीदार पैजामा, ते लांब केस, ती लांब केसांची डोक्यांत दाबून बसविलेली टोपी, तें विडे खाऊन लाल झालेलें तोंड, ती दोन्ही हातांत दाबून धरलेली सिगारेट किंवा विडी व ती जगाकडे तुच्छतापूर्वक पाहण्याची पद्धति या सर्व गोष्टी पाहून गणपतीला आपणहि मोटार ड्रायव्हर व्हावें असें वाटू लागलें. मुलानें आपली इच्छा काशीताईच्याजवळ प्रदर्शित केली, काशीताईनीं ही गोष्ट भीत भीत वकिलीणबाईच्याजवळ काढली. वकिलीण-बाईनीं वकीलसाहेबांचा तानमान पाहून त्यांच्याजवळ हा विषय काढला व वकीलसाहेबांनीं आपल्या प्रियपत्नीच्या आग्रहावरून गणपतीला मोटार ड्रायव्हरचें शिक्षण द्यावयाचें ठरविलें.

गणपती हा त्या वेळेपासून वकीलसाहेबांच्या इब्राहीम ड्रायव्हरजवळ मोटारचें काम शिकूं लागला.

अशींच आणखी ४–५ वर्षें गेलीं. गणपती हा चांगला मोटार ड्रायव्हर झाला व त्याला बॅरिस्टर कामत यांच्याकडे नौकरीहि मिळाली. त्या वेळीं आजच्या इतक्या मोटारी नव्हत्या व मोटार ड्रायव्हरहि नव्हते, त्यामुळें गणपतीला सुरवातीलाच साठ रुपये पगार मिळूं लागला.

मुलगा मिळवता झाला. काशीताईना धन्य वाटलें. गणपतीचा गणपतराव झाला व त्याला मुली सांगून येऊं लागल्या. आपलीं मुलें कांहीं वांचलीं नाहींत, तेव्हां गणपतीला अशी मुलगी बायको करावी, कीं जिच्या पत्रिकेंत तिच्या भाग्यांत पुष्कळ संततिसुख असेल, ही काशीताईची इच्छा. त्याप्रमाणें त्यांना एक मुलगी मिळाली व सहस्रबुद्धे वकीलसाहेबांच्या मदतीनें गणपतरावांचें लग्न झालें.

गणपतराव व सरस्वतीबाई यांचा संसार काशीताईनीं थाटून दिला व

नव्या सूनबाईना काम फार पडूं नये म्हणून त्यांनीं आपल्या अंगावर सर्व कामाचा बोजाहि घेतला.

सरस्वतीबाईची पत्रिका संततीच्या बाबतीत खरी ठरली. त्यांचा पाळणा वर्ष-दीड वर्षाच्या अंतरानें हलूं लागला. गणपतरावांना केशव, नारायण व माधव असे तीन मुलगे आणि सोनी, बच्ची व बंडी अशा तीन मुली अशीं एकूण सहा मुलें दहा वर्षांत झालीं.

गणपतरावांना सुरवातीला पगारहि चांगला मिळे, व काशीताईच्या हातीं प्रपंच असल्यामुळें त्या काटकसरीनें खर्च करून थोडीबहुत शिल्लकहि टाकीत. सहस्रबुद्धे वकिलाच्या येथें काशीताई कामाला होत्या त्या वेळींहि त्यांनीं कांहीं पैसा गांठीशीं ठेवला होता.

दिवस जात होते, पण पुढें येणारे दिवस काशीताईना चांगले नव्हते. सरस्वतीबाईना आपल्या म्हाताऱ्या सासूची घरांत अडचण होऊं लागली व सूनबाई घालून-पाडून सासूवर तोंडसुख घेऊं लागल्या. गणपतरावहि आईला हिडिसफिडिस करूं लागले.

गणपतरावाचे सद्दीचे दिवस संपूं लागले. आपल्या यजमानाची त्यांच्याकडून हयगय होऊं लागली, व बॅरिस्टर कामतांनी त्यांना घरीं बसविलें.

गणपतराव आतां पूर्णपणें मोटार ड्रायव्हर बनले होते. आपल्या झोंकांत ते त्यांच्या गुरूलाहि मागें टाकूं लागले. यापुढें कोणाचीहि खासगी नोकरी करावयाची नाहीं असें त्यांनीं ठरविलें. स्वतःची कांही शिल्लक, काशीताईची सर्व शिल्लक व सुमारें चारपांचशें रुपये कर्ज येवढी रक्कम जमा करून गणपतरावांनीं एक नवी कोरी लॉरी घेतली व आपल्या मालकीची लॉरी ते स्वतः चालवूं लागले.

गणपतरावांची प्राप्ति दिवसेंदिवस फार कमी होऊं लागली. मोटारच्या धंद्यांत चढाओढ फारच झाली होती; त्यामुळें गणपतरावांना फारच थोडा नफा राहूं लागला. घरचा खर्चहि वाढलेला, व इतक्याउपर गणपतरावांना थोडेंसें बाटलाबाईचें व्यसनहि लागलें. दारूच्या अर्धवट निशेंत गाडी हांकीत असतांना त्यांच्या गाडीला अपघात होऊन त्यांची गाडी जळून खाक झाली. सुदैवानें त्या वेळीं गाडींत पॅसेंजर कोणीच नव्हते, येवढीच काय ती दुःखांत सुख मानावयाला जागा होती.

अपघातांत गणपतरावांचें अंग बरेंच भाजलं होतें. काशीताईंनी त्यांची जिवापाड शुश्रूषा केली व त्यामुळें गणपतराव लवकरच बरे झाले.

गणपतराव बरे झाले खरे; पण त्यांच्यावर संकटें यावयाला नुकतीच कुठें सुरवात झालेली होती. गोवर्धन मारवाड्यानें आपल्या पैशाकरितां त्यांच्यावर दावा केला व त्या पैशाच्या भरतीकरितां गणपतरावाला सरस्वतीबाईंचे कांहीं दागिने मोडावे लागले.

गणपतरावांनी पुन्हा नोकरीकरितां खटपट सुरू केली व त्यांना मोठ्या प्रयासानें रेग्युलर मोटार सर्व्हिसवर दरमहा वीस रुपयांची नोकरी मिळाली.

गणपतरावानीं—पण आतां लोक त्यांना गणपती मोटारवाला असें म्हणूं लागले—आपलें जुने घर सोडलें व सोमणांच्या चाळींतील वरच्या मजल्यावर दोन खोल्या भाड्यानें घेतल्या. नवराबायको, सहा मुलं व काशीताई इतकी सर्व माणसें या दोन खोल्यांत आपला प्रपंच करूं लागली.

सरस्वतीबाईंना सासू कधीच आवडत नसे. मुलांची आपल्या आजीवर माया आहे, हेंहि त्यांना पाहवत नसे. घरांत खर्चाची फार ओढाताण होई व वेळ प्रसंगीं खाण्याचे फार हाल होत. हा सारा राग सरस्वतीबाई काशीताई-च्यावर काढीत.

काशीताई कष्टाला भीत नव्हत्या. जन्मभर त्यांनी कष्टच केले होते व मरेपर्यंत कष्ट करावयाची त्यांची तयारी होती. त्यांना गोड शब्दांची व प्रेमाची जरूरी होती. मुलगा व सून हींहि सुख त्यांना मिळूं देत नव्हतीं.

काशीताईच्या जवळ एक लहानसा देव्हारा होता. हा देव्हारा एका कोपऱ्यांत मांडावा व देवासमोर आपण दररोज संध्याकाळीं आपल्या नातवंडांना घेऊन भजन करावें येवढीच काशीताईची महत्त्वाकांक्षा होती. पण घरांतली जागा पुरत नाही म्हणून सूनबाईंनी तो देव्हारा अडगळीच्या पोत्यांत टाकून दिला.

त्या दिवशी काशीताई फार रडल्या. त्यांनीं सुनेचे पायदेखील धरले; पण मुलाला व सुनेला त्यांची कींव आली नाहीं. काशीताईचा देव्हारा मांडा-वयाला गणपतरावाच्या घरांत जागाच नव्हती.

काशीताईंना दुसरें कांहीं नको होतें. त्यांची अत्यंत मोठी महत्त्वाकांक्षा म्हणजे आपल्या घरांत आपल्याला देव्हारा मांडण्यापुरती जागा असणें येवढीच होती; पण तीहि पूर्ण होण्याचा यापुढें फारच थोडा संभव होता.

तरी पण काशीताई आनंदांत होत्या. नातवंडांचे लाड करण्यांत त्यांना स्वर्गसुख वाटे. बंडीनें आपल्या चिमुकल्या हातानें त्यांच्या गळ्याला मिठी घातली, की काशीताईना अत्यंत आनंद होई, व त्या आनंदांत सुनेचीं घालून-पाडून बोलणीं व मुलांची खसखस त्या पार विसरून जात.

दिवस जात होते; पण पुढील दिवस मागच्यांना बरे म्हणाविणारे होते. गणपती मोटारवाल्याचा स्वभाव तामसी असल्यामुळें त्याचे मालकाशीं वारंवार खटके होत व वर्षातून कित्येक दिवस गणपतरावांना नोकरीशिवाय राहावें लागे.

त्याच सुमारास सहस्रबुद्धे वकील वारले. त्यांनी खूप पैसा मिळविला होता; पण त्यांना मूलबाळ कांहीं नव्हतें. वकिलीणबाई आपल्या बंगल्यांत एकट्याच राहत असत. वकीलसाहेब गेल्यावर काशीताई वकिलीणबाईंच्या समाचाराला दोनचार वेळा गेल्या होत्या, पण त्यांनी वकिलीणबाईना केव्हांहि आपलें दैन्य दिसूं दिले नाहीं.

" काय बाई तरी देव !" सूनबाई गर्जत होत्या, " मेला स्वतःच मेला आहे की काय कोण जाणे ! अगदी जख्खड म्हातारी होईपर्यंत माणसांना जगवितो तरी कशाला ? अशा लोकांचा घरांतल्या लोकांना काय उपयोग ? उगीचच्या उगीच असून अडचण, नसून खोळंबाच असतो मेला ! "

काशीताई स्वस्थपणानें एका कोपऱ्यांत बसल्या होत्या. साऱ्या हयातीत अगदीं गरिबींत असतांनादेखील शंकरराव त्यांना कधींहि टाकून बोलले नव्हते. पण आतां म्हातारपणीं हे असले बोल ऐकावयाचें म्हातारीच्या नशिबीं आलें होतें.

गणपतरावांच्या बिऱ्हाडांत हा गडगडाट चालू असतांनाच वकिलीणबाई ( त्यांना सर्व लोक माईसाहेब म्हणत ) तेथें आल्या.

" काय काशीताई ! काय चाललं आहे ?" माईसाहेबांनी बाहेरूनच विचारलें.

घरांतील गडगडाट एकदम थांबला. सरस्वतीबाई उभें लावून सासूबाईंच्या समोर उभ्या राहून हातवारे करीत होत्या त्या एकदम आंत पळाल्या. माई-साहेब आंत आल्या.

माईसाहेबांनीं सर्व ओळखलें. " काशीताई, आज तुम्ही माझ्याकडे चला. मला तुम्हांला पुष्कळ गोष्टी विचारायच्या आहेत "

माईसाहेबांनीं फारच आग्रह केल्यामुळें काशीताई त्यांच्याबरोबर त्यांच्या घरीं गेल्या.

त्या दिवशीं रात्रीं माईसाहेबांचीं व काशीताईंचीं पुष्कळ बोलणीं झालीं.

काशीताई अगदीं ढसढसा रडल्या व माईसाहेबांनाहि आपलें रडें आवरेना. स्त्रीहृदयाची कल्पना स्त्रीहृदयालाच येऊं शकते.

" काशीताई, तुम्ही आतां असं करा. तुम्ही माझ्याचकडे राहा. येवढ्या मोठ्या बंगल्यांत मी अगदीं एकटीच असतें. तुमच्या सूनबाईला तुम्ही डोळ्यांसमोर नको; मलाहि सोबतीची फारच जरूर आहे. तेव्हां तुम्ही माझ्याजवळ राहा." माईसाहेब म्हणाल्या.

" नाही ! मला घर सोडवत नाहीं. मला माझ्या मुलांना सोडून लांब राहवणार नाहीं." काशीताई म्हणाल्या.

" पण तुम्हांला तुमच्या मुलांच्याच हिताच्या दृष्टीनं दूर राहिलं पाहिजे. तुम्ही इथं राहिलांत तर तुमच्या मुलाचा तेवढाच खर्च कमी होईल, व तो पैसा त्याला तुमच्या नातवंडांच्या सुखाकरितां खर्च करायला सांपडेल, नाही का ?"

मुलांचे कल्याण ! काशीताई विचार करूं लागल्या. आपल्या नातवांना भाकरीबरोबर तेलसुद्धां दररोज मिळत नाही. आपण जर माईसाहेबांच्या घरीं राहिलों व दरमहा कांहीं पैसे मिळवूं लागलों तर आपल्याला थोडेबहुत पैसे घरीं पाठवितां येतील. पहिल्याच महिन्यांत सूनबाईला धडोतीचे लुगडें घेतां येईल.

काशीताई विचार करीत होत्या. शेवटी त्यांनी आपलें मन घट्ट केलें व माईसाहेबांच्या म्हणण्याला संमति दिली.

" पण माईसाहेब, माझी एक विनंति आहे. मी आपल्याकडे राहायला यायला तयार आहे. घरांतील सर्व कामं मी करीन; मला आपण कांहीं पगार द्यावा."

दोनतीनच वाक्यें, पण तेवढीं बोलण्याला काशीताईना किती त्रास पडला ! आपला मुलगा असतांनासुद्धां आपल्याला नोकरी करण्याचा प्रसंग यावा, व त्याकरितांच ज्या नातवंडांवर आपलें फार प्रेम आहे त्यांस सोडून दूर राहण्याची पाळी यावी या दैवदुर्विलासाबद्दल त्यांना फार खेद वाटत होता.

माईसाहेबांनी सर्व कांहीं ओळखलें. काशीताई बोलल्या त्याचा सर्व अर्थ त्या समजल्याच, पण आणखीहि बऱ्याच गोष्टी त्यांच्या लक्षांत आल्या.

" काशीबाई ! " माईसाहेब म्हणाल्या, " मला घरांतील काम करायला नोकर नको आहे. मला मैत्रीण पाहिजे आहे. तुम्ही माझ्याजवळ राहा. आपल्या दोघींनाहि जगांत आतां कितीसे दिवस काढायचे आहेत ? तुम्हांला घरखर्चाला मी पंधरा रुपये देत जाईन."

काशीताईनीं पुष्कळ दुःखें सहन केलीं होतीं, व त्या प्रसंगीं कित्येक वेळां त्याच्या डोळ्यांतून एकहि अश्रु बाहेर आला नव्हता. पण माईसाहेबांचे हे उपकार—छेः-छेः, काशीताईना तें सहनच होईना. त्या हमसाहमशीं रडावयाला लागल्या. माईसाहेबांनींहि त्यांना आवरावयाचा प्रयत्न केला नाही. त्याहि मूकपणानें अश्रुमोचन करूं लागल्या.

"बरं तर मग, मी एकदां घरीं जाऊन येतें." काशीताई कांहीं वेळानें म्हणाल्या.

माईसाहेबांनी आपल्या ड्रायव्हरला मोटार तयार करावयास सांगितले. माईसाहेबांच्या मोटारींतून काशीताई घरी आल्या.

अगदी शातपणानें काशीताईनी आपलीं चिरगुटें आवरलीं, तीं एका गांठोड्यांत बांधलीं.

सासूबाई जात आहेत हें पाहून सूनबाईना जरा बरेंच वाटलें; पण नातवंडें कांही आजीला जाऊं देईनात "आजी, तूं जाऊं नकोस." असा लहान मुलांनीं एकच हलकल्लोळ माडला.

"काय मेली नतद्रष्ट आहेत कारटी!" सूनबाई ओरडल्या, "आजी चांगली सुखानं राहायला जाते आहे अन् या कारट्यांना तें पाहवत नाहीं."

"नको ग सूनबाई असं बोलूंस." काशीताई दीनवाणीनें म्हणाल्या.

मुलानीं मारलेल्या मिठ्या त्यांनीं मोठ्या कष्टानें सोडवल्या आणि आपलें गाठोडें व देव्हारा घेऊन त्या मोटारीत येऊन बसल्या.

"जातें रे गणपती, मुलांची काळजी घे बरं का!" काशीताई म्हणाल्या. मोटार निघून गेली.

माईसाहेबांचा बंगला प्रशस्त होता. माईसाहेबांचें देवघरच काशीताईंच्या बिऱ्हाडांतील दोन खोल्यांतील जागेपेक्षां मोठें होतें.

त्या प्रशस्त देवघराच्या एका कोंपऱ्यांत काशीताईंचा देव्हारा ठेवला गेला. काशीताईंची महत्त्वाकांक्षा पूर्ण झाली. पण त्यामुळें त्यांना फारसें समाधान मात्र झालें नाहीं.

दिवस जात होते.

एकादशी आली. माईसाहेबांच्याकरितां गोदूबाईनें ( स्वयंपाकीणबाईनें ) बरेच फराळाचे जिन्नस केले होते. माईसाहेब व काशीताईंचा फराळ झाला. निम्म्यापेक्षां जास्त पदार्थ तसेच उरले. गोदूबाई ते उचलून बाहेर घेऊन गेली.

काशीताईची नजर त्या पदार्थांवर खिळली होती. आपण आज येथें पोटभर फराळ केला; पण आपल्या घरीं मुलगा, सून व नातवंडें यांना कांहीं तरी खावयाला मिळालें असेल का ?

काशीताईच्या डोळ्यांतून झरझर अश्रुप्रवाह सुरू झाला.

माईसाहेबांनी काशीताईना कां दुःख होत होतें तें ओळखलें.

" काशीताई, मुलांकरितां फराळाचं घेऊन आपला शंकर अगोदरच गेला आहे बरं का ? " माईसाहेब म्हणाल्या.

काशीताईनी अत्यंत कृतज्ञतापूर्वक माईसाहेबांच्याकडे पाहिलें व आपली नजर बाहेर वळविली.

आपली नातवंडें कोंडाळें करून बसलीं आहेत व पोट भरून फराळ करीत आहेत असें दृश्य त्यांच्या डोळ्यांपुढें दिसूं लागले.

" माझी मुलं ! माझीं सोन्यासारखी मुलं ! " काशीताई मनांत म्हणाल्या. त्यांनी आपली नजर खोलीत वळवली. माईसाहेब सहानुभूतिपूर्वक काशीताईच्या-कडे पाहत होत्या व त्या मधून मधून स्मित करीत होत्या.

काशीताई माईसाहेबांच्याकडे राहून एक महिना झाला. गणपतरावांचें सगळें घर जेवढें मोठें होतें त्यापेक्षांहि माईसाहेबांच्या येथील काशीताईना दिलेली खोली मोठी होती. काशीताईची सगळ्यांत मोठी महत्त्वाकांक्षा म्हणजे त्यांच्या देवांकरितां एक निराळें देवघर. तीहि महत्त्वाकांक्षा माईसाहेबांच्या कृपेनें पूर्ण झाली होती.

काशीताईना पैशानें जितकें सुख मिळेल तेवढें मिळणें शक्य होतें, पण त्यांचें सारें लक्ष त्या सोमणांच्या चाळींतील अडचणीच्या दोन खोल्यांत आणि त्या खोपट्यांत राहाणाऱ्या त्यांच्या मुलांत व नातवांत असे. घार कितीहि उंच उडाली तरी तिचें लक्ष नेहमी तिच्या पिलांकडेच असतें.

महिन्याचा पगार हातीं येतांच काशीताई घरी आल्या व सारेच्या सारे पैसे त्यांनी सूनबाईच्या स्वाधीन केले.

सासूबाई दिसतांच सरस्वतीबाईच्या कपाळाला नेहमी आठ्या पडत; पण आज सासूबाईनीं एकदम पंधरा रुपये आणले होते, त्यामुळें त्या सासूबाईच्यावर तेवढ्या घटकेला तरी फारच खूष होत्या. घरांत पैसे आल्यामुळें आईशीं कधींहि न बोलणारे गणपतराव मधल्या दरवाजांत बसून विडीचे झुरके ओढीत आईशीं गप्पा मारीत होते. सरस्वतीबाई मुद्दाम चुलीशीं बसून सासूबाईच्याकरितां चहा

करीत होत्या. लहान मुलें मात्र पूर्वी जितक्या प्रेमानें आजीशीं बोलत तितक्या प्रेमानें आजहि बोलत होतीं.

काशीताईनीं चहा घेतला व जड अंतःकरणानें त्या जावयाला निघाल्या. " आजी, तूं जाऊं नकोस ना ! " अशी मुलें गडबड करूं लागली.

काशीताईनी मुलांचे पुन्हा पापे घेतले व मागें वळूनसुद्धां न पाहतां त्या चाळीचा जिना उतरूं लागल्या.

* * *

दिवस जात होते. काशीताई माईसाहेबांच्याकडेच राहत होत्या. दरमहा पंधरा रुपये गणपतरावाला मिळत असल्यामुळे तेहि आईवर खूष होते. मुलें मात्र आजी घरी राहत नाहीं म्हणून फार कष्टी होत असत.

" काशीताई, माझ्या मनांत एक विचार येत आहे." एके दिवशीं संध्याकाळी माईसाहेब म्हणाल्या.

काशीताईनीं प्रश्नार्थक मुद्रेनें माईसाहेबांच्याकडे पाहिले.

" मला किनई काशीताई, आपण काशीवास करावा असंच आता वाटूं लागलं आहे. नाही तरी माझं आहे काय इथं ? मला आपलं वाटतं की, आयुष्याचे उरलेले दिवस काशीविश्वेश्वराच्या ठिकाणीं जाऊन घालवावेत. मग आतां आपण जाऊं या काशीला ? कधीं निघायचं आतां ? " माईसाहेब म्हणाल्या.

काशीताईना मोठा विलक्षण पेंच पडला. माईसाहेबांनीं त्यांच्यावर डोंगराएवढे उपकार करून ठेवले होते, तेव्हां त्यांना नाहीं म्हणणें कठीण ! शिवाय माईसाहेब स्वभावाच्या फार मानी होत्या. त्यांना नाहीं म्हटलें तर त्या फारच रागवावयाच्या. काशीताई विचार करीत होत्या. त्यांचें मन पुन्हां सोमणांच्या चाळींत गेलें. त्यांची ती शहाणी सोनी, ती बोबडी बच्ची व बडंखोर बंडी, ते रामलक्ष्मणासारखे केशव व नारायण आणि तो अचपळ माधव !— काशीताईना काशीला जावयाची कल्पना मानवेना.

माईसाहेबांची काशीला जावयाची तयारी सुरू झाली व त्याबरोबर काशीताईंची तयारीहि आपोआपच सुरू झाली.

काशीला जावें कीं नाहीं हें ठरविण्याकरितां काशीताई घरीं आल्या होत्या.

" बाकी सासूबाई भाग्यवान् खऱ्या अं ! " सरस्वतीबाई म्हणाल्या, " आम्हांला मेलं हें भिकारडं गांव सोडून दोनतीन वर्षांतसुद्धां बाहेर जायला मिळत नाहीं. माझ्या मावसवहिणीच्या सावत्र दिराचं लग्न अन् येवढं अगत्याचं

बोलावणं बाळीनं केलंन्; पण आम्हांला जाणं कांहीं परवडलं नाहीं. येवढा पोरवडा येऊन जायचं तरी कसं बाई! अन् सासूबाईंना दुसऱ्याच्या खर्चानं काशीवास घडणार! आहे बाई भाग्याची गोष्ट एकंदरीत!"

गणपतराव नेहमीप्रमाणें दरवाजांत बसून विडीचे झुरके ओढीत होते.

"हो पण आई! पैसे मात्र दरमहा मला पाठवीत जा बरं का? तुला काशीवास घडणार ही तुझी पुण्याई खरीच; पण त्यांत आमचाहि फायदाच आहे." गणपतराव म्हणाले व जणूं काय आपण खूपच विनोद केला असें समजून खूप मोठ्यानें हंसले.

आपल्याला आपला मुलगा व सून काशीला जाऊं नका असें म्हणतील अशी काशीताईंना वेडी आशा होती, पण ती वृथा ठरली. नाही म्हणावयाला मुलें मात्र "आजी, तूं घरीं राहायला ये ना!" असे म्हणत होतीं. त्यांना आजीच्या पैशाची जरूर नव्हती. त्यांना आजीचें प्रेम पाहिजे होतें.

"मग आई, जाच तूं काशीला." गणपतराव म्हणाले.

जड अंतःकरणानें काशीताई उठल्या व माईसाहेबांच्याकडे गेल्या.

जायचा दिवस उजाडला. माईसाहेबांची कोण गडबड व धांदल! पण काशीताई! छेः! त्या अगदीं घाबरलेल्या दिसत होत्या. शेवटले दोनचार दिवस त्यांना झोंपहि येत नव्हती.

संध्याकाळच्या मेलनें काशीला जावयाचें. फांशी जाणारा मनुष्य ज्याप्रमाणें आपल्या आयुष्याचे तास मोजतो त्याप्रमाणें काशीताई त्या दिवसाचे तास मोजीत होत्या. दुपारीं घरच्या सर्व मंडळींना भेटण्याकरितां त्या घरीं आल्या होत्या.

सरस्वतीबाई व गणपतराव कांही तरी बोलत होती, काशीताई सर्व मुलांना घेऊन बसल्या होत्या. येवढीं दांडगीं मुलें तीं, पण आज साऱ्यांचीं तोंडें चिमणीयेवढीं झाली होतीं. लहान मुलांनीं आपल्या हातांचे विळखे आजीच्या मानेभोंवतीं घातले होते.

गणपतराव रेल्वेगाइड पाहत होते. सरस्वतीबाई नुसत्याच उभ्या होत्या. काशीताई नुसत्या बसल्या होत्या.

काशीताईंच्यावर त्यांच्या आयुष्यांत कित्येक दैवी आपत्ति आल्या होत्या, पण आजच्यासारख्या त्या कधींच खचल्या नव्हत्या.

त्या लहानग्या चिमण्यांना सोडून जावयाचें ही कल्पनाच काशीताईंना किती भयंकर वाटत होती.

"आजी, नको ग जाऊंस तूं आम्हांला सोडून." बंडी म्हणाली व आजीच्या मानेला घट्ट मिठी मारून ती हमसाहमशीं रडूं लागली.

झालें ! दुःखाचा बंधारा फुटला. काशीताईहि रडूं लागल्या. येवढ्यांत माईसाहेब तेथें येऊन पोंहोचल्या.

माईसाहेबांनीं तें दृश्य पाहिलें. त्यांच्या हृदयांत आजपर्यंत सुप्त असलेली मातृत्वाची भावना जागृत झाली. त्यांच्याहि डोळ्यांना टचकन पाणी आलें.

" माईसाहेब ! " काशीताई म्हणाल्या, "मला काशीला नेऊं नका हो. मला लांबचा काशीवास नको. माझ्यासारख्या अभागिनीचा काशीवास म्हणजे माझ्या मुलांचा सहवास हाच. माईसाहेब, माझ्यावर दया करा आणि माझी व या छबुकड्या जिवाची ताटातूट करूं नका ! "

माईसाहेबांना मूलबाळ नव्हतें; पण माईसाहेबांच्या प्रेमळ अंतःकरणाला काशीताईंच्या प्रेमळ अंतःकरणाची पूर्ण खूण पटली.

" काशीताई ! " माईसाहेब गद्गद स्वरानें म्हणाल्या, " काशीताई, तुम्ही काशीला येऊं नका. तुमचा खरा काशीवास या लहानग्यांच्या सहवासांतच आहे. मी एकटीच काशीला जातें. तुम्ही सर्व मंडळी आमच्या बगीचावरील बंगलींत राहायला जा. तुमच्या गणपतरावाला माझी जमीन खंडानें करूं दे. काशिताई, तुमच्या नातवंडांच्या सहवासांत तुम्ही सुखानं राहा."

माईसाहेब हळूच उठल्या व खोलीच्या बाहेर पडून चाळीचा जिना उतरूं लागल्या.

काशीताईंच्या गळ्याभोंवतीं नातवंडांच्या हातांचा विळखा पडलेला होता. आपल्या नातवंडांना सोडून आतां आपल्याला जावें लागणार नाहीं म्हणून काशी-ताईंना आनंद वाटत होता व त्या आनंदामुळेंच त्या खूप रडत होत्या. आपल्या नातवंडांच्या सहवासांतच त्यांना काशीवासापेक्षांहि जास्त सुख वाटत होतें.

गणपतरावांचे विडीचे झुरके घेणें पुन्हा जोरानें सुरू झालें. खालीं मोटार सुरू झाल्याचा आवाज आला. पोंगा वाजला व माईसाहेबांची मोटार निघून गेली.

काशीताई मात्र बसूनच होत्या. आपल्या नातवंडांच्या सहवासांत त्यांना काशीवासापेक्षांहि जास्त सुख होत होतें.

---

# रामराज्य : : ४

[ एक जुनीच पण नवीन पद्धतीनें सांगितलेली कथा. ]

" मग काय, गालेय मुनींच्या मुलाची प्रकृति दुरुस्त होण्याची आता कांहीच आशा नाही ? " अमात्य चंद्रचूडांनीं विचारलें

" नाहीं, सरकार ! वैद्यरत्नांनी मुलाला नुकतंच पाहिलं आतां रोगी परमेशाचे कृपेनंच वांचला तर वांचेल असं वैद्यरत्न म्हणाले " जासुदानें उत्तर दिलें.

अमात्य चंद्रचूडांनीं एक दीर्घ उसासा सोडला व ते चिंतामग्न झाले.

अयोध्या नगरींत दाशरथी रामचंद्र कारभार करीत होते. अष्टप्रधानांच्या सहायानें येवढ्या मोठ्या अफाट साम्राज्याचा कारभार कसा चोख चालला होता. एकाएका प्रधानाकडे प्रजेच्या हिताच्या एकएक खात्याची पूर्ण जबाबदारी असल्यामुळें प्रत्येक प्रधान आपआपल्या खात्याचें काम दक्षतेनें करीत असे. आपल्या प्रजेची सुखवृद्धि व्हावी म्हणून सम्राट् रामचंद्र हे स्वतः अष्टप्रधानांच्या सभेत जातीनें हजर राहून एकंदर राज्यकारभाराची व्यवस्था प्रजाहितवर्धनाच्या दृष्टीनें योग्य तऱ्हेनें चालली आहे की नाहीं हें जातीने पाहत. महाराणी सीतादेवी यांचेंहि पतीला सर्वतोपरी सहाय असे.

अयोध्या नगरी व सम्राट् रामचंद्रजींचें साम्राज्य सर्वतोपरी सुखी होतें. सर्व प्रजाजनाचे सम्राटावर आत्यंतिक प्रेम होतें; व सम्राट् हेहि स्वतःला प्रजेच्या हिताचा संरक्षक समजत.

अशा तऱ्हेनें दिवस जात होते. सर्वच दिवस नेहमी सारखे नसतात. गालेय मुनींचा धाकटा मुलगा आजारी पडला. मुलाचें वय साधारणतः एक-दीड वर्षाचे होतें. गालेय मुनि व त्यांची पत्नी सुरेखा फारच काळजींत पडलीं.

सर्व अयोध्या नगरींत चर्चा सुरू झाली.

एक-दीड वर्षाचें बालक फारच आजारी पडते, व त्याची स्थिति फारच वाईट होते ही गोष्ट रामराज्यांत नवीन होती. साम्राज्यांत सुबत्ता असल्यामुळें व सम्राटांचे अधिकारी प्रजाहितदक्ष असल्यामुळें साम्राज्यात अपमृत्यु होत नव्हते. सर्व साम्राज्यांत चोरी, चहाडी अशा तऱ्हेचे गुन्हे लोकांना माहीतहि

नव्हते. बालक इतकें आजारी पडावें याचेंच अयोध्या नगरींतील लोकांना फारच आश्चर्य वाटत होतें, व खेदहि वाटत होता

" गालव ऋषींचं बालक आजारी पडलं व त्याची स्थिति फारच वाईट आहे. ही इतकी स्थिति होईपर्यंत आरोग्यखात्याचे अमात्य काय करीत होते ? " नगरींतील पौरजन आपल्यांतच अशा तऱ्हेनें बोलत.

अमात्य चंद्रचूड हे आरोग्य खात्याचे अमात्य होते. अमात्यांनीं याच खात्यांत जवळ जवळ वीस-पंचवीस वर्षें काम केले होतें, व त्यांच्या साऱ्या कारकीर्दींत लहान बालक आजारी पडण्याचा हा पहिलाच प्रसंग होता.

वैद्यरत्न मारिचेय हे नगरींतील वैद्यकखात्याचे मुख्याधिकारी होते. गालव ऋषीचें बालक आजारी आहे याची बातमी लागतांच वैद्यरत्नांनी त्याला स्वतः जाऊन तपासलें होतें. मुलाच्या औषधपाण्याची व शुश्रूषेची सर्व व्यवस्था सरकारी आधिकारी व परिचारिका करीत होत्या.

वैद्यरत्नांच्या हाताखाली कित्येक वैद्य काम करीत होते. एक अनुभवी वैद्यराज बालकाची प्रकृति पाहून औषधोपचार करीत. दिवसांतून एक वेळ मुलाचें प्रकृतिमान अमात्य चंद्रचूडांना कळविण्यांत येई.

बालकाची प्रकृति फारच बिघडली होती. त्यामुळें अमात्य चंद्रचूड फारच काळजींत होते.

राजवाड्यांतहि वर्दी पोंचली होती. महाराणी सीतादेवी यांनीं मुलाच्या प्रकृतीची जातीनें चौकशी केली होती.

सायंकाळच्या वेळीं बालक अत्यवस्थ झाले. अयोध्या नगरींत हाच विषय ज्याच्या त्याच्या तोंडी होता. श्रीरामचंद्रांच्या राजवटींत अशा तऱ्हेचा प्रसंग हा पहिलाच होता.

राजवाड्यांतहि गडबड सुरू झाली. महाराज्ञी दुपारपासूनच चिंतातुर होत्या; त्या दिवशीं त्यांनीं सर्व दिवस अन्न ग्रहण केलें नव्हतें.

सायंकाळीं सम्राट् सीतादेवींना घेऊन गालव ऋषींच्या आश्रमाकडे निघाले. बरोबर अमात्य चंद्रचूड व वैद्यरत्न मारिचेय हेहि होते.

सम्राटांची स्वारी गालव मुनींच्या आश्रमांत जाऊन पोंचली. सम्राटांनीं व सम्राज्ञींनी मुनींना व त्यांच्या पत्नीला अभिवादन केले.

" शतायुषी भव ! पुत्रपौत्रवती भव ! " मुनिवरांनीं सम्राटांना व सम्राज्ञीला

आशीर्वाद दिला. अफाट साम्राज्याच्या वैभवशाली सम्राटानें व सम्राज्ञीनें एका वृद्ध मुनीचा आशीर्वाद मस्तक लववून ग्रहण केला.

"वैद्यरत्न," श्रीरामचंद्र म्हणाले, "बालकाची प्रकृति इतकी कशी बिघडली? नगरींतील लहान मुलांना जें दूध मिळतं त्यांत तर कांहीं फरक झाला नाहीं ना?"

"राजा! तूं व्यर्थ चिंता करूं नकोस. तुझे अधिकारी प्रजाहितदक्ष आहेत व प्रजेच्या प्रकृतीची काळजी ते नीट घेत आहेत. आमचेंच दुर्दैव, कीं आमचं बालक इतकं आजारी पडावं."

"मुनिवर! आपलं बालक आजारी आहे हें आपलं दुर्दैव आहे हें खरं; पण हें सिंहासनाला शतपट लांछन आहे. सिंहासनावर आम्ही असतांना आमच्या राज्यात एक बालक इतकं आजारी पडावं याचा अर्थ प्रजेच्या आरोग्याची आम्ही व आमचे अधिकारी यांनीं जितकी काळजी घ्यायला पाहिजे तितकी घेतली गेली नाहीं असाच आहे, मुनिवर! राज्यधुरा आम्हीं जी धारण केली आहे ती संपत्तीचा नुसता उपभोग घेण्याकरितां धारण केलेली नाहीं. राजशासन हा आमचा धर्म आहे. प्रजाहितपालन ही आम्हांस शास्त्रांची आज्ञा आहे. या आज्ञेचं परिपालन आम्ही करीत आहोंत. मुनिवर, या आज्ञेचं परिपालन आमच्याकडून चांगल्या तऱ्हेनं व्हावं असा आम्हांला आपल्यासारख्या तपोधन ऋषींचा आशीर्वाद पाहिजे."

"राजन्! आम्ही तप करतों तें तरी तुझ्याचकरितां ना! अरे, जगांत सुखशान्ति यांची वृद्धि व धर्मरक्षण जर व्हायला पाहिजे असेल, तर त्याला राजा जितका प्रजाहितदक्ष असायला पाहिजे तितकीच प्रजाहि राजनिष्ठ असायला पाहिजे. आणि ती तशी व्हावी याच हेतूनं आम्ही तपस्वी ज्ञानप्रसार करीत असतों. तूं आपल्या राजधर्माचं परिपालन कर; प्रजेला आपल्या धर्माचं परिपालन करूं दे. राजा! अशा तऱ्हेनं जर धर्मपरिपालन झालं तर प्रजेच्या सुखाची समृद्धि पूर्णपणानं होईल यांत नवल तें काय?" गालव ऋषि म्हणाले.

वैद्यरत्न बालकाजवळ बसून नाडीपरीक्षा करीत होते. सम्राज्ञींनीं बालकाला आपल्या मांडीवर घेतलें होतें.

उपाययोजना चालू होती. मनुष्याची उपाययोजना व कालाचे दूत यांचा झगडा चालू होता.

"आमच्या राजवटींत जर हें बालक मृत्युमुखीं पडलं तर त्याचा दोष

आमच्या मस्तकीं येईल. आम्हीं व आमच्या अधिकाऱ्यांनीं जर पहिल्यापासूनच काळजी घेतली असती तर दीड वर्षाचं बालक अशा तऱ्हेनं आजारीच पडलं नसतं. या जगांत प्रवेश करणाऱ्या आमच्या साम्राज्यांतील सर्व प्रजाजनांच्या स्वास्थ्याची जबाबदारी आमच्या शिरावर आहे. ती जर आमच्यानें पुरी पाडली गेली नाहीं तर आम्हांला पुनः वनवासाला जावं लागेल." सम्राट् खिन्नपणानें म्हणाले.

जवळपासचे कित्येक मुनि व ऋषिपत्न्या तेथें जमल्या होत्या.

"राजन्, आपण इतके मोहवश होऊं नये." दधीचि ऋषि म्हणाले, "मनुष्यप्राण्याला ज्या शरीरयातना होतात त्या त्याच्या पूर्वकर्मानुसार होतात. या यातनेंतून मनुष्यप्राण्याला मुक्त करण्याचा प्रयत्न आपण केला यांतच आपल्या हातून राजधर्माचं परिपालन झालं आहे."

"मुनिराज ! आपण म्हणतां तें खरं आहे." रामचंद्र म्हणाले, "तरी पण आमच्याकडून राजधर्माचं परिपालन योग्य तऱ्हेनं झालं नाहीं असंच आम्हांला वाटतं. आमच्या अधिकारीवर्गाकडून लोकांच्या औषधोपचाराची सोय तर व्हायला पाहिजेच; पण त्याबरोबरच त्यांनीं प्रजेच्या खाण्यापिण्याची व त्यांच्या इतर शरीरस्वास्थ्याचीहि काळजी घ्यायला पाहिजे तितकी काळजी न घेतल्यामुळंच आजचं संकट आमच्यावर आलं आहे. मुनिराज ! सिंहासनावरचं हें संकट दूर व्हावं असा आपल्या सर्वांचा आम्हांस आशीर्वाद मिळावा !"

"दाशरथे ! " दधीचि मुनि म्हणाले, "आम्ही तपस्वी विनाकारण आशीर्वाद देऊन आमचं तपोबल कमी करीत नाहीं. आमच्या तपोबलानं या बालकाची प्रकृति दुरुस्त करणं आम्हांला कठीण नाहीं. पण जग हें परमेश्वरी इच्छेनंच चाललं पाहिजे असं आम्हांला वाटतं."

"आमच्या तपोबलाचा उपयोग आम्ही वैयक्तिक सुखाकरितां करीत नाहीं. जनतेवर संकट आलं तर तें टाळावं म्हणून जी शक्ति खटपट करीत असेल त्या शक्तीला यश यावं म्हणूनच आम्ही आमच्या तपोबलाचा उपयोग करतों. राजन् ! तूं प्रजाहितरत आहेस हें पाहून आम्हां सर्व तपस्व्यांस संतोष होत आहे. तुझे प्रजाजन तुला कर देतात. आम्ही संपत्तिच जवळ ठेवीत नसल्यामुळं तुला कर देत नाहीं. पण तुझ्या राजदंडाला आमच्या तपोबलाच्या नैतिक सामर्थ्याची नेहमींच जोड असते हें विसरूं नकोस. राजन् ! यावत्कालपर्यंत तुझ्या विचाराचे

राजे सिंहासनावर बसतील तावत्कालपर्यंत तीं सिंहासनं अढळ राहतील. सर्व जनता अशा राजांचे गोडवे गाईल, व आदिपुरुषाचीहि अशा राजांचेवर नेहमीं कृपा राहील असा आम्हां मुनींचा तुला आशीर्वाद आहे."

सम्राटांनीं आपले मस्तक लववून आशिर्वादाचा स्वीकार केला.

वैद्यरत्नांच्या हातांना यश येईल असा रंग दिसूं लागला.

बालकानं डोळे उघडले.

सम्राज्ञींनी बालकाचा मुका घेतला.

"बालकाला आता भीति नाही. यमराजाचे दूत मुनिजनांच्या आशिर्वादानं परत फिरले." वैद्यरत्न म्हणाले.

सम्राज्ञी व सम्राट् आश्रमाचे बाहेर आलीं. त्यांनीं सर्व मुनींना व ऋषिपत्न्यांना पुनः अभिवादन केलें.

"अमात्य," सम्राट् अमात्य चंद्रचूडांना म्हणाले, "प्रजेच्या सर्व बऱ्यावाइटाची जबाबदारी आमच्यावर आहे व ती आम्हांला नीटपणानं पार पाडली पाहिजे. आजचं संकट टळलं ही परमेश्वराची कृपा पण हें संकट आलं याचा अर्थ तुमच्या प्रयत्नांत कुठं तरी चूक झालेली असली पाहिजे. ती आतां तुम्हीं आपल्या हाताखालील इतर अधिकाऱ्यांच्या साहाय्यानं शोधून काढून दुरुस्त करायला पाहिजे."

चंद्रचूडांनीं मस्तक नमविले.

"राजन्, तुझे अधिकारी खरोखरच प्रजाहितदक्ष आहेत. मिळणाऱ्या वेतनाकडेच फक्त त्यांची नजर नाही हें तुला सांगण्यांत आम्हांला आनंद वाटत आहे." गालवमुनि म्हणाले.

"आमचे अधिकारी हे प्रजाहितदक्ष आहेत हें ऐकण्यांत आम्हांला जो आनंद वाटत आहे तो शब्दांनी आम्हाला वर्णन करून सांगता येत नाहीं. आमचं यश आमच्या अधिकारीवर्गाच्या कार्यक्षमतेवर अवलंबून आहे. जनसेवा करण्यांत आमचे अधिकारी आपली पराकाष्ठा करतील अशी आम्हांस आशा आहे." रामचंद्र म्हणाले.

सम्राट् व सम्राज्ञींनीं मुनिजनांना पुन्हां अभिवादन केले.

"राजा! तुझ्यासारखे राजे जोंपर्यंत राजधुरा धारण करतील तोंपर्यंत राजसिंहासनाला कशाचीहि भीति नाही. स्वर्गलोकी परमेश्वराचं साम्राज्य आहे व भूलोकावर तुझ्या मनाचे प्रजाहिततत्पर राजे असावयाला पाहिजेत.

राजा हा परमेश्वराचा भूलोकावरचा प्रतिनिधि आहे. राजन्! तुझ्या मतांचा व तत्त्वांचा यावच्चंद्रदिवाकरौ विजय होत राहील यांत आम्हांला मुळीच शंका नाहीं."

बालकाला बरें वाटलें. सम्राटांची स्वारी वाड्याकडे परत फिरली.

" दाशरथि रामचंद्रकी जय ! " प्रजाजनांनीं जयजयकार केला.

आज ते दिवस गेले, ते लोक गेले. पण दाशरथि रामचंद्रांचें नांव अजरामर झाले आहे !

ज्या ज्या राज्यांत प्रजेच्या हिताची काळजी पूर्णपणें घेतली जाते त्या राज्याला अजूनहि लोक रामराज्य असे म्हणतात !

रामचंद्रजीच्या तत्त्वांचा हा असा विजय झालेला आहे.



# विधवेचें जिणें : : ५

" जरा कुठं घरांत थोडं दुर्लक्ष झालं कीं असा कांहीं गोंधळ होतो. काल रात्रीं बाबूला थोडं बरं वाटत नव्हतं म्हणून तो सारखा मधून मधून रडत होता. त्यामुळं मला रात्रीचं झालं जाग्रण. पहांटेच्या थंड वेळी थोडासा डोळा लागला अन् त्यामुळं उठायला उशीर झाला. उठून पाहतें तों चांगले साडेसात झालेले. जेवणघरांत चहाची गडबड असेल म्हणून पाहायला गेलें तर तिथं आपली सारी सामसूम. आमच्या वन्संबाई आपल्या न्हाणीघरांत. हें पहा, ऐकलं का? आतां पुन्हा आपल्याला एखादी बाई नाही तर ब्राह्मण ठेवायला पाहिजे बरं का! बाबू लहान असल्यामुळं मला मेला घरांतल्या कामाकडे लक्ष द्यायला वेळ मिळत नाही; आणि आमच्या वन्सबाईंना तर कामाचा मुळींसुद्धां उरक नाहीं. माहेरीं वडिलांच्या वेळीं होती गडगंज श्रीमंती म्हणून त्या वेळेस झाले असतील लाड! पण लगीन झाल्यावर सासरीं तरी नको होतीं का यांना घरांतलीं कामं शिकायला? बरं, नशिबाच्या तरी धड असायच्या होत्या! हं—बोलून तरी काय करायचं बाई! लोक म्हणतील—घरीं परत आलेल्या नणंदेला ही अगदीं सुख लागूं देत नाहीं. पण यांचे गुण दिसतात का कुणाला कांहीं तरी?"

वरील गडगडाट कां होत होता हें कुणालाहि न सांगूनसुद्धां समजण्यासारखें आहे.

आमडापूरला रावसाहेब सुखात्मे म्हणजे एक प्रतिष्ठित सात्त्विक गृहस्थ राहत होते. वळण बाळबोध पण नवीन गोष्टींची हौस, असा सुखात्म्यांचा स्वभाव होता. सुखात्म्यांनीं वकीलींत बराच पैसा मिळविला असावा अशी लोकांत बोलवा होती व त्यांत बरेंच तथ्यहि होतें. सुखात्म्यांचा स्वतःचा असा टुमदार बंगला होता, शेंदडिशें एकर जमीन होती, व कांहीं नाहीं म्हटलें तरी त्याचे बँकेंत पंचवीस ते तीस हजार रुपये शिल्लक होते. सुखात्म्यांचा स्वभाव जरा खर्चिक होता. त्यामुळें त्यांचा इतका पैसा शिल्लक राहिला हेंच नाहीं तरी पुष्कळ झालें.

रावसाहेब सुखात्मे हे सरासरी दहा वर्षे आमडापूरच्या म्युनिसिपालिटीचे

अध्यक्ष होते; व तेथील काम ते निःपक्षपातानें व चोख रीतीनें करीत असा त्यांचा लौकिक होता. सुखात्म्यांनी राजकारणांत कधींहि भाग घेतला नाहीं. पण राजकारणांत पडणारे लोक त्यांना मान देत व वेळ पडल्यास त्यांचा सल्ला घेत. सरकारनेंहि त्यांना पलीकडल्या नूतन वर्षाच्या पदवीदान-समारंभांत 'रावसाहेब' ही पदवी दिली होती.

रावसाहेबांना दोनच अपत्यें. वडील मुलगी शान्ताबाई व तिच्यापेक्षां दोन वर्षांनी लहान असणारा त्यांचा मुलगा शान्ताराम.

रावसाहेबांचें कुटुंब रावसाहेब पसतीस वर्षांचे असतांनाच वारले. त्या वेळीं शान्ताबाई सतरा वर्षांची होती व शान्ताराम पंधरा वर्षांचा होता. जनरूढी-प्रमाणें सुखात्मे पुन्हा लग्न करतील ही जवळजवळ सर्वांनाच खात्री होती. तरुण वय, व बराच पैसा जवळ असल्यामुळें पुष्कळ प्रौढ सुशिक्षित कुमारिकांना हें चांगले स्थळ आहे असें वाटूं लागलें; व त्यासंबंधाने त्यांच्या नातेवाइकांनीं व इष्टमित्रांनीं लांबून लांबून चौकशीहि सुरू केली. सुखात्म्यांच्या एका सुधारक मित्रांनीं त्यांना विधवापुनर्विवाह करावयास सुचविलें. सारांश काय, कीं सुधारकांनी व दुर्धारकांनींहि सुखात्म्यांना पुन्हा " गृहस्थाश्रमी " करण्याकरितां कसून प्रयत्न सुरू केले.

" मी कांहीं बुवा सुधारकहि नाही, अन् दुर्धारकहि नाहीं. मी आपला साधाभोळा मनुष्य आहें. आतां यापुढं मी जें लग्न करणार तें कोणत्याहि मुलीच्या सौंदर्याकडे व शिक्षणाकडे पाहून करणार; व जी बाई आतां माझ्याशीं लग्न करायला तयार होईल ती माझ्या पैशाकडे पाहून होणार. आपल्या— नव्या म्हणा किंवा जुन्या म्हणा— लग्नं जुळविण्याच्या पद्धतींना आपण कितीहि गोंडस नांवं दिलीं तरीं त्यांचं हें अत्यंत स्पष्ट असं व्यवहारी स्वरूप थोडंच नाहींसं होणार आहे. माझी प्रथम पत्नी अशिक्षित होती, पण तिच्याविषयीं मला आदर होता. माझ्याबरोबर गरिबींतही तिनं आनंदानं दिवस काढले आणि तिच्याच बिचारीच्या भाग्यानं मला पुढं चांगले दिवस आले. आतां माझ्याशीं जी बाई लग्न करायला तयार होईल ती निव्वळ माझ्या पैशाकरितां तयार होईल. अशा स्त्रीसंबंधानं मला कधींहि आदर वाटायचा नाहीं; व मला तिला सुखीहि करतां यायचं नाहीं. पुरुष हे स्त्रियांच्या सौंदर्याकडे उपभोग्य वस्तु या दृष्टीनं पाहतात हें जितक्या बाबतींत खरं आहे, तितकंच लग्नाचा विचार करतांना स्त्रियाहि वराच्या श्रीमंतीकडे व त्याच्या इभ्रतीकडे पाहतात हेंहि खरं

आहे. शिवाय मला आतां दोन मुले आहेतच; तेव्हां आतां त्यांच्याच कल्याणाकडे मीं लक्ष दिलं म्हणजे झालं."

वरील विचारसरणी पुढें करून सुखात्म्यांनी पुन्हा लग्न करणें टाळलें. त्यामुळें जुन्या चालीचे लोक व सुधारक दोघेहि त्यांचेवर रुष्ट झाले.

सुखात्म्यांची पत्नी वारली त्यापूर्वीं ती एक-दोन वर्षें साधारण आजारीच होती. आपल्यादेखत शान्ताबाईचे लग्न व्हावें असा त्यांनी आपल्या पतीजवळ जवळजवळ हट्टच धरला; व आपल्या प्रिय पत्नीची आजारीपणांतील इच्छा पूर्ण करण्याकरितां सुखात्म्यांनी मुलीकरितां स्थळें पाहावयास सुरवात केली. मुलगी देखणी व साधारण शिकलेली होती, व सुखात्मे लग्नाकरितां पैसाहि खर्चावयाला तयार होते. मग काय—अधिकस्याधिकं फलम् ! सुखात्म्यांना स्थळहि चांगले मिळालें. सुगणपूरचे मालगुजार अप्पासाहेब याच्या सर्वांत धाकट्या मुलाला शान्ताबाई देण्याचें ठरलें.

शान्ताबाईचें लग्न मोठ्या कडाक्यानें झालें. आपल्याला चांगला जांवई मिळाल्यामुळें रावसाहेबांच्या पत्नीला फारच आनंद वाटला. लग्नानंतर थोड्याच दिवसांनी रावसाहेबीणबाईनीं या जगाचा समाधानानें निरोप घेतला.

शान्ताबाईच्या लग्नानंतर पांच-सहा वर्षें ठीक गेली. शान्ताबाईची पत्रिका तिच्या पतीच्या पत्रिकेशीं फारच चांगल्या तऱ्हेने जमली होती. शान्ताबाईचे यजमान कॉलेजमध्यें वैद्यकीचा अभ्यास करीत होते. लक्ष्मीनारायणाचा जोडा (शान्ताबाईचे सासरचें नांव लक्ष्मी असे ठेविलें होतें व तिच्या पतीचें नाव नारायणराव होते.) अगदी 'लक्ष्मीनारायणा'सारखा दिसतो असे सर्व लोक म्हणत.

शान्ताराम—रावसाहेबांचा एकुलता एक मुलगा—साधारण अशक्तच होता. मोठ्याचा एकुलता एक मुलगा— मग त्याचे फार लाड झाले यांत नवल तें कसले ? आई वारल्यानंतर तर रावसाहेबानी शान्तारामाचे फारच लाड केले. या सर्व गोष्टींचा परिणाम असा झाला कीं, शांतारामाचा प्रवेशपरीक्षेपलीकडे फारसा अभ्यास झाला नाहीं. आपल्या मुलाला अभ्यास झेंपत नाहीं हें पाहून रावसाहेबांनींहि मुलाला अभ्यासाचा आग्रह केला नाही.

पत्नीच्या मरणानंतर लवकरच रावसाहेबांनीं शान्तारामाचें लग्न करून दिलें. शान्तारामाची बायको अत्यंत सुंदर होती व शान्ताबाईनेंच ही मुलगी आपल्या भावाकरितां पसंत केली होती. नलिनी (शांतारामाची बायको)

व शान्ताबाई दोघीहि एकाच वेळी शाळेत होत्या. नलिनी शान्ताबाईपेक्षां चार पांच वर्षांनीं लहान होती व शाळेतहि ती शांताबाईच्या बरीच मागें होती. इतकें असूनसुद्धां शांताबाईची व नलिनीची फारच मैत्री असे. शाळेंतल्या मुली या मैत्रिणींना The Inseparables असें थट्टेनें म्हणत. नलिनीचे आईबाप गरीब होते; पण शान्ताबाईनें नलिनीला कशाचीहि उणीव भासूं दिली नाहीं. नलिनी आपली वहिनी व्हावी अशी शान्ताबाईची उत्कट इच्छा होती व तिनें या संबंधांत नलिनीची संमतीहि घेऊन ठेवली होती. रावसाहेबांना हुंड्याचा प्रश्न नव्हताच. नलिनीसारखी सुंदर मुलगी आपल्याला बायको मिळते आहे हें पाहून शान्तारामहि खूष होते. अशा रीतीनें शान्ताबाईच्या खटपटीनें नलिनीचे लग्न शान्तारामाशी झालें व शान्ताबाई नलिनीला नलिनीवहिनी म्हणूं लागली.

रावसाहेबांनी वकिली जवळजवळ सोडलीच होती. आपले म्युनिसिपालिटीचे काम करावें व उरलेला वेळ कांहीं वाचन करण्यांत घालवावा, व आपल्या मुलाचें व सुनेचें कौतुक करावें हा त्याचा नेहमींचा कार्यक्रम असे. शांताबाई माहेरपणाला आली—आणि नलिनीवहिनीच्या आग्रहामुळें ती वर्षांतून दोनतीन वेळ तरी माहेरी येत असे—म्हणजे नणंदाभावजयांच्या गप्पांना ऊत यायचा. नलिनीचा बहुतेक वेळ शान्तावन्संच्या तैनातीत व त्याचं "हवं-नको" करण्यांत जायचा. रावसाहेबांना मुलींची ही मैत्री पाहून फारच आनंद वाटत असे.

"सध्यां मी फारच सुखी आहे बुवा!" रावसाहेब म्हणत. अशा तऱ्हेनें सुखाचे दिवस जात होते.

× × ×

रावसाहेबांचें हें सुख दैवाला फार दिवस पाहवलें नाहीं. रावसाहेब मध्येच तापानें आजारी पडले. दुखणे साधारणच असेल म्हणून पहिल्यानें चालढकलच झाली; पण पुढें तो ताप न्युमोनिया ठरला तेव्हां रावसाहेब घाबरले. औषधें सुरू झालीं. या वेळीं डॉ. चांदोरकरांच्या हाताला यश यावयाचें नव्हतें. डॉक्टर चांदोरकर हे प्रख्यात डॉक्टर. लोक त्यांना अश्विनीकुमार म्हणत. पण जेथें आयुष्याचीच रेषा तुटली तेथें मर्त्यलोकांतील डॉक्टर चांदोरकर तरी काय करणार? तापाच्या एकविसाव्या दिवशीं बेशुद्धावस्थेंतच सुखात्म्यांनीं या नश्वर जगाचा त्याग केला.

दैवदुर्विलास येवढ्यावर संपला नव्हता. इकडे रावसाहेब आजारी असतांनाच तिकडे मुंबईला शान्ताबाईचे यजमान टायफॉइडनें आजारी पडले. आपल्या वडिलाच्या शुश्रुषेची सर्व जबाबदारी नलिनीवहिनीवर टाकून, शान्ताबाई मुंबईला निघून गेली. आपलें सौभाग्य अखंड राहावें म्हणून शान्ताबाईनें सर्व देवांना नवस केले. मुंबईचे सर्व धन्वन्तरी बोलावले गेले; पण परलोकचें वॉरंटच आल्यामुळें या लोकांतील सर्व लोकांचे सर्व प्रयत्न फुकट केले. शान्ताबाईचा सौभाग्यरवि एकदम अस्तंगत झाला ! शान्ताबाई दोन्हीकडून बुडाली.

सूर्यनारायण पुन्हा उगवला व पुन्हा मावळला. सुखाच्या शिखरावर बसलेलें रावसाहेबांचें कुटुंब त्यानें पाहिलें. त्याला आनंद झाला, पण त्यानें आपल्या कर्तव्यांत कधीहि अळमटळम केली नाहीं. रावसाहेबांचें कुटुंब अगदीं दुःखाच्या सागरांत बुडालें तरी त्याचें काम आपलें जसेंच्या तसेंच चालू राहिलें. मोठालीं राष्ट्रें उदयाला आली, व तीं रसातळाला गेली रावणासारखे राजे झाले व गेले. पण सूर्यनारायण मात्र नेहमींप्रमाणेंच ठरलेल्या वेळीं पूर्वेला उगवला आहे व पश्चिमेला मावळत आहे.

× × ×

शान्ताबाई आपल्या सासरीं परत गेली. शान्ताराम तिला भेटावयाला गेला होता. शान्ताराम कसा झाला तरी शान्ताबाईपेक्षां लहानच. तो बिचारा आपल्या बहिणीचें काय सांत्वन करणार ! आणि शिवाय हिंदुसमाजांतील निपुत्रिक पण तरुण विधवेचें दुःख शान्तारामाला काय व कसें समजणार ! ती कल्पना प्रत्यक्ष परमेश्वराला देखील यावयाची नाहीं. ती कल्पना फक्त हिंदु कायद्याचे मुकद्दमे भांडणाऱ्या वकिलांना व त्या मुकद्दम्यांचे निकाल देणाऱ्या न्यायाधीशांनाच येणार.

जनरूढीप्रमाणें शान्तारामानें आपल्या बहिणीला घरीं येण्याचा आग्रह केला; पण शंकररावांनीं ( शान्ताबाईच्या वडील दिरांनीं ) शान्तारामाच्या बेतांत मोडता घातला.

"हें पहा, शान्ताराम," शंकरराव म्हणाले, "झालं हें वाईट झालं. आमचा सर्वांत धाकटा भाऊ जावा, व आम्हां वडील भावांना त्याला अग्नि द्यावा लागावा हें या कलियुगांतील पुण्यक्षयाचंच लक्षण आहे; असं जरी असलं तरी आमच्या जिवांत जीव असेतोंपावेतों आम्हीं वहिनीला अंतर देणार नाहीं. आमचा नाना गेला. एखादं मूलबाळ झालं असतं तर बरं झालं असतं. असो.

नव्हती परमेश्वराची इच्छा ! तरी पण आतां आम्हांला वहिनी हीच नानाच्या जागीं आहे!"

शान्ताबाईनीं सुगणपूरला आपल्या सासरींच राहावें ही कल्पना पार्वती-बाईंना म्हणजे शंकररावांच्या पत्नीलाहि पसंत नव्हती. पण शंकररावांचा तसा आग्रहच पडला; व शान्ताबाईनाहि अशा स्थितीत माहेरीं जाणें पसंत पडलें नाहीं. शान्ताराम जसे आले तसे परत गेले.

एखाद्या हिंदु विधवेला साजेसा कार्यक्रम शान्ताबाईनीं आपल्यापुढें ठेवला. सकाळीं उठून थोडीशी प्रार्थना करून त्या ज्या गृहकृत्यांत मग्न होत त्या रात्रीं निजावयाच्या वेळेपर्यंत. गृहकृत्यें व दिरांच्या मुलांची उस्तवार यापलीकडे हिंदु विधवेला दुसरें काय जीवन आहे !

प्राप्त परिस्थितींतहि शान्ताबाई समाधानानें राहत होत्या. आपले दिर शंकरराव हे मधूनमधून आपल्याकडे चमत्कारिक पद्धतीनें पाहत असतात असा संशय शान्ताबाईंना मधूनमधून येई; व त्यामुळें त्यांच्या मनाला थोडासा त्रास होई.

एके दिवशी पार्वतीबाई कोणत्याशा शेजारणीकडे बोडणाकरितां गेल्या होत्या. ऐन मध्यान्हीची वेळ असल्यामुळे बाहेरील दारें बंद करून शान्ताबाई माजघरांत महाभारत वाचीत बसल्या होत्या.

शंकररावांना जी पाहिजे होती ती संधि आज चालून आली होती. नव्हे असा योग त्यानीच आपल्या कौशल्यानें जुळवून आणला होता. जेवण झाल्या-वर बाहेर जाण्याचें निमित्त करून घरांतच आपल्या माडीवरल्या सामानाच्या खोलींत ते बसून राहिले होते; व ते घरीं नाहीत अशाच समजुतीनें शान्ताबाई अगदीं मोकळ्या मनानें घरांत वावरत होत्या.

"काय वहिनी, महाभारत वाचतेस होय ?" शंकररावांनीं शान्ताबाईंना विचारलें.

शान्ताबाई चपापल्या व बावरल्या. आपण कोणत्या परिस्थितींत आहोंत याची त्यांना कल्पना आली. आपण आतां जरी कितीहि ओरडलों तरी आपला आवाज बाहेर ऐकूं जाणें शक्य नाहीं हें शान्ताबाईंच्या लक्षांत आलें.

शान्ताबाईनीं क्षणभरच विचार केला व पुढें कसें वागावयाचें हें ठरविलें. अशा अडचणीच्या वेळीं कसा रस्ता काढावयाचा हें स्त्रियांनाच चांगलें समजतें.

"या भाउजी! बसा इथेंच पाट घेऊन. मी महाभारतच वाचतें आहे." शान्ताबाईनीं आपले विशाल नेत्र शंकररावांकडे लावले व म्हणाल्या.

शंकरराव चपापले. आपण चुकलों कीं काय असें त्यांना वाटलें. त्यांची कल्पना शान्ताबाई ओरडेल व नंतर वेळ पडल्यास जबरदस्तीनें आपल्याला कार्य-भाग उरकून घ्यावा लागेल अशी होती.

"काय वहिनी! तुमच्या महाभारतांत नियोग-पद्धतीचा इतिहास सांगित-लेला आहे व त्याची उपयुक्तताहि वर्णन केलेली आहे, नाही? आम्ही कॉलेज-मधें असतांना हें वर्णन वाचलं होतं. निपुत्रिक विधवेनं वंश चालविण्याकरितां आपल्या दिराकडून संतानोत्पादन करून घेतल्याचे महाभारतांत पुष्कळसे दाखले आहेत; नाहीं?"

"होय; पुष्कळ तसे दाखले आहेत भाउजी; पण माझ्यासंबंधानं म्हणाल तर तुमचीं मुलंच मला माझ्या मुलासारखीं आहेत. तेव्हां मला आता संतानो-त्पादन करून घेण्याची जरूरीच नाहीं. पण मला वाटतं भाउजी तुमच्या मनांत दुसरंच कांहीं तरी आहे. होय ना? तुम्हांला मी पाहिजे आहे ना?" शान्ता-बाई स्पष्टपणे बोलत होत्या शान्तपणें त्यांनी आपली पवित्र नजर शास्त्रं मुखोद्गत असलेल्या त्या सैतानाकडे लावली होती.

शंकररावांची नजर आपोआप खालीं गेली. पवित्र नजरेला नजर भिड-विण्याची ताकद त्यांच्या पापी मनामध्यें असणें शक्यच नव्हतें.

"होय." अर्धस्फुट शब्दांत शंकररावांनी उत्तर दिले.

"भाउजी, मला या घरांतच राहायचं आहे; तेव्हां मला तुम्हांला नाखूष करून कसं चालेल! तुम्हांला जे पाहिजे तें मिळेल, पण तें योग्य जागी व योग्य वेळीं मिळेल! झालं ना आतां तुमचं समाधान."

शान्ताबाई धीटपणाच्या शान्ततेनें बोलत होत्या. शंकरराव भिऱ्या शान्त-तेनें ऐकत होते.

"हं! चला भाउजी! माझी वाट सोडा. मी तुम्हांला सांगायचं तें सांगितलं आहे. तुम्हांला जें पाहिजे आहे तें मिळेल हें लक्षांत असूं द्या. पण वेळ ही नव्हे. हं भाउजी व्हा बरं बाजूला."

शान्ताबाई उठल्या व चालूं लागल्या. त्यांची दृष्टि शंकररावांच्या चेहऱ्यावर खिळली होती.

शंकरराव खालीं पाहत होते. शान्तपणानें शान्ताबाई त्यांच्या अंगावरून

माजघरांतून बाहेर निघून गेल्या व समोरच्या दारानें दरवाजाच्या बाहेर पडल्या.

शंकरराव तेथेंच उभे होते. काय झालें हें त्यांचें त्यांनाच कळेना.

अत्यंत मोठ्या संकटांतून शान्ताबाई आपल्या चारित्र्याच्या जोरावर बाहेर पडल्या होत्या.

× × ×

शान्ताबाईंनी आत्तांपर्यंत धैर्य धरलें होतें, पण आतां मात्र त्या घाबरल्या. घराच्या बाहेर पडतांच त्या सरळ देशमुखांचे वाड्यांत गेल्या. देशमुखांच्या सरस्वतीबाई या वयानें चांगल्या पोक्त व शहाण्या होत्या. शान्ताबाईंना त्या नेहमी सूनबाई म्हणत.

" काय झालं ग सूनबाई तुला ? अशी बावरल्यासारखी काय दिसते आहेस ? अन् इतक्या भर उन्हांत घराच्या बाहेर ग कशाला पडलीस ! "

शान्ताबाईंना रडं आवरेना. संकटांत मनुष्य बेदरकारपणानें वागतो पण सहानुभूतीचा ओलावा मिळाला म्हणजे मग त्याच्या हृदयाचा बांध फुटतो !

" माई ! शेताचं कुंपणच शेत खाऊन टाकायचे प्रयत्न करूं लागलं म्हणून अशी तांतडीनं बाहेर आलें मी ! " शान्ताबाई म्हणाली.

सरस्वतीबाईंनी सर्व कांही ओळखलें. स्त्रीचे हृदय ! वितीच्या सहवेदना स्त्रीशिवाय दुसऱ्या कुणाला समजणार ?

आपल्या लहान मुलाला बरोबर देऊन सरस्वतीबाईंनी शान्ताबाईची त्यांच्या माहेरीं रवानगी करून दिली.

संध्याकाळपर्यंत शान्ताबाई घरी परत आल्या नाहींत, तेव्हां शंकरराव चपापले. गांवभर शोध झाला. शान्ताबाईस संध्याकाळच्याच गाडीनें माहेरीं पाठविली असें सरस्वतीबाईंनीं शंकररावांना स्पष्ट सांगितलें. सरस्वतीबाईंनीं असे कां केले हें विचारावयाची हिम्मत शंकररावांना झाली नाही.

शान्ताबाई माहेरी आल्या. याच घरांत शान्ताबाईचा जन्म झाला होता. याच घरांत शान्ताबाई मालकीण म्हणून राहिल्या होत्या. याच घरांत शान्ताबाईंच्या नलिनीवहिनी लग्नापूर्वी पाहुण्या म्हणून आल्या होत्या. याच घरांत शान्ताबाईचे कोडकौतुक रावसाहेबांनीं केलें होतें. आणि याच घरांत आतां शान्ताबाई चोरट्यासारख्या ओशाळ्या होऊन राहावयाला आल्या होत्या ! आतां हें घर नलिनीवहिनींचें होतें व शान्ताबाई परक्या होत्या.

सासरचाच नित्यक्रम शान्ताबाईनें माहेरीहि अंगिकारला. शान्ताबाईना नलिनीवहिनींनी कांहीं दिवस बरें वागवलें; पण पुढें पुढें त्यांना शान्ताबाईचा रागहि येऊं लागला. नलिनीवहिनी या कशा झाल्या तरी मालकीणबाई! शान्ताबाईंनीं त्यांच्या आज्ञा नको का नेहमीं पाळावयाला! गोष्टीच्या सुरवातीचा गडगडाट नलिनीबाईंचा होता. बाहेरहि गडगडाट होत होता, व विजा चमकत होत्या.

* * *

" शान्ता! आतांशा फार त्रास होतो बुवा तुझा आम्हांला!" एके दिवशीं शान्ताराम आपल्या बहिणीला म्हणाले, " असा दररोज जर घरांत धिंगाणा चालूं राहिला, तर मला घरांतून पळून जावें लागणार आहे."

" पण शान्ताराम, मी तरी काय करूं रे! मी कशीहि वागलें तरी तें वहिनींना पसंतच मुळी पडत नाहीं मी वहिनीपेक्षां वयानं मोठी आहे व या घराची मला माहितीहि आहे."

" शान्ता! वय जास्त असलं म्हणजे अक्कलहि जास्त असतेंच असं नाहीं. आणि शिवाय नलिनी ही आतां या घराची मालकीण आहे. तिच्या तंत्रानं घरांतल्या साऱ्या गोष्टी नको का व्हायला?"

" पण मी कोणीच का नाही शान्ताराम घरांतली? माझा कांहीच का नाहीं हक्क इथं?" शान्ताबाईंनी अगदीं केविलवाण्या मुद्रेनें आपल्या भावाला विचारलें. " अरे, तूं व मी रावसाहेबांचीं दोन्ही मुलंच ना? मग मी अगदी हीच झालें का रे घरांत?"

" आतां तसं म्हटलं तर घरांत तुझा कांहींच हक्क नाहीं. अन् तूं नलिनीला जर असाच त्रास देत राहिलीस तर मला तुझी कांही तरी दुसरी सोय करावी लागेल." शान्ताराम म्हणाले.

प्रत्यक्ष आपल्या वडिलाच्या घरांत आपला कांहींच हक्क नाही हें अत्यत कठोर सत्य शान्ताबाईंना आजपर्यंत माहीत नव्हतें. कायदा हा नेहमींच न्यायी असतो अशीच त्या साध्या भोळ्या बाईची कल्पना होती.

* * *

शान्तारामांच्या घराजवळच परांजपे वकील राहत होते. परांजपे तरुण होते व हुषारहि होते. परांजपे वकिलांची पत्नीहि सुशिक्षित होती. परांजपे सहकुटुंब शान्तारामाकडे नेहमीं येत असत. अशाच एका रविवारीं अप्पासाहेब

परांजपे आपल्या पत्नीसह शान्तारामाकडे आले होते. सर्व मंडळी हॉलमध्यें बसली होती. निरनिराळ्या विषयावर वादविवाद होत होता.

" तर मग अप्पासाहेब, आमच्या शान्ताला आपल्या दिरावर पोटगीचीच फक्त फिर्याद करतां येईल म्हणतां ? "

" तसा कायदाच आहे शान्ताराम." अप्पासाहेब म्हणाले, " शान्ताबाईंना वैधव्य येण्यापूर्वी जर एखादा मुलगा झाला असता तर बरं झालं असतं. पण सध्यांच्या परिस्थितींत शान्ताबाईंच्या पतीच्या मरणा नंतर सर्व इस्टेटीवर शंकररावांचीच मालकी झाली. आतां शान्ताबाईंना फक्त पोटगीचीच फिर्याद करतां येईल; पण तीसुद्धां तुम्ही करूं नये असं माझं मत आहे."

" तें कां ? " नलिनीबाईंनीं विचारलें.

" कारण मुकद्दमा एकदां सुरू झाला म्हणजे शंकरराव शान्ताबाईंच्या चारित्र्यावर शितोडे उडवायला कमी करणार नाहींत व अशा वेळीं भीक नको पण कुत्रं आवर अशी स्थिति होईल."

" अग बाई ऽ ऽ " वकिलीणबाई उद्गारल्या. नलिनीबाई स्तब्ध बसल्या. शान्ताराम उदास झाले. वकीलसाहेबांनीं चिरूट पेटविला.

" पण शान्ताबाईसारख्या तरुण विधवांनीं पुनर्विवाह तरी करावा म्हणतें मी ! " नलिनीबाई म्हणाल्या.

" होय ! हा एक मार्ग आहे. पण विधवांचेबरोबर लग्न करायला कितीसे लोक तयार असतात. सध्यां आपल्या समाजांत कित्येक कुमारिका लग्नाकरितां वाट पाहत आहेत. लग्न जमवितांना तिचं रूप, तिचं शिक्षण व मुलीकडून कोणत्या तरी रूपानं येणारा किंवा येण्याची शक्यता असणारा पैसा याच गोष्टींकडे पुरुष जास्त लक्ष देतो."

" पण सुशिक्षित स्त्रियासुद्धां भावी पतीच्या पैशाकडे पाहूनच लग्न करतात कीं नाहीं ? " शान्तारामांनीं मध्येंच प्रश्न केला.

" या वेळी मी सुशिक्षित स्त्रियांचा Defence देत नाहीं आहें. तेव्हां तो मुद्दा येथें अप्रस्तुत आहे. लग्नाच्या संबंधांत पुरुष कसा वागतो हें मी तुम्हांला सांगतों आहें. वरील तीन गोष्टीपैकीं दोन गोष्टी फारच थोड्या विधवांचेजवळ असतात. प्रथमविवाह लवकरच झाल्यामुळं व पुढं अगदींच निराळ्या परिस्थितींत वावरावं लागल्यामुळं त्या शिक्षणांत फारच मागं पडलेल्या असतात. तसंच लग्न झाल्यावर माहेरचा हक्क जातो, व निपुत्रिक असतांना जर वैधव्य आलं तर

सासरचाहि हक्क जातो. तेव्हां एकत्र कुटुंबांतील विधवेजवळ पैसाहि असण्याचा संभव नसतो. बरं, आपल्या समाजांत अशा विधवेला.पुरुषांची ओळखहि होणं शक्य नसतं. तेव्हां तिच्या गुणांवर लुब्ध होऊन एखादा मनुष्य अशा स्त्रीशीं विवाह करायला तयार होण्याचा संभवहि कमी असतो. त्यांतून तिनं अशी एखादी ओळख करून घेण्याचा प्रयत्न केल्यास तिच्यासंबंधानं नाहीं त्या अफवा उठायला लागतात. सारांश काय, की एकत्र कुटुंबांतील तरुण विधवेला पुनर्विवाह करायची मनांत इच्छा असली तरी ती गोष्ट जुळून येणं फारच कठीण असतं."

"पण त्याना पुढं शिक्षण घेऊन एखादा पोटाचा धदा शिकायला काय हरकत आहे म्हणते मी?" वकिलीणबाईनीं विचारलें.

"हीहि गोष्ट थोडीशी कठीणच आहे. वरीचशी वर्षं संसारांत घालविलेलीं असल्यामुळं अभ्यास करण्याकरितां जी एक तऱ्हेची मनाची तयारी असावी लागते ती तयारी विधवेची होणं शक्य नसतं. कांहीं बायकांना ही गोष्ट शक्य असेल, पण पुष्कळांना ती अशक्य असते." अप्पासाहेब म्हणाले.

"मग आपल्या समजांतील विधवा स्त्रियांची स्थिति सुधारण्याचा उपाय तरी काय?" शान्तारामांनी विचारलें

"उपाय फारच सोपा आहे, व तितकाच तो कठीण आहे. हिदु कायद्यांत बायकांना जोंपर्यंत वारशाचे हक्क नाहींत तोपर्यंत स्त्रियांच्या समान हक्काच्या गोष्टी व्यर्थ आहेत. समान हक्क म्हणजे वडिलार्जित इस्टेटीतसुद्धां हक्क पाहिजे. पण अशा तऱ्हेचा कायदा सुधारण्याचा प्रयत्न रावसाहेब हरविलास शारदा यांच्यासारख्या एखाद्या मनुष्यानं केला, कीं सारीं शास्त्रीमंडळं हिदुधर्मावर घाला पडला असा हाहाःकार करूं लागतात."

"तुम्ही वकील आहांत अप्पासाहेब कसं झालं तरी. तेव्हां तुम्ही आपली बाजू उत्तम रीतीनं आमचेपुढं माडतां आहांत!"

इतक्यांत शान्ताबाईनी चहा आणला. शान्ताबाईच तेथें आल्यामुळें संभाषणाला एकदम निराळेंच रूप आलें. हॉलमध्यें वकीलसाहेबांच्या खुर्चीजवळचीच खुर्ची रिकामी असल्यामुळें शान्ताबाई अगदी साहजिकपणानें त्या खुर्चीवर बसल्या. पण येवढी लहानशी गोष्ट नलिनीबाईना व वकिलीणबाईनाहि पसंत पडली नाही!

स्त्रीजातीचा सर्वांत मोठा वैरी म्हणजे स्त्रीजातच होय!

हवापाण्याच्या गोष्टी सुरू झाल्या. या गोष्टी आणखी कांहीं वेळ चालल्या असत्या, पण वकीलसाहेबांनीं शान्ताबाईनीं केलेल्या चहाची स्तुति करायला सुरवात केली. ही गोष्ट वकिलीणबाईंना पसंत पडली नाहीं. आपलें डोकें दुखत आहे असें सांगून त्या उठल्या. त्यामुळे सभा तेथेंच बरखास्त झाली.

कांहीं तरी कारणामुळें नलिनीवहिनी शान्तावन्संवर पुन्हा रागावल्या होत्या.

" शान्ता, आहे तरी काय तुझ्या मनांत ! सासरहून भांडून इथं आलीस, आणि आतां आमच्या मागं लागली आहेस. असा आम्हीं तुझा अपराध तरी काय केला आहे ? अन् आतांशी तूं अप्पासाहेबांशीं ज्या तऱ्हेनं वागतेस ती तऱ्हा बरी नव्हे बरं शान्ता ! कां विनाकारण वकीलसाहेबांच्या सुंदर संसाराला तूं आग लावतेस ? " शान्ताराम चिडून म्हणाले.

शान्ताबाई अगदी सुन्न झाल्या. आपल्या सरळ वागण्याचा अशा तऱ्हेचा अर्थ आपला पाठचा भाऊ करील अशी त्यांना कल्पनाहि नव्हती.

* * *

कर् टण् ......कर् टण् ...... घड्याळांत दोहोंचे ठोके पडले. शान्ताबाई जागयाच होत्या. आतां त्यांना रडूंच येत नव्हतें.

मग करूं तरी काय मी ! अशी परत सासरी जाऊं का ? पण तिथं भाउजी ! त्यांचं जर मी ऐकलं तरच माझी घरांत सोय होईल, व लोकांच्याहि दृष्टीनं मी नीतिमान् ठरेन. जाऊं का मी तिथं ?

छी–छी ! काय ही कल्पना ! मग पुनर्विवाह ? पण माझ्याशीं आतां लग्न तरी कोण करणार आणि आतां लग्न करायचं तें म्हणजे पोटभर खायला मिळावें म्हणूनच ना ? मग अशा तऱ्हेचं लग्न म्हणजे एक तऱ्हेनं आपली कायाच विकणं नव्हे का ?

आतां मी वागूं तरी कशी ? वहिनीला मी नको व म्हणून दादाला मी नको. मला कांहीं फारसं शिक्षण नाहीं म्हणून नोकरी करतां येत नाही.

......मग ? मग ? पुढें काय ? छे ! छे ! मन आज फारच भडकलं ! श्रीराम ! श्रीराम !!......

दुसरे दिवशीं शान्ताबाई घरीं नव्हत्या. शान्तारामांनीं थोडासा शोध केला व स्वस्थ बसले.

कांहीं दिवसांनंतर शान्तारामांना कळलें, कीं शान्ताबाई उत्तर हिंदुस्थानांतील एका विधवाश्रमांत आहेत.

रावसाहेब सुखात्म्यांची मुलगी व श्रीमंत सुगणपूरकरांची सून विधवाश्रमांत आपल्या आयुष्याचे शेष दिवस काढीत आहे व त्या दोघांचेहि मुलगे आपल्या इस्टेटींचा उपभोग घेत आहेत! शान्ताबाई जर मुलगा असत्या तर रावसाहेबांची अर्धी इस्टेट त्यांना मिळाली असती!

शान्ताबाईचे यजमान जिवंत असते तर त्या सुगणपूरच्या इस्टेटीच्या अर्ध्या हिश्शाच्या त्या मालकीणबाई झाल्या असत्या!

पण त्या मुलगाहि नाहीत व त्यांचे पतीहि परलोकी गेले असल्यामुळें त्या विधवा झाल्या आहेत!

म्हणून त्यांना रावसाहेबांच्या इस्टेटींतहि हक्क नाहीं व सुगणपूरकरांच्या इस्टेटींतहि हक्क नाहीं!!

शान्ताबाई या एकत्र कुटुंबांतील एक तरुण विधवा आहेत.

म्हणूनच त्यांचे नशिबी विधवाश्रमांत दिवस काढणें आलें आहे.

आणि सध्यांचा आम्हां हिंदूंचा कायदाहि असाच आहे!!



# वांटणीचा दावा : : ६

तसें म्हटलें तर माधवराव पाटलांचें घराणें घरंदाज व श्रीमंत आहे. ऐन मराठ्यांच्या अमदानींत माधवरावांच्या पूर्वजांनीं खूप मुलुखगिरी केली होती असें माधवराव म्हणतात, आणि तें खरेंहि होतें. ऐन इंग्रजीच्या सुरवातीला मराठ्यांची वाताहत झाली व माधवरावांचे पणजोबा मध्यहिंदुस्तानांतून मध्यप्रान्तांत आले. काल बदलला तशी पाटलांच्या हातची तरवार गेली व नांगर हातीं आला. तरी पण पाटलांच्या घराण्यांतील पिढीजात लष्करी ऐट, धाडसाची व भांडणाची आवड मात्र कायम राहिली. मध्यप्रान्तांत आल्यावर पाटील घराण्यानें इंग्रज सरकारच्या अधिकाऱ्यांना वेळोवेळीं मदत केली, व सरकारनेंहि त्यांच्या मदतीचें चीज केलें. पाटील घराण्यानें पुष्कळशीं गांवें मालगुजारी हक्कानें मिळविली. 'लेनदेणं' सुरू केलें व कांहीं गांवांतून कपड्यांचीं दुकानेंहि उघडलीं.

पाटील घराण्यावर जशी लक्ष्मीची कृपा झाली तशी समाजांतली त्यांची इज्जतहि वाढली. मोठ्या घराण्यांतून संतति कमी असते असें कांहीं लोक म्हणतात; पण परमेश्वराची याहि दृष्टीनें पाटील घराण्यावर कृपा होती. माधवराव पाटलांना सख्खे पांच भाऊ व चार बहिणी होत्या. स्वतः माधवरावांना दोन बायका होत्या. पहिल्या बायकोला प्रथम तीन मुली झाल्या. आपल्याला मुलगे होत नाहींत हें पाहून माधवरावांनीं आपल्या पहिल्या बायकोच्या सम्मतीनें दुसरें लग्न केलें. त्यानंतर मात्र दोन्ही बायकांना मुलगेच व्हायला लागले. पहिलीला दोन मुलगे झाले व दुसरीलाहि त्याच सुमारास दोन मुलगे झाले.

माधवरावांचा येवढा वंशविस्तार झाला तसाच त्यांच्या भावांचाहि होत होता. येवढें जरी झालें तरी हे सर्व भाऊ समाइकच होते. एखाद्याच्या घरीं नुसतें साधें बारसें असलें (आणि असे प्रसंग वर्षांतून एकदोन तरी येत असत), तरी सर्व भाऊ आपली मुलेंवाळें आणि लेकीसुना घेऊन कार्य साजरें करण्याकरितां आपल्या बैलगाड्यांतून येत. अशा वेळीं पांचपन्नास गडीमाणसें आलीं

नाहींत असें व्हावयाचेंच नाही. आणि मग माधवराव व त्यांचे पांडवांसारखे बाकीचे भाऊ आपल्या व्यवहारासंबंधीं व कौटुंबिक बाबींसंबंधानें वादविवाद करीत व एकमेकांची सल्लामसलत घेत.

माधवरावांच्या वडील मुलीचें लग्न साऱ्या भंडारा जिल्ह्यांत गाजलें. या लग्नाला जसे 'स्वदेशीवाले' आले होते, तसे जिल्ह्याचे 'बडे साहेब'देखील वेळांत वेळ काढून कांही तासांकरितां येऊन गेले. सर्व लोकांत माधवरावांचें वजनच तसें होतें.

माधवरावांच्या पहिल्या बायकोच्या पहिल्या मुलाचें नांव जाधवराव होतें. जाधवराव हा आपल्या बापासारखाच दिलदार होता व आपल्या बापासारखाच भांडखोर होता. आपल्या 'माय'वर त्याचें पराकाष्ठेचें प्रेम होतें.

प्रसंग होता लहानच; पण काळवेळ अशी आली, की त्यालाच फार विकृत स्वरूप आलें. माधवरावांचे एक बंधु संपतराव यांच्या घरीं कांहीं कार्य होतें. माधवरावांनीं नुकतीच एक नवीन मोटार घेतली होती व त्या मोटारींत बसून माधवराव संतपरावांकडे गेले होते. येतांना माधवराव, त्यांची दुसरी बायको राधाबाई व तिचीं मुलें अशी मोटारींतून परत आलीं, आणि रुक्मिणीबाई (जाधवरावांची 'माय') व तिचीं मुलें छकड्यांतून परत यावयास निघालीं. हें झालें तें कांही कोणी मुद्दामच जुळवून आणलें नव्हतें; पण जाधवरावाला हा फरक पाहून फारच राग आला. आपल्या 'माय'चा आपल्या बापानें येवढा अपमान चारचौघांत केला हें त्या मातृभक्त मुलाला कांहीं पसंत पडलें नाही.

मंडळी घरात आल्यावर कुरबुरीला सुरुवात झाली व त्याचें पर्यवसान बापलेकांच्या जंगी भांडणांत झालें.

"मस्ती आली आहे तुम्हांला!" जाधवराव द्वेषानें बोलत होता, "माझ्या मायच्या पाठीवर सवत आणलीत अन् म्हातारपणीं आता आपल्या तरण्या बायकोचं कौतुक करतां आहांत! माझ्या मायमुळंच येवढे चांगले दिवस आले आहेत तुम्हांला. अन् तिचा असा अपमान करतां तर ती कांहीं ठेवलेली आहे कीं काय तुमची? चांगली लग्नाची बायको आहे."

"चूप, चूप हरामखोर! आपल्या बापाची लाज काढतोस?" माधवराव जाधवरावांपेक्षांहि मोठ्यानें आरडले, "मीं दुसरी नवरी केली त्यांत तुझ्या बापाचं काय गेलं? अन् त्यांत तुझ्या मायचं कोणतं नुकसान झालं? बापाची बेइज्जत करतो हा कसला माझा पोरगा?"

" हां ! हां ! तोंड आवरून बोला. मला शिव्या द्या ! माझ्या मायला शिव्या दिल्यात तर मुडदाच पाडीन इथं तुमचा. ध्यानांत ठेवा ! "

" अरे जा-जा ! मोठा बेटा आला आहे मातृभक्त ! मायकरितां बापाला शिव्या देणारा ! कोणीहि मुलगा आपल्या सख्ख्या बापाला शिव्या देणार नाहीं; अन् तूं तर मला शिव्या देतोस, मग तूं माझा कसचा मुलगा ? "

बापलेक एकमेकांचे अंगावर धांवले. घरांतलीं पोरेंबाळें व बायकामाणसें रडूं लागलीं. शेजारीपाजारी मध्यें पडले व मोठ्या कष्टानें त्यांनीं बापलेकांना एकमेकापासून दूर केलें.

बापलेक संतापानें ओरडत होते; घरची माणसें भीतीनें ओरडत होतीं. बापलेक संतापानें कांपत होते; घरची माणसें भीतीनें कांपत होतीं. चार भले लोक आपलें कोणी ऐकणार नाहीं हें पक्कें माहीत असूनहि उगाच जनरीती-प्रमाणें दोघांनाहि चार समजुतीच्या गोष्टी सांगत होते. गांवचे तमासगीर बिन-पैशानें नाटक पाहत मजेनें रस्त्यावर उभे होते. पाण्याला जाणाऱ्या बायका मध्येंच हा तंटा पाहण्याकरितां रस्त्यांतच उभ्या होत्या; व सर्वजणी एकदम बोलून कुणाचें बोलणें कुणालाच ऐकूं देत नव्हत्या. बिचाऱ्या रुक्मिणीबाई ( माधवरावांची पहिली बायको ) व राधाबाई मात्र घरांत चोरट्यासारख्या बसून होत्या.

*                *                *

बापलेकांचें खडाजंगी भांडण झालें त्या दिवशीं जाधवराव आपल्या घरी गेला नाही. 'माझ्या मायचा अपमान करणाऱ्या बापाचें मला तोंड पाहायचें नाहीं' असें जाधवराव म्हणत होता. त्या दिवशी तो आपल्या एका शेजाऱ्या-कडे राहिला. या गृहस्थाचें नांव होतें माणिकराव.

त्या दिवशीं रात्रीं माणिकरावांच्या बैठकींत बरेच 'राव' जमले होते. आज सर्व लोक बापलेकांच्या सकाळीं झालेल्या भांडणासंबंधानेंच बोलत होते.

" तरी पण माधवरावांचं चुकलंच. त्यांनीं जाधवरावाच्या मायचा असा अपमान करायचा नव्हता ! "

" अहो, म्हातारपणी तरणी बायको केली म्हणजे पहिलीचं जिणं असंच होतं."

" बरं राव, आज त्यांनी पहिल्या बायकोला छकड्यांतून तरी घरीं आणली, पण उद्यां– ? " जानराव म्हणाले.

" उद्यां काय होईल ? " जाधवरावांनीं विचारलें.

" उद्यांचं काय विचारतां राव ! आतां तो दिवस जवळ येतोच आहे ! "

" जेव्हां का माधवराव आपल्या दुसऱ्या नवरीचीं लुगडीं रुकमामायला धुवायला लावतील तेव्हां समजेल सारं ! " माणिकराव म्हणाले व छद्मीपणानें हंसले.

जाधवरावानें माणिकरावाचें बोलणें ऐकलें, त्याचें छद्मी हास्य पाहिलें, जाधवरावाच्या अंगाची नुसती आग झाली. " माझ्या मायला आपल्या दुसऱ्या बायकोचीं लुगडीं धुवायला लावणार म्हातारा ! मग म्यां येवढ्या मोठ्या मुलानं जगून काय फायदा ? नाहीं, माझ्या मायचा अपमान करणारा माझा प्रत्यक्ष बाप असला तरी त्याला गय करणार नाहीं." जाधवराव म्हणाला. त्यानें आपल्या तुरळक असलेल्या मिशांना पीळ दिला व दांत ओठ आवळले.

माणिकराव पाहत होते. विषाचा योग्य तो परिणाम होतो आहे हें पाहून त्यांच्या अंतःकरणांत गुदगुल्या झाल्या; पण त्यांनीं आपला आनंद आपल्या तोंडावर दिसूं दिला नाहीं.

" मी तर म्हणतों, जाधवराव—" माणिकरावांनी सुरवात केली––

" तुम्हांला जर आपल्या मायच्या अपमानाचा सूड घ्यायचा असेल तर तुम्ही आपल्या बापावर इस्टेटीच्या वांटणीचा दावा लावा. आपला हिस्सा कोर्टातून माधवरावांच्या जवळून हिसकावून घ्या. अन् मग आपल्या माय-करितां एक छानशी मोटार घेऊन मुद्दाम म्हाताऱ्याच्या घरावरून हिंडवा."

" हां ऽ हां ! असंच करा कीं राव ! " बऱ्याचशा रावांनीं या गोष्टीला सम्मति दिली.

माणिकराव हा कोर्टकचेऱ्यांतला मोठा दर्दी माणूस. कोणत्या कामांत कसें यश येईल हें त्याला चांगलें माहिती. दिवाणीच्या कामाला कोणता वकील चांगला, फौजदारीकरितां कोण चांगला, कोणत्या साहेबाची कशी आदत आहे, नागपुरांतल्या 'हायकोडतांत' कोण चांगलें काम करतो, या साऱ्या भानगडीं-तच माणिकरावांची उमर गेली होती. माणिकरावांची शहरांतील कित्येक वकिलांच्या कारकुनांची अगदीं 'अरे जा रे'ची ओळख होती; व आपण साहेबांपर्यंत मजल मारूं शकतों अशीहि बढाई माणिकराव मारीत असत. साऱ्या गांवांतील लोक या माणिकरावाला भीत.

माधवराव व त्यांच्या घरच्या मंडळींना त्यांना भिण्याचें कारणच नव्हतें.

माणिकरावांच्या तोलाचा समडापुरांत फक्त एक जानरावच होता, व तोहि असाच कोर्टांतला बहादुर होता.

'आपल्या बापावर सूड !' जाधवराव विचार करूं लागला. बापावर आपण कसला सूड उगवावा ? आपण जितका मायला मान देतों तितकाच बापाला नको का द्यायला ? जाधवरावाच्या कपाळाला दोन आंठ्या पडल्या.

विष भिनत चाललें आहे हें माणिकरावानें ओळखलें.

"उठा मंडळी आतां, बारा वाजले कीं !" माणिकराव म्हणाला. पान-सुपारीचें तबक खाली झाले. थोड्याशा इतर गोष्टी झाल्या व मंडळी उठली; जाधवराव तेथेंच ओसरीवर निजला.

* * *

माणिकरावांच्या घरीं ज्या वेळीं ह्या गोष्टी होत होत्या त्याच वेळीं माधवरावांच्या घरींहि अशाच गोष्टी होत होत्या. रखमाबाई आपल्या धन्याची समजूत घालीत होत्या.

'खरं आहे तें ! पोरगा तापट नाहीं होणार तर काय शेळपट होईल ? अन् खरं पाहिलं तर रखमाईला मी मोटारनंच घरीं आणायला पाहिजे होतं. पण त्या वेळीं ही गोष्ट कशी ती माझ्या ध्यानांतच आली नाहीं. आता यंदांचा वसूल आला, कीं दुसरी एक मोटार घेतों अन् देतों ती जाधवला. बसव बेट्या आपल्या मायला वाटेल तेवढी मोटारींत.'

माधवराव स्वतःशींच विचार करीत होते. म्हाताऱ्याचा राग आतां शान्त झाला होता.

'या पोराला वाटतं त्याच्या मायबद्दल मला आदर नाही ! कां ? तर मी दुसरी बायको केली. या पोराचा जन्म नव्हता त्याच्या कितीक वर्षं अगोदर-पासून रुक्मा माझी आहे. या पोराला आम्हां म्हाताऱ्यांची वृत्ति काय कळणार ? अरे प्रेम म्हणजे काय शिंक्यावरची भाकरी आहे, कीं ती एकीला वाढली तर संपून जाईल अन् मग दुसरीला कांहीं मिळणार नाहीं ! छे-छे ! हा पोरगा फारच वेडा आहे !'

माधवराव स्वतःशींच हंसले. त्यांना विचार करतां करतांच झोंप लागली. माधवरावांना गोड स्वप्नें पडत होतीं हें त्यांच्या हंसऱ्या चेहऱ्यावरून दिसत होतें.

* * *

माधवराव निजले होते त्याच वेळीं जाधवराव माणिकरावांच्या बैठकीत पडलेला होता. 'वांटणीचा दावा करावा कीं नाहीं! छे-छे! वडिलांच्यावर कसला दावा करायचा! आपल्या घराण्यांत कुणी असली गोष्ट केली नाही. दावाबिवा कांहीं नाहीं. उद्या सकाळी घरीं जाऊन वडिलांची क्षमा मागायची.'

जाधवरावाचा निश्चय झाला. थोड्याच वेळांत जाधवरावाला झोंप लागली. जाधवरावांना गोड स्वप्नें पडत होतीं असे त्यांच्या हंसऱ्या चेहऱ्यावरून दिसत होतें.

* * *

दुसऱ्या दिवशीं सकाळीच माधवराव आपल्या मोटारींत बसून भंडाऱ्याला निघून गेले. आपण भंडाऱ्याला कां जात आहों हें त्यांनीं कुणालाच सांगितले नाहीं.

मोटार धांवत होती. माधवराव हंसत होते. 'आतां या जाधवरावाकरितां एक मोटार बोलावतों.' माधवराव मनांत म्हणाले, 'एक महिन्यांत मोटार घरीं येईल!'

मोटार धांवत होती.

'कसा झाला तरी जाधवराव माझाच मुलगा आहे. तो रागीट नाहीं होणार तर काय होईल?' माधवराव मनाशीच हंसले. मोटार धांवतच होती.

सकाळीं जाधवराव उठला व बराच रस्ता चालूं लागला. घरीं जायचें व आपल्या वडिलांची क्षमा मागायची असें जाधवरावानें ठरविलें होतें.

जाधवरावानें दुरून पाहिलें. माधवराव मोटारमध्यें बसून जात होते. माधवराव गेले.

'मग आतां घरीं तरी कशाला जायचं? मी घरीं परत येणार नाही असं बाबांना वाटलं तरी कसं?" जाधवराव मनाशींच म्हणाले.

उदास अंतःकरणानें जाधवराव माणिकरावांच्या घरीं परत आला.

"झालं, जाधवराव!" माणिकराव म्हणाले, "खूप फजिती झाली कीं नाहीं! अरे बाबा! माधवराव तुमच्या जन्माच्या पूर्वीपासून माझ्या ओळखीचे आहेत. मी सांगूं माधवराव भंडाऱ्याला कशाला गेले आहेत ते?" माणिकरावांनीं विचारलें.

जाधवरावांनीं नुसती प्रश्नसूचक मुद्रा केली.

" तुमच्यावर फौजदारी करायला ! शिवीगाळी व हमला केल्याबद्दल तुमच्यावर फिर्याद करणार असतील ते."

" माझ्यावर फिर्याद ? माझ्या मायचा अपमान करून माझ्यावरच फिर्याद करायला पाहतो हा म्हातारा ? " जाधवरावांचें डोकें अगदीं सुन्न झालें.

" जाधवराव ! अहो पाहतां काय ? तुम्ही करा आपल्या बापावर वांटणीचा दावा व उडवा त्याची भंबेरी ! तुम्हांला वाटेल तसा पुरावा मी बनवून देईन. तुम्हांला अगदी असे हुषार वकील पाहून देईन ! आहे हिम्मत ? चला भंडाऱ्याला ! आपला दावा अगोदर पेश झाला म्हणजे मग म्हाताऱ्यानं आपली फिर्याद मागाहून आकसानं दाखल केली असं आपोआप शाबीत होईल. हं , चला ! घ्या रामाचं नांव."

" चला ! " जाधवरावाने उत्तर दिले. भाड्याची स्पेशल मोटार करून माणिकराव व जाधवराव भंडाऱ्याला निघाले

माणिकरावाची मोटार पळत होती. माधवरावांची मोटार रस्त्यांत नादुरुस्त झाल्यामुळें तिचा एक दीड तास रस्त्यांतच खोळंबा झाला. माणिकरावांची मोटार मागून येऊन पुढें निघून गेली.

" अरे हा तर जाधवराव ! भंडाऱ्याला जातो आहे; अन् बरोबर माणिकराव ! हरामखोर ! घरबुडव्या ! वकिलाचा सल्ला घ्यायला जात असेल चोर ! या सापाला कशाला दूध पाजायचं ? कांही नको याला मोटार ! या सापाला आतां कांही एक द्यायचं नाही. ठरला माझा निश्चय." माधवराव म्हणाले.

गाडी दुरुस्त होतांच माधवरावांनीं शॉफरला गाडी गांवाकडे परत वळविण्यास सांगितलें. माधवरावांची गाडी परत गांवाच्या दिशेनें धांवूं लागली.

माणिकरावांची मोटार भंडाऱ्याकडे जात होती.

" आपण अगोदर भंडाऱ्याला जाऊं अन् उद्यां आपला दावा पेश होईल."

" हं."

" खूप खोड मोडेल मग म्हाताऱ्याची ! "

" हं."

मोटारी पळत होत्या. माणिकरावांची मोटार भंडाऱ्याला जात होती व माधवरावांची मोटार गांवाकडे परत जात होती.

माणिकरावानें जाधवरावाला माणेकजी वकिलाकडे नेलें. सर्व मुकदमा वकिलाला समजून देण्याची जबाबदारी माणिकरावानें आपल्या अंगावर घेतली

होती. जाधवरावानें माणिकरावाच्या सांगण्यावरून कांहीं कागदावर सह्या करून दिल्या.

भंडाऱ्याचें काम संपलें. माणिकराव व जाधवराव परत गांवीं यावयास निघाले.

मोटार पळत होती.

" आपला दावा उद्यां पेश होईल."

" हं."

" आपल्याला यांत जरूर यश मिळणार अन् म्हाताऱ्याची खूप फजिती होणार."

" हं."

मोटार गांवाकडे पळत होती. 'वांटणीचा दावा दाखल होणार ! ' जाधवराव विचार करीत होता.

* * *

दावा दाखल झाला प्रतिवादींच्यावर 'समाने' सुटली. माधवरावांचे पांच भाऊ व प्रत्येकांना मुलें. काही सज्ञान, अज्ञानांचे पालक नेमायचे-- एक वर्ष लागलें; तेव्हां कुठें सर्व प्रतिवादींच्यावर समाने लागूं झाली. मुकद्मा सुरू होऊन वर्ष होऊन गेलें. वकील फी, अमकी तमकी फी, सर्व फी सुरू झाल्या.

" काय वाटेल तें झालें तरी या जाधवरावाला इस्टेटींत हिस्सा मिळूं देणार नाही." माधवराव म्हणाले, " मला तेवढ्याकरिनां भीक मागावी लागली तरी हरकत नाहीं. विलायतपर्यंत जाईन; पण या जाधवरावाला मातीला मिळवीन ! "

" या म्हाताऱ्याचा नक्षा पुरा उतरीन ! माझ्या मायचा अपमान करणाऱ्या म्हाताऱ्याला पुरा लोळवीन ! " जाधवराव म्हणाले.

माणिकराव जाधवरावाला मदत करावयाला एका पायावर तयार होते. माणेकजी वकिलांनीं खूप शर्तीनें मुकद्मा लढविण्याचें कबूल केलें होतें. माधवरावांतर्फे खानसाहेब वकील होते. ज्या साहेबाच्यापुढें मुकदमा होता ते जॉनसनसाहेब ख्रिश्चन होते.

दाव्याच्या सुरवातीलाच 'ज्या अर्थीं' माधवराव व त्यांचे इतर बंधु अजून एकत्र कुटुंबाचे घटकावयव आहेत 'त्या अर्थीं' जाधवरावांना हा वांटणीचा दावाच आणतां येत नाहीं, असा पहिला मुद्दा खानसाहेब वकिलांनीं

उपस्थित केला. खानसाहेबांनीं आपलें म्हणणें मोठमोठालीं पुस्तकें आणून व त्यांचे आधार दाखवून साहेबांच्या मनावर बिंबविण्याचा प्रयत्न केला. खानसाहेबांचें भाषण झाल्यावर माणेकजी वकिलांनीं मोठ्यानें आरडून व हातवारे करून आपल्या भाषणाला सुरवात केली. साहेबांनी डोळे मिटून घेतले होते; बहुतकरून ते कायद्याच्या मुद्द्याविषयीं विचार करीत असावेत असें सर्वांना वाटलें.

वकिलांचीं भाषणें झालीं, व बरींच भांडणेंहि झालीं. दोघेहि वकील अगदीं जिद्दीनें भांडले असें वडाच्या झाडाखालीं बसणाऱ्या सर्व तज्ज्ञांचें मत पडलें. साहेबांनीं तारीख दिली व ते उठून आपल्या खोलींत गेले. इतका वेळ अगदी तेरीमेरीवर आलेले खानसाहेब व माणेकजी एकमेकांची थट्टामस्करी करीत परत वकिलांच्या कोठडीवर गेले, व हा असा चमत्कार कसा झाला यासंबंधी आश्चर्य करीत माधवराव व जाधवराव परत आपल्या घरीं गेले.

ठरलेल्या तारखेच्या दिवशीं हुकूम झाला. ‘जाधवरावाला त्याचे वडील आपल्या बंधूंच्याबरोबर एकत्र राहत असतांना वांटणीचा दावा करतां येत नाहीं’ या मुद्द्यावर दावा खारीज झाला. दाव्याचा दोन्ही बाजूंचा खर्च जाधवरावांवर बसला.

आतां मात्र जाधवराव पुरे चेकाळले. माणिकरावांच्या मदतीनें त्यांनी अपील दाखल करावयाचें ठरविलें. खर्चाकरितां म्हणून आपल्याला जो हिस्सा मिळेल त्याच्या निम्मे हिस्सा त्यांनीं सुगणमल मारवाड्याला विकला व दावा भांडण्याकरितां पैसा तयार केला.

अपील दाखल झालें. या वेळी जाधवरावानें एक गोरे बॅरिस्टर आपल्यातर्फे उभे केले होते. माधवरावांच्या तर्फे एक यहुदी बॅरिस्टर आले होते. या वेळचे साहेब मुसलमान होते.

बॅरिस्टरसाहेब आले. संध्याकाळपर्यंत थांबले. त्या दिवशीं कोर्टाला फार काम असल्यामुळें तारीख झाली. बॅरिस्टर जसे आले तसे परत गेले. त्यांची फी मात्र वसूल झाली!

दुसऱ्या वेळी पुन्हा फी वसूल करून बॅरिस्टरसाहेब आले; पण त्या दिवशीं साहेबांची बदली झाली होती, व साहेब जुने फैसले लिहिण्यांत गुंतलेले असल्यामुळें तारीख झाली.

पुन्हा फी देण्याचें जाधवरावांच्या जिवावर आलें; पण बॅरिस्टर तर

फीशिवाय मुळीं येईनातच. माधवरावांना खर्च डोईजड वाटूं लागला. मोटार विकून त्यांनीं मुकदम्याकरितां पैसा उभा केला.

तिसऱ्या वेळीं पुन्हा भाषणें झालीं. पुन्हा भांडणें झालीं. बरीचशी पुस्तकांची उलथापालथ झाली. हुकुमाची तारीख ठरली.

कोर्टानें मुकदमा पहिल्या कोर्टाकडे परत चौकशीकरितां पाठविला. माधवराव जर पोवार असले तर खालच्या कोर्टाचा निकाल बरोबर आहे. व ते जर मराठे असले तर मग तो चुकला. तरी पण माधवराव हे पवार आहेत कीं मुंबईकडचे मराठे आहेत याचा निकाल पुराव्याशिवाय करतां येणें शक्य नाहीं, म्हणून या मुद्दयावर पुरावा घेण्याकरितां मुकदमा पहिल्या कोर्टाकडे परत आला.

आतां दोघेहि जिद्दीला पेटले होते. दोघानाहि यशाची आशा वाटत होती व दोघांनाहि अपयशाची भीति वाटत होती.

या वेळीं खालच्या कोर्टांत जीजस या नांवाचे एक इसाई साहेब आले होते; त्यांनीं बापलेकांना समजाविण्याचा पुष्कळ प्रयत्न केला.

"नाहीं ! मी या जाधवरावाला हिस्सा कधींहि मिळूं देणार नाही." माधवरावांनीं स्पष्टपणानें कोर्टाला सांगितलें.

पुरावा कसा तयार करावा हें माणिकरावाला बाळकडूच होतें. आतां माधवरावांनीं जानरावांची मदत घेतली. यापूर्वी माधवराव जानरावांशीं बोलत-देखिल नसत; पण या वेळी त्यांनीं जानरावाची मदत घेणे कबूल केलें.

पुरावा घेणें सुरू झाले. साक्षीदारांची खुशामत करतां करतां माधवराव व जाधवराव कंटाळून गेले. ते दोघेहि बैलाच्या छकड्यांत बसून कोर्टांत येत; पण साक्षीदारांना मात्र मोटारी लागत. माधवराव व जाधवराव हे दोघेहि घरून भाकरी घेऊन येत; पण साक्षीदारांना मात्र सकाळीं तूपरोटी, दुपारीं चहा आणि संध्याकाळीं कांहीं तरी गोडगोड असा मलिदा त्यांना चारावा लागे. इतकेंहि करून कांहीं साक्षीदार ब्रह्मदेवासारखे दोन्हीकडूनहि बोलत तर कांहीं एकाचा भत्ता घेऊन दुसऱ्यातर्फे बोलत.

साक्षीपुरावा चालू होता. माणिकरावांचे व जानरावांचे पेच व पवित्रे चालू होते. माधवरावांचा व जाधवरावांचा पैसा मात्र पाण्यासारखा खर्च होत होता. दोघांच्याहि घरच्या माणसांच्या डोळ्यांतून पाणी येत होते.

साक्षीपुरावा होत होता. पक्षकारांचे खिसे खालीं होत होते.

पुरावा संपला; पुन्हा वकिलांचीं भांडणें झालीं. पुन्हा पुस्तकें उलथीं-पालथीं झाली. पुन्हा निकालाची तारीख नेमली.

माधवराव 'पवार' आहेत असें कोर्टानें शाबीत धरले. अशा परिस्थितीत मध्यप्रान्तांत मुंबईकडचा कायदा त्यांना लागूं पडत नाहीं; आणि म्हणून जाधवरावाला हा दावा चालवितां येतो असा कोर्टानें निकाल दिला.

दोन अडीच वर्षें दावा चालून व तीनचार हजार रुपये खर्च करून माधवराव व जाधवराव शिकले काय—? तर जाधवरावाला हा दावा चालविण्याचा हक्क आहे !

" मला या फैसल्याचा अर्थच समजत नाहीं, वकीलसाहेब." माधवराव म्हणाले, " अहो, मुलाला जर आपल्या वडिलांच्या इस्टेटींत वांटा मागतां यायचा नाहीं तर तो यायचा तरी कोणाला ? आणि येवढ्या साध्या गोष्टीकरितां दोन कोर्टांत लढायची जरूर तरी कां पडावी ? "

खानसाहेब हंसले. जानरावहि हंसले.

" तसंच वकीलसाहेब, मुंबईकडे एक कायदा कां असावा व आमच्या नागपूरकडे दुसरा कां असावा, हेंहि कांहीं मला कळत नाहीं. तिकडेहि इंग्रज सरकारचं राज्य आहे व इकडेहि त्यांचंच राज्य आहे. मुंबईकडे काय माणसं राहतात व इकडे काय राक्षस राहतात म्हणून तिकडच्या व इकडच्या कायद्यांत फरक असावा ? " माधवराव म्हणाले. कायद्याची ही भानगड त्यांना कळेना.

वकीलसाहेब हंसले; जानरावहि हंसले.

" तुम्ही कांही काळजी करूं नका, माधवराव." जानराव म्हणाले, " अहो, जाधवरावांना मुकदमा लढण्याचा हक्क आहे येवढं ठरलं म्हणजे आपण हरलों आहोंत थोडेच ! अहो, खरी लढाईला अजून सुरवातच झाली नाहीं. यापुढं इस्टेटीच्या याद्या दाखल होतील, त्यावर जबाब, पुन्हा मुद्दे निघतील, मग पुन्हा पुरावे होतील, पुन्हा वकिलांचीं भाषणं होतील—"

" अरे बाप रे ! " माधवराव म्हणाले. जरूर त्या कागदांवर सह्या करून माधवराव आपल्या गांवीं परत गेले.

जाधवरावांनींहि जरूर त्या कागदांवर सह्या करून दिल्या.

दोघांचेहि जबाब पेश झाले. जाधवरावाचा जबाब दहा पानें होता तर माधवरावांचा पंधरा पानें होता. जाधवरावांनीं इस्टेटीच्या सहा याद्या दाखल केल्या, तर माधवरावांनीं तीन केल्या.

पुन्हा युद्धाला तोंड लागले. बाकीचे प्रतिवादी बिचारे कंटाळून घरीं बसले.

* * *

जबाब सुरू झाले. कोर्टांतील कांहीं बोलणी इंग्रजींत होत होतीं तर कांहीं मराठींत नाहीं तर हिंदींत होत.

“माधवराव,” जीजससाहेब एके दिवशी माधवरावांना म्हणाले, “माधवराव, किती दिवस चालविणार हें महायुद्ध तुम्ही? अहो, जाधवराव कसा झाला तरी तुमचा मुलगाच. आपला मुलगा जर चांगला वागला नाही तर त्याला आपण रागं भरावं, पण त्याला आपण हांकलून द्यायचा हा कुठला न्याय?”

जीजससाहेबानी आपल्या मोठाल्या कांचेच्या चष्म्यांतून माधवरावांकडे पाहिले.

या जाधवरावाला मला इस्टेटींतला हिस्सा द्यावयाचा नाही असें नेहमीं कठोरपणानें सांगणारे माधवराव आज स्वस्थ उभे राहिले. जीजससाहेबांच्या बोलण्यामुळें माधवरावांचा हृदयस्थ परमेश्वर जागा होऊं लागला होता.

तारखा, जबाब व याद्या! वकील लोक याच भानगडींत होते; पण खरें म्हटलें तर त्यांनाहि या भानगडींचा कंटाळा आला होता.

जबाब संपले. मुद्दे काढावयाची तारीख झाली. साधारण एक तासभर काम झाल्यावर साहेबांच्या बंगल्यावरून साहेबांना चिठी आली. साहेबांचा धाकटा मुलगा मोझेस आजारी होता व त्या वेळी त्याची प्रकृति जास्त होती.

“मी आज घरी जातों. मोझेस आजारी आहे.” इतकें सांगून साहेबांनी काम बंद केलें.

“माधवराव! येवढं मी करतों तें कशाकरितां! तुमच्या वडिलांनी येवढी इस्टेट मिळविली ती कशाकरितां? माधवराव, डोळे उघडून जगाकडे पहा म्हणजे तुम्हांला दिसेल कीं सृष्टींतील प्रत्येक प्राणी आपल्या मुलांकरितां नाहीं तर पिलांकरितां स्वार्थत्याग करतो. माधवराव! जाधवराव! दोघेहि स्वतःशींच विचार करा आणि उद्यां कोर्टांत या.”

साहेबांनीं टोपी उचलली व ते बाहेरच्या गाडीत जाऊन बसले.

* * *

जाधवराव व माधवराव हे दोघेहि दुसरे दिवशीं आपल्या वकिलांच्या घरीं गेले नाहींत. दोघेहि दुसरे दिवशीं पायींच कोर्टांत गेले.

मुकदमा पुकारला.

जाधवराव व माधवराव दोघेच कोर्टापुढें जाऊन उभे राहिले.

" साहेब, मोझेसबाबाची प्रकृति ठीक आहे ना ? " माधवरावांनीं विचारलें.

" आज बाबा बरा आहे, माधवराव." साहेबांनीं उत्तर दिलें. साहेब आज फार खुशींत होते. " हं--मग माधवराव, करायचं काम पुढं सुरू ? " साहेबांनीं आपली शान्त व प्रेमळ दृष्टि माधवरावांकडे टाकली.

एक प्रेमळ पिता दुसऱ्या प्रेमळ पित्याच्या अंतःकरणाची खोली पाहत होता. अभ्रें दूर होत होतीं.

" जाधवराव ! माझ्या मोझेसचं माझ्यावर फार प्रेम आहे." साहेब जरा थांबले आणि पुन्हा म्हणाले,

" आणि माधवराव, माझंहि मोझेसवर तसंच प्रेम आहे ! "

" साहेब, मला इस्टेटींतला हिस्सा नको. माझा मुकदमा खारीज करा !" जाधवराव म्हणाले.

" नाहीं साहेब, जाधवरावाचं ऐकूं नका. माझी सर्व इस्टेट त्याला द्या. साहेब, माझ्या खुषीनं ही अशी डिक्री द्या ! " माधवराव म्हणाले.

बापलेक पुन्हा भांडूं लागले. कोर्टांत गर्दी जमली. माणेकजी व खान-साहेब आले.

" वकीलसाहेब ! पहा तर खरे तुमचे पक्षकार कसे बदलले ते ! साक्षीदार बदलले तर तुम्ही त्यांना दोष देतां आणि आतां पक्षकार बदलले तर त्यांना तुम्ही काय करणार ? " जीजससाहेब म्हणाले व हंसले.

शेवटीं साहेबांनीं पितापुत्रांची कशी तरी समजूत केली. मुकदमा पुढें चालविण्याची वादीची इच्छा नाहीं म्हणून मुकदमा काढून टाकण्यांत आला. इतर प्रतिवादी हजर नव्हते, तेव्हां त्यांच्या संमतीचा प्रश्न नव्हताच.

" साहेब, या मुकदम्याचा फैसला आपण केला नाहीं. याचा फैसला आपल्या मोझेसबाबानं केला ! " माधवराव म्हणाले.

साहेब हंसले. त्यांच्या बंगल्यांतील एका लहान खोलींत आपल्या छोट्या पलंगावर स्वस्थपणानें झोंपीं गेलेल्या मोझेसबाबाची प्रतिकृति त्यांना आपल्या डोळ्यांपुढें दिसूं लागली.

"मोझेसबाबानं जरी निकाल दिला तरी तो माझाच मुलगा ना?" साहेब म्हणाले.

"आणि आज चार वर्षं माझ्याशीं जिद्दीनं भांडणाराहि माझाच मुलगा ना?" माधवराव म्हणाले.

"चल बेटा घरीं!" माधवरावांनीं जाधवरावाचा हात धरला. जाधवराव एकाद्या लहान मुलाप्रमाणें त्यांच्या मागोमाग जाऊं लागला.

"रामराम साहेब!" पितापुत्रांनीं जीजससाहेबांना अभिवादन केले व दोघेहि बाहेर पडले.

समोरच्या मैदानात सोडलेला छकडा माधवरावांनी जुंपला. पितापुत्र एकाच छकड्यांत बसून गांवाकडे निघाले.

कोर्टातले पुकारे चालूच होते. माधवरावांच्या छकड्याच्या बैलाच्या गळ्यांतील घुंगरांचा आवाज कांहीं वेळपर्यंत ऐकूं येत होता.



# अन्यायी न्याय : : ७

बापूसाहेब देशमुख हे या प्रान्तांतील जरी नसले तरी या बालाघाट जिल्ह्यांतील एक इज्जतदार व खानदानी सावकार आहेत. त्यांचीं एकदोन मालगुजारी गांवें व शिवाय थोडीबहुत म्हणजे २५ ते ३० हजार रुपयांपर्यंतची सावकारी आहे. यापेक्षां आणखी श्रीमंती श्रीमंती ती काय असावयाची ? येत्याजात्या सरकारी वरिष्ठ अधिकाऱ्यांची ओळख करून घ्यायची, त्यांना एखादे वेळेस पानसुपारी करावयाची व या ओळखीच्या जोरावर कुळांच्यावर कुरघोडी करावयाची, त्यांच्याजवळून रुपयाला दोन पैसे व्याज घ्यावयाचें वगैरे गोष्टी करण्यांत आपण कुठें चुकतों आहोंत किंवा अन्याय करतो आहोंत असे बापूसाहेबांना कधीच वाटत नसे. बापूसाहेबांची पूजाअर्चा मात्र लांबलचक असे. सकाळीं दोन-तीन तास तरी शिवलिंगार्चन व शिवलीलामृताचा पाठ ते करीत. 'माझ्या अंगांत १०२ डिग्री ताप असतांनासुद्धां मीं माझा पाठ चुकविला नाहीं' असें ते म्हणत. साहेबांना भेटावयाला जायचें असलें तर ते पहांटे तीन वाजतां उठून पूजेला लागत. आदल्या दिवशीं केलेली पापें या पूजेनें पार धुतलीं जातात अशी बापूसाहेबांची प्रामाणिक समजूत होती.

लक्ष्मीबाई बापूसाहेबांचें कुटुंब आपल्या पतिराजांना योग्य अशाच पत्नी होत्या. सकाळचा वेळ पतीसाठीं पूजाअर्चा इत्यादि गोष्टींची व्यवस्था करण्यांत खर्च करावयाचा. यजमान दुपारीं शेतीवर, नाहीं तर कुठें तरी बाहेर गेले म्हणजे रामाच्या देवळांत भागवतबुवांचें भागवत ऐकावयाला जावयाचें. तेथें भागवत चालू असतांना साळूबाई, कृष्णाबाई, चिमाआक्का वगैरे बायकांच्या बोलण्याकडे लक्ष द्यावयाचें व मधून मधून आपणहि त्यांत भाग घ्यावयाचा, व संध्याकाळीं घरीं आल्यावर रात्रीच्या फराळाच्या वेळीं देवळांत ऐकलेल्या ताज्या बातम्यांपैकीं महत्त्वाच्या गोष्टी पतिराजांना निवेदन करावयाच्या; हा सौभाग्यवती लक्ष्मीबाईचा नेहमींचा कार्यक्रम होता. बापूसाहेबांचें लग्न होऊन जवळ जवळ तीस वर्षें झालीं होतीं व त्यांपैकीं निदान वीस वर्षें तरी हाच क्रम चालू होता.

बापूसाहेबांना दोनच अपत्यें होतीं. एक मुलगा व एक मुलगी. मुलाचें वय सरासरीं सतरा वर्षांचें असावें. मुलीचें वय मुलापेक्षां पांच वर्षांनीं कमी.

मुलाचें नांव यशवंत व मुलीचें नांव उषा. मुलाच्या जन्माच्या थोडे दिवस अगोदर बापूसाहेबांनीं बरेच दिवस चाललेला एक दिवाणी दावा जिंकला होता म्हणून त्या मुलाचें नांव यशवंत ठेवलें होतें. मुलीच्या जन्माच्या वेळीं त्या वेळच्या छोटेसाहेबांच्या बायकोनें 'मुलीचें नांव उषा ठेवा' असें लक्ष्मीबाईना सांगितलें होतें. उषेच्या नंतर लक्ष्मीबाईना कांहीं मूलबाळ झालेंच नाहीं.

बापूसाहेबांचे सर्व गुण यशवंतरावांत उतरले होते. कुळांना शिव्या हांसडण्यांत यशवंतरावांना फार मौज वाटत असे. आपले यशवंतराव हे एक अत्यंत हुशार गृहस्थ आहेत अशी मातापित्यांची बालंबाल खात्री होती. यशवंतराव हायस्कुलांत शिकत असत. प्रत्येक वर्गांत एकदोन वर्षें जास्त मुक्काम करीत करीत त्यांनीं प्रवेश-परीक्षेचा दरवाजा गांठला; पण तेथें मात्र तो ओलांडणें त्यांना शक्य दिसेना! शिकवण्या लावून पाहिल्या; सत्यनारायण करावयाचें कबूल करून पाहिलें; पण व्यर्थ! यशवंतराव परीक्षेला जायच्या वेळीं लक्ष्मीबाईनीं मुद्दाम शेजारच्या सरूबाईना डोकीवर भरलेली घागर घेऊन रस्त्यांत उभें केलें व अशा तऱ्हेनें एक शुभ शकुन घडवून आणला; पण लक्ष्मीबाईच्या लहानशा नवसाला पावणारा व तोडग्यांना भिणारा परमेश्वर या वेळी मात्र अगदीं पुरा निगरगट्ट बनला व यशवंतराव प्रवेशपरीक्षेंत तिसऱ्याहि वेळेस नापास झाले!

आणि उषा! उषेसंबंधानें काय लिहावयाचे? उषा हुषार होती व देखणीहि होती. तिनें मराठी चार यत्ता तीनच वर्षांत संपवल्या होत्या. शाळेंत जाऊन पुढें शिकण्याची तिची इच्छा होती; पण तिच्या मातापितरांची तशी इच्छा नव्हती. मुलींच्या जातीला फार शिकणें उपयोगी नाहीं, शिवलीलामृत वाचतां आलें म्हणजे पुरे झालें, असें त्यांना वाटत होतें. शिवाय मुलीनें आपल्या हाताखालीं गृहशिक्षणाचे धडे घ्यावेत असें लक्ष्मीबाईना वाटत होतें. या सर्व गोष्टींमुळें उषेची शाळा सुटली व गृहकृत्यांत दक्ष होण्याकरितां ती आपल्या आईपासूनच शिक्षण घेऊं लागली.

उषा आतां पंधरा वर्षांची झाली होती व तिचें लग्न बापूसाहेबांना कर्तव्य होतें. मुलगी अगदीं गळ्याशीं आल्यामुळें ती कधीं उजविली जाईल यासंबंधानें लक्ष्मीबाई अगदीं काळजींत होत्या.

* * *

बापूसाहेबांची धाकटी बहीण कृष्णाताई भावाकडे चार दिवस माहेरपणाला आलेली होती. एके रात्री बहीण, भाऊ व भावजय यांच्यांत उषेच्या लग्नासंबंधानें गोष्टी चाललेल्या होत्या. उषा कांहीं तेथें नव्हती. तिच्या लग्नाच्याच गोष्टी चाललेल्या, तेव्हां ती तेथें कशी असेल ? मुलींनीं स्वतःच्या लग्नाच्या गोष्टी स्वतःच करावयाच्या असली सुधारकी पद्धत बापूसाहेबांना पसंत नव्हती.

" मग काय बापूसाहेब, दसलाख्यांचा मुलगा आहे का तुम्हांला पसंत ? त्यांचं व तुमचं जमतं आहे; अन् शिवाय त्यांना आपली उषाहि पसंत आहे. हुंडा मात्र दहा हजारांपर्यंत द्यावा लागेल तुम्हांला. पण तसं म्हटलं तर हें स्थळ कांहीं महाग नाहीं तुम्हांला. तुमच्यापेक्षांहि श्रीमंत आहेत दसलाखे." कृष्णाताई म्हणाल्या.

" होय बाई ! दसलाख्यांचं खरोखरीच चांगलं स्थळ आहे; पण येवढा हुंडा आमच्यासारख्यांना कांहीं परवडायचा नाहीं."

" हो ! न परवडायला काय झालं ? येवढा आहे पैसा तो करायचा काय म्हणते मी ? " कृष्णाताई मध्येंच म्हणाल्या.

" तें असं आहे कृष्णा ! अग, दहा हजार रुपये आजच्या परिस्थितींत उचलून देणं आम्हांला शक्य नाहीं. अन् शिवाय इतका हुंडा जरी दिला तरी दसलाख्यांना त्याचं कांहींहि वाटायचं नाहीं. अग, पैसा द्यायचाच झाला तर अशा मनुष्याला द्यावा, कीं त्याला त्याचा कांही तरी उपकार वाटेल. माझ्या मनांतून सहस्रबुद्ध्यांच्या माधवला उषा द्यायची आहे. मुलगा गरीब व होतकरू आहे, व त्याला जर कांहीं दिलं तर त्याचे तो उपकार स्मरील. शिवाय आपल्याला लग्नांतहि कमी खर्च होईल. तोहि पैसा आपण पाहिजे असल्यास उषाला देऊं शकूं."

" हेंहि कांहीं वाईट नाहीं." कृष्णाबाई म्हणाल्या, " माधवराव हुषार आहेत. आतां ते पुढल्या वर्षी डॉक्टर होतील व मग त्यांना तुम्ही विलायतेला पाठवून मोठे डॉक्टर करवून आणा म्हणजे झालं."

हा संवाद येवढ्यावरच राहिला. बापूसाहेबांनीं माधवरावांच्याकडे जाऊन ही गोष्ट काढली.

* * *

माधवरावांचे वडील हे पेन्शन घेतलेले शाळामास्तर होते. त्यांचें नांव

रावजी. माधवरावांच्या मातोश्री बऱ्याच वर्षांपूर्वी वारल्या होत्या व तेव्हापासून माधवरावांना मातेच्या जागींहि रावजीच होते. आणि मातापित्याच्या जबाबदाऱ्या रावजींनी योग्य तऱ्हेनें पार पाडल्या होत्या.

" तर मग बापूसाहेब, तुम्ही आमच्या माधवला पदरांत घेणार म्हणायचं ! उत्तम आहे ! हुंडापाड्याची माझी कांही एक अट नाहीं जसा तुम्हांला यशवंत तसाच माधव समजा म्हणजे झालं."

" आणि असं पहा रावजी," बापूसाहेब तोंडांत विड्याचा बार भरीत बोबडेपणानें म्हणाले, " लग्नकार्यांतसुद्धा फार पैसे खर्चू नयेत अशा मताचा मी आहें. अहो, हेच पैसे जर माधवरावांच्या शिक्षणांत खर्च केले तर दोन्ही मुलांचं कल्याण तरी होईल."

" हें तर फारच चांगलं, बापूसाहेब. माधवनं विलायतेला जावं अशी माझी फार इच्छा होती, व ती अशा तऱ्हेनं पुरी होईल तर फारच चांगलं होईल."

* * *

उषा ही जवळच्याच एका सुमुहूर्तावर सौ. उषा सहस्रबुद्धे झाली. लग्न बापूसाहेबांच्या खेड्यावर झाल्यामुळं लग्नाला खर्चहि फार लागला नाहीं. लग्न झाल्यावर बापूसाहेब माधवरावांना विलायतेला पाठविणार असें लोक म्हणत. येवढं मात्र खरं, कीं त्यासंबंधानं बापूसाहेबांनी एक शब्दहि काढला नाही.

लग्नाला यशवंतराव कांही आले नव्हते. यंदांच्या वर्षी प्रवेशपरीक्षेंतून कसे तरी पार पडलेच पाहिजे अशा तऱ्हेनें झटून आपण काम करीत आहोंत व म्हणून लग्नाला आपल्याला येतां येत नाहीं असा त्यांचा वडिलांना निरोप आला होता.

उषाबाईचें लग्न निर्विघ्नपणें पार पडलें. त्यानंतर दोनच महिन्यांनी परीक्षाचे निकाल लागले. माधवराव डॉक्टर झाले व यशवंतरावांचाहि सालाबादप्रमाणें निकाल लागला !

" बापू," यशवंतराव एके दिवशीं आपल्या वडिलांना म्हणाले, " येथल्या परीक्षांत कांहींएक अर्थ नाहीं. येथें परीक्षकहि चांगले नसतात, व येथल्या परीक्षा पास होऊनहि कांहीं मोठाल्या नोकऱ्या मिळणं शक्य नाहीं. तेव्हां आतां विलायतेला जाऊन आय्. सी. एस्. होऊनच यावं असं मीं ठरविलं आहे. तेव्हां मी केव्हां येथून जायला निघूं ? "

बापूसाहेब बिचारे अगदीं आश्चर्यचकितच झाले. प्रवेशपरीक्षेंत तीन वेळां नापास झालेले आपले चिरंजीव विलायतेला आय्. सी. एस्. होण्याकरितां जातों म्हणतात याचा अर्थच त्यांना समजेना !

“ पण यशवंत,” बापूसाहेब म्हणाले, “ अरे, आय्. सी. एस्.ची परीक्षा म्हणजे काय परसांतली भाजी समजतोस तूं, की ती कोणीहि तोडून आणावी व खावी ? अरे, हिंदुस्थानातून चांगल्या रीतीनें परीक्षा पास झालेल्या विद्यार्थ्यांनासुद्धां त्या परीक्षेत हटकून यश येतंच असं नाही. तेव्हां भलत्याच मृगजळाच्या मागं लागून आपला पैसा विनाकारण कां पाण्यात घालवितोस ! ”

“ पण येवढा पैसा ठेवून करायचा तरी काय ? बापू, पैशाचा उपयोग करायचा नाही तर तो ठेवून करायचा तरी काय म्हणतों मी ? अन् शिवाय तुम्हीं माधवरावांना विलायतेला जायला पैसा देणार आहांत असं लोक म्हणतात. आपला पैसा फुकटच्या फुकट दुसऱ्याला देण्यांत काय अर्थ आहे हें मला कळत नाहीं ! शिवाय माधवराव आता डॉक्टर झाले आहेत, तेव्हा येवढ्यावरच त्यांना प्रॅक्टिस करायला हरकत नाही; पण माझं मात्र तसं नाही. आय्. सी. एस्. होण्याकरितां मला मात्र विलायतेला गेलंच पाहिजे.” यशवंतराव म्हणाले.

बापूसाहेब या वाक्प्रवाहानें अगदी गारच झाले. आपल्या चिरंजिवांचें हिंदु कायद्याचें येवढें ज्ञान असेल व त्यांना माधवरावांविषयी असूया वाटत असेल अशी बापूसाहेबांना कल्पनाहि नव्हती.

“ यशवंत,” बापूसाहेब कांहीं वेळानें म्हणाले, “ माधवरावांना मीं पैसे देण्याचं कबूल केलं नाही कांहीं. लग्नकार्यांत जास्त पैसा खर्च करण्यापेक्षां तो माधवरावाच्या पुढील शिक्षणावर केलेला बरा असं मी म्हणालों होतो हें खरं; पण असं म्हणणं म्हणजे माधवरावांना पुढील शिक्षणाकरिता पैसे देणं मीं कबूल केलं असं नव्हे. तरीपण माधवरावांना मीं पैसे दिले तर तुझं काय जातं हेंच मला समजत नाही.”

“ कां बरं ? ” यशवंतराव म्हणाले, “ वडिलोपार्जित इस्टेटींतील पैसे अशा तऱ्हेनं दुसऱ्याला देऊन टाकणं इष्ट नाही असं माझं प्रामाणिक मत आहे.” यशवंतराव म्हणाले.

कांहीं वेळ दोघेहि पितापुत्र स्तब्धच होते.

“ बरं तर, बापू,” यशवंतराव म्हणाले, “ माझ्या सूचनेचा उद्यांपर्यंत विचार करून ठेवा. तोंपर्यंत मी माझ्या एकदोन विलायतेहून आलेल्या मित्राना ‘कन्सल्ट’ करतो.

* * *

या गोष्टीला तीन वर्षें होऊन गेलीं होती. यशवंतराव विलायतेस गेले

होते. पहिल्यानें आय्. सी. एस्. होण्याचाच त्यांचा विचार होता; पण पुढें तो बदलला. अर्थशास्त्रांतील पी. एच्‌डी. ही पदवी घेण्याचा आपला इरादा आहे असें त्यांनीं वडिलांना कळविलें. त्यानंतर आपण 'अॅक्चुअरी' होऊन हिंदुस्थानांत परत येऊं असेंहि यशवंतरावांचे वडिलांना पत्र आलें.

बापूसाहेब बरेच आजारी होते. कृष्णाबाई त्यांना भेटावयाला आल्या होत्या. कृष्णाताईचे यजमान हे नागपूरला वकिली करीत असत. यांचे नांव मनोहरपंत. हेहि आपल्या मेव्हण्यांना भेटावयाला आले होते. उषा व तिचे यजमान हेहि आले होते.

" बापूसाहेब," कृष्णाताई आपल्या बंधूंना म्हणाल्या, " यशवंतची वार्ता तरी काय आहे आतांशा? हा मुलगा आतां परत तरी कधी येणार बाई? अन् तुम्ही माधवरावांना विलायतेला धाडणार होतांत त्याचं काय झालं?"

" अग, यशवंत आता पुरा वहकला आहे. आतांशा तो तेथें काय करीत आहे याचाच पत्ता लागत नाही! सारखे पैसे मागवीत असतो. गेल्या महिन्यांत मीं त्याला लिहिलं की, 'आतां मी तुला यापुढं पैसे पाठविणार नाहीं.' त्यावर आमच्या चिरंजिवांनी आम्हांला पित्याचं कर्तव्य काय आहे यासंबंधानं एक लांबलचक व्याख्यान झोडलं, व तुम्हीं जर पैसे पाठविले नाहीत तर आपल्याला नाइलाजानं वांटणीचा दावा करावा लागेल, अशीहि तंबी दिली. आता लाजेकाजेनं तरी मला दरमहा विलायतेला पैसे पाठविणं जरूर आहे. आतांशा शेतीचं उत्पन्नहि बुडालं आहे व कुळांच्याकडून खंडहि बरोबर येत नाही. अशा परिस्थितींत माझी किती ओढाताण होत असेल याची तूंच कल्पना कर. आतां माधवरावांना शिकण्याला पैसा देता आला असतां तर बरं झालं असतं; पण एक तर मला सध्यां सवडहि नाही व मी त्यांना 'तुम्हांला पैसे देईन' असं कधी कबूलहि केलं नव्हतं."

" पण बापूसाहेब! घरांतल्या मंडळीची व प्रत्यक्ष वहिनींचीहि तशीच कल्पना होती ना?"

" सर्व लोकांची तशी कल्पना असेल; पण मी असं स्वतः कधीं म्हणालों होतों का? असं पहा कृष्णा! मला जर परवडलं असतं तर मी माधवरावांना पैसे दिलेहि असते; पण परिस्थिति अशी आहे, की मला पैसे देणं आतां परवडणार नाहीं."

बहीणभावांचें बोलणें येवढ्यावरच थांबलें.

बापूसाहेबांना थोडें बरें वाटूं लागल्यावर कृष्णाताई व त्यांचे यजमान आपल्या घरीं जावयास निघाले.

" काय तरी बाई न्याय ?" कृष्णाताई म्हणत होत्या, " बापूसाहेब म्हणत होते कीं, उषेच्या लग्नांत जास्त पैसे खर्च न करतां ते जर माधवरावांच्या शिक्षणाकरितां खर्च केले तर जास्त बरं. अन् तेच बापूसाहेब आतां कसे बाई बदलले ! बरं, पैसा नाहीं म्हणावं तर यशवंताकरितां दरमहा ओझ्यावारीं पैसा जातोच आहे. बापूसाहेबांच्या मनांतून कांहीं पैसे धाडायचे नाहींत पण करतात काय ? असा कसा बाई न्याय जगाचा ? "

" अग, असाच हा आपला अन्यायी न्याय ! उषा व यशवंत दोन्हीहि बापूसाहेबांचींच मुलं; पण उषा मुलगी म्हणून तिला आपल्या वडिलांच्या मेहेरबानीवर अवलंबून राहावं लागतं व यशवंत मुलगा म्हणून आपल्या वडिलांच्या जवळून वेळ पडल्यास जबरदस्तीनं पैसा काढूं शकतो. हा तुझ्यासारख्या साध्याभोळया बाईला जरी अन्याय दिसत असला तरी तो कायदेशीर न्यायच आहे ! " मनोहरपंत म्हणाले.

" पण हा अन्यायी न्यायच एकंदरींत ! " कृष्णाबाई म्हणाल्या.

* * *

गाडी पूर्ण वेगानें चालली होती. एंजिनांतून सारख्या ठिणग्या निघत होत्या. बाहेर काळाकुट्ट अंधार पडला होता !



# त्यांची नक्कल : : ८

" बाकी अप्पासाहेब, तुमचा बंगला फारच सुंदर आहे बुवा! मागच्या वेळेस मी आलों होतो त्या वेळेस तुम्ही स्टेशनजवळ राहत होतां नाहीं का? या बंगल्याचं भाडं काय आहे तुम्हांला?"

"शंभर रुपये द्यावे लागतात मला दरमहा! पण या बंगल्याची 'सिच्युएशन' मला आवडली अन् म्हणून घेतला मी हा बंगला झालं. मागच्या वेळेस तुम्ही इथं आलां होता त्या वेळी मला पगार सारा दोनशेंच होता. आतां मला हजार रुपये मिळत आहेत. आमच्या बँकेंतील नोकऱ्याचं असंच असतं. जमलं तर पगार हां हां म्हणता वाढतो, नाही तर हाती केव्हां नारळपंचा येईल याचा नेमहि नसतो. असूं द्या तें, आतां नुकतेच आलां आहांत तुम्ही, जरा चहा वगैरे घ्या अन् मग मारूं गप्पा वाटेल तेवढ्या आपण."

"बरं तर, चला आंत."

वरील संवाद कुसुमपूर येथील बँकेचे जनरल मॅनेजर रा. अप्पासाहेब देशमुख व त्यांचे एक मित्र यांचेमध्यें चालला होता. अप्पासाहेब देशमुख हे नुकतेच या बँकेचे जनरल मॅनेजर झाले होते. अप्पासाहेबांचे वडील बापूसाहेब देशमुख हे फार नामांकित वकील होते; व आपल्यानंतर आपल्या मुलानेंहि याच धंद्यांत नांव मिळवावें असें त्यांना वाटत असे. एखाद्या कज्ज्यांत जितक्या जास्त भानगडी तितका बापूसाहेबांना जोर येत असे. सपाटून फी मागावी व तितकी फी मिळाली, कीं वाटेल ती खटपट व लटपट करून त्या खटल्यांत यश मिळवावें अशी बापूसाहेबांची इच्छा असे. जितकी जास्त फी मिळे तेवढी बापूसाहेबांची बुद्धिमत्ता जास्त प्रखरपणानें काम करी. सोनापूरच्या जमीनदारावर खुनाचा मुकदमा चाललेला असतांना बापूसाहेबांनीं आपल्या बुद्धिमत्तेनें जमीनदाराला फांसावरून वांचविलें होतें; व कोर्टांत आरोपीकडून भाषण करीत असतांना आरोपीविषयीं त्यांचे मनांत करुणा उत्पन्न करवून असेसरांच्या डोळ्यांतून पाणीहि काढलें होतें असें म्हणतात.

अप्पासाहेबांचा स्वभाव मात्र आपल्या वडिलांच्या अगदीं विरुद्ध होता. जितके बापूसाहेब बोलके तितके अप्पासाहेब मुखस्तंभ. बापूसाहेबांची जितकी

पैशावर भक्ति तेवढीच अप्पासाहेबांची सत्यावर भक्ति. सत्य समजून घ्यावयाचें व त्याकरितां वेळ पडल्यास जरूर तो स्वार्थत्याग करावयाचा, हा अप्पासाहेबांचा बाणा असे. आणि म्हणून वकिलीसारखा बहुढंगी धंदा न करतां ज्याचे योगानें आपल्याला कांहीं तरी देशसेवा करतां येईल असा एखादा धंदा करावयाचा अप्पासाहेबांचा निर्धार होता.

बापलेकांत एका गोष्टीचें मात्र साम्य होते, आणि ती गोष्ट म्हटली म्हणजे ही, की दोघेहि अत्यंत करारी होते. आणि या करारीपणामुळेंच बाप-लेकांत वितुष्ट आलें.

विलासपूर येथें बाबूराव पानसे या नांवाचे एक अत्यंत श्रीमंत व्यापारी होते. मध्यप्रान्तात त्यांच्या मॅंगनीजच्या कित्येक खाणी होत्या. बाबूरावांचें वार्षिक उत्पन्न ५०-६० हजार रुपयाचे असावें असें लोक म्हणत व त्यांच्या अगदीं राजशाही राहणीवरून तें तसें असावें असें कोणालाहि वाटे. बाबूरावांचे घरी गजान्तलक्ष्मी नांदत होती. बाबूरावांचेजवळ पैसा खूप होता; व या सर्व संपत्तीची मालकीण बाबूरावांची एकुलती एक मुलगी कुसुम हीच होणार होती.

कुसुम ही एक अत्यंत सुस्वरूप अशी मुलगी होती. तिला आपल्या वडिलांचे संपत्तीचा जितका गर्व असे तेवढाच आपल्या बुद्धिमत्तेचा व रूपसंपदे-चाहि असे.

कुसुम स्वभावानें हळवी व भावनाप्रधान होती. कादंबरी वाचतांना जरा कांहीं दुःखद प्रसंग आला कीं तिला वाईट वाटे, व ती रडूं लागे; मग तिची समजूत करतांना तिच्या आईची पुरेवाट होई.

कुसुम इंटरची परीक्षा पहिल्या वर्गांत पास झाली होती, व ती बी. ए.च्या वर्गांत गेलेली होती. तिच्या वर्गांत मधुकर [redacted] म्हणून एक विद्यार्थी होता, त्याची व कुसुमची बरीच ओळख होती. कॉलेजमधील वात्रट मुलें या मैत्रीसंबंधानें वाटेल तसें बोलत, व कुसुमच्या मैत्रिणीसुद्धां तिची थोडीशी थट्टा करीत.

अप्पासाहेबांचें लग्न कुसुमशीं व्हावें असें बापूसाहेबांना वाटत होतें. पानशांची सर्व दौलत अशा तऱ्हेनें आपल्या घरांत यावी अशी बापूसाहेबांची इच्छा होती. आपला मुलगा आपल्या इच्छेविरुद्ध जाणार नाहीं अशी बापू-साहेबांची खात्री होती; या भरंवशावर त्यांनीं बाबूराव पानसे यांना पत्र लिहिलें होतें, व त्यांत कु. कुसुमला आपल्या मुलाकरितां मागणीहि घातली होती.

कुसुमशीं आपलें लग्न व्हावें असें अप्पासाहेबांना वाटत नव्हतें. कुसुमचें जर गोडशावर प्रेम असलें तर तिचें त्याच्याशींच लग्न व्हावें असें त्यांना वाटत होतें; आणि म्हणून जेव्हां बापूसाहेबांनीं ही लग्नाची गोष्ट काढली तेव्हां आपल्याला ही गोष्ट पसंत नाही असें अप्पासाहेबांनीं आपल्या वडिलांना अत्यंत नम्रपणानें पण तेवढ्याच स्पष्टपणानें सांगितलें.

अप्पासाहेब असे उत्तर देतील अशी बापूसाहेबांची कल्पनाहि नव्हती.

"कुसुममध्ये काय कमी आहे म्हणून तूं तिच्याशी लग्न करायला नाखूष आहेस अप्पा?" बापूसाहेबांनी विचारलें.

"तिच्यांत कांहींच कमी नाहीं. थेवढंच नव्हे तर कुसुमसारखी तरुणी ज्याची बायको होईल त्या पुरुषाला मी भाग्यवान् समजेन. पण मला मात्र तिच्याशीं लग्न करायचं नाहीं." अप्पासाहेबांनी उत्तर दिले त्या वेळीं त्यांच्या डोळ्यांपुढें कुसुम व गोडसे यांच्या मूर्ति दिसत होत्या.

"ठीक आहे;" बापूसाहेब रागाने म्हणाले, "तुला माझं म्हणणं ऐकायचं नसलं तर तूं माझ्या घरातून निघून जा."

बापलेक दोघेहि मानी व कडवे. अप्पासाहेबांनी घर सोडलें व ते आपल्या मित्राच्या मदतीनें मुंबईस गेले. नोकरी करून त्यांनीं व्यापारी शाखेचा अभ्यास करावयाला सुरवात केली.

बापलेकांच्या या भांडणानंतर ३-४ दिवसांत पानशांचें बापूसाहेबांना पत्र आलें. कुसुमचें लग्न सध्यां कर्तव्य नाही, असे मोघमपणानें लिहून त्यांनीं बापूसाहेबांच्या विनंतीला नाही म्हटलें होतें.

अशींच दोन वर्षे गेलीं, पण येवढ्या वेळांत अप्पासाहेबांच्या परिस्थितींत फारच फरक झाला होता. बापूसाहेबांचे आपल्या चिरंजिवाशीं भांडण झाल्यापासून त्यांची प्रकृति ढासळली. पानशांनीं आपल्या विनंतीचा अव्हेर केला यांत त्यांना फारच अपमान वाटला. याहि गोष्टीचा त्यांच्या प्रकृतिवर वाईट परिणाम झाला. या सर्व गोष्टीमुळें अप्पासाहेबांनीं घर सोडल्यानंतर एक-दीड वर्षांत बापूसाहेब एक दोन दिवसांच्या तापाचें निमित्त होऊन वारले. मरावयाच्या वेळीं बापलेकांची कांही भेट झाली नाहीं.

अप्पासाहेब बी. कॉम झाले व त्यांनीं कुसुमपूर येथील बँकेत नोकरी धरली. सुरवातीला त्यांना २०० रुपये महिना पगार मिळत होता. अप्पा-

साहेबांचें काम लोकांना व बँकेचे डायरेक्टरांना फारच पसंत पडलें व तीनच वर्षांत त्यांचा पगार ५०० रुपये महिना झाला.

आपल्या वडिलांच्या इस्टेटीची व्यवस्था करण्याकरितां अप्पासाहेब विलासपूरला गेले होते. तेथें त्यांना कळलें, कीं पानशांना व्यापारांत फारच मोठी ठोकर बसली व ते जवळ जवळ भिकारी झाले. पूर्वीचें सर्व विसरून अप्पासाहेब पानशांचे घरीं भेटीला गेले.

पानसे आतां एका चाळीच्या ब्लॉकमध्यें राहत होते. दाराशींच त्यांना कुसुम उभी दिसली. तिची खिन्न मुद्रा पाहून अप्पासाहेबांना तिची कींव आली; व तिच्याशीं लग्न करून तिला सुखी करावें अशी त्यांच्या मनांत कल्पना उद्भवली.

इकडचें तिकडचे बोलणें झाल्यावर पानशांनीं कुसुमच्या लग्नाची गोष्ट काढली.

"मग गोडशांचं व कुसुमचं लग्न नाही झालं एकूण!" अप्पासाहेब म्हणाले.

"नाहीं!" बाबूरावानी उत्तर दिले, "गरिबाच्या मुलीशीं गोडसे कसचा लग्न करतो? आम्हांला त्यानं फसविलं. अप्पासाहेब, तुम्ही घ्याल का आमच्या कुसुमला पदरांत?"

कांहीं वेळानें कुसुमची व अप्पासाहेबांची भेट झाली.

"कुसुम, तुझ्या हृदयांत माझ्याकरितां जागा आहे का?" अप्पासाहेबांनी विचारलें.

"होय! माझं हृदय या वेळीं मोकळं आहे असं मी आपल्याला शपथेवर सांगेन. कुसुमनें उत्तर दिले. पुढच्याच सुमुहूर्तावर कु. कुसुमबाई पानसे यांचे रा. अप्पासाहेव देशमुख यांच्याशीं लग्न झालें, व कुसुमबाई अप्पासाहेबाचेबरोबर कुसुमपुरास आल्या. पानशांना अप्पासाहेबांनी आपल्या विलासपूरच्या इस्टेटीचे मॅनेजर नेमले.

'अनंत हस्तें कमलाकरानें, देतां किती घेशिल दो करानें?' अशी एक म्हण आहे. अप्पासाहेबांचेंहि तसेंच झालें. व्यापारांत अप्पासाहेबांनीं चांगलें यश मिळविलें. अप्पासाहेबांची किम्मत बँकेच्या डायरेक्टर मंडळींना कळून आली. अप्पासाहेबांचा पगार दर वर्षीं खूपच वाढवला जाऊं लागला; चार-पांच वर्षांत तर अप्पासाहेबांच्याशिवाय बँक चालूंच शकणार नाहीं, अशी

स्थिति उत्पन्न झाली. इतक्यांत बॅंकेचे जनरल मॅनेजर वारले व त्या जागीं डायरेक्टरांनी अप्पासाहेबांची सर्वानुमतें निवडणूक केली. अप्पासाहेबांना आतां महिना हजार रुपये पगार मिळूं लागला.

संपत्तीने अप्पासाहेबांच्या मनावर येवढी मेहेरबानी केली होती व प्रेमळ पत्नीच्या सहवासांत अप्पासाहेबांचे दिवस सुखांत जात होते. अप्पासाहेबांच्या या दृष्ट लागण्यासारख्या संसारांत एक मोठेंच वैगुण्य होतें व तें हें, कीं त्याना अजून मूलबाळ झालेले नव्हतें.

आपल्या एवढ्या आयुष्यांत आपल्याला मूल नसावें याबद्दल अप्पासाहेबांना फारच वाईट वाटत असे. तरी पण आपल्या प्रेमळ पत्नीच्या मनाला त्रास होऊं नये, म्हणून ते वरवर आपण आनंदी आहोत असें दाखवीत. सौ. कुसुमाबाई याहि मधून मधून फारच दुःखी दिसत. अप्पासाहेबांनीं त्यासंबंधी पुष्कळदां विचारलें, पण त्यांच्या दुःखाचें कारण अप्पासाहेबाना काही कळलें नाहीं. आपल्याला मूल नसल्यामुळें आपल्या पत्नीला फार वाईट वाटत असेल अशी अप्पासाहेबांनीं आपली समजूत करून घेतली व ते स्वस्थ बसले.

* * *

अप्पासाहेबांचे मित्र आबासाहेब देशपाडे हे सबजज्ज होते. चार दिवस मजेने ते आपल्या मित्राकडे आले होते. त्यांच्याबरोबर त्यांच्या पत्नी सौ. शान्ताबाई व त्यांची दोन मुले राम व लक्ष्मण हीं होती.

दुपारच्या चहाच्या वेळीं मंडळी हॉलमध्यें बसली होती. इकडच्या तिकडच्या गप्पा चाललेल्या होत्या. इतक्यांत कोपऱ्यांतल्या टेबलावरचा पुतळा लक्ष्मणानें खालीं पाडला व तो फुटला.

" बाई-बाई ! शर्थ झाली बाई या मुलांच्या दांडगाईची. जिथं जातील तिथं प्रत्येक गोष्टीची विधूळवाट करीत असतात हीं कारटीं. म्हणूनच मी म्हणत होतें मुलांना घरीं ठेवूं म्हणून. पण यांना म्हणजे दोन्ही मुलं अगदीं जवळ पाहिजेत. आतां पहा आपल्या चिरंजिवांचे हे प्रताप ! " शान्ताबाई रागानें बोलल्या. शांताबाईनीं वरून राग आल्याचें कितीहि सोंग केलेलें असलें तरी त्यांच्या डोळ्यांवरून त्यांना आनंद होत असल्याचें स्पष्टपणानें दिसून येत होतें व हा आनंद झांकण्याच्या प्रयत्नांत त्यांना मुळींच यश आलें नाहीं, याबद्दल त्यांना वाईट वाटत आहे असेंहि त्यांच्या आनंदी चेहऱ्यावरून वाटत नव्हतें.

" फारच दांडगीं आहेत बुवा मुलं हीं." आबासाहेब म्हणाले व त्यांनीं दोघांहि मुलांना आपल्याजवळ ओढून घेतले.

" राहूं द्या कीं शान्ताबाई," कुसुमबाई म्हणाल्या, " मुलंच ती, त्यांनी दाडगाई करायची नाहीं तर कुणी करायची? नका बाई त्यांना रागावूं." कुसुमबाई म्हणाल्या.

आबासाहेबांनीं आपल्या पत्नीकडे पाहिले. शान्ताबाईनीं आपल्या प्रेमळ पतीकडे पाहिलें. दोघांनींहि आपल्या दोन्ही गुटगुटीत व दांडग्या मुलाच्या-कडे पाहिलें.

शब्दानी वर्णन करता येणार नाहीं असा आनंद दोघानाहि वाटला.

अप्पासाहेबांनी कुसुमबाईकडे पाहिले. कुसुमबाईची अश्रुपूर्ण दृष्टि रामलक्ष्मणाच्या जोडीवर खिळली होती. कांही वेळानें कुसुमबाईंना ती दिसेनाशी झाली. बसल्या बसल्याच त्यांनीं खुर्चीच्या पाठीवर मान टाकली.

" अरे ! हिला घेरी आली वाटते ? " अप्पासाहेब म्हणाले व त्यानीं लगेच उठून कुसुमबाईना धरलें. शान्ताबाईच्या मदतीनें त्यांनी कुसुमबाईना आपल्या बिछान्यावर नेऊन निजविले.

" हिला मधूनमधून असंच होत असतं. कां असं होतं कोण जाणे !" अप्पासाहेब हें धडधडीत खोटं बोलत होते. असें कां होत होतें हें त्यांना पूर्ण-पणे माहीत होतें.

" बाईना एखादं मूल झालं, की मग होईल सर्व ठीक." शान्ताबाई म्हणाल्या. स्त्रियांची मनःस्थिति स्त्रियांनाच चागली कळते.

" अप्पासाहेब, वहिनींची प्रकृति एखाद्या चांगल्या लेडी डॉक्टरला दाखवली पाहिजे." आबासाहेब म्हणाले.

" हं ! " अप्पासाहेबांनीं उत्तर दिलें व शून्य दृष्टीनें ते हॉलच्या छताकडे पाहत राहिले.

'संततीहीन जीवित असारच एकंदरींत !' अप्पासाहेब स्वतःशींच विचार करीत होते.

* * *

त्याच रात्रीची गोष्ट. कुसुमबाईना फार अशक्तता वाटत होती. त्या पलंगावर स्वस्थ पडल्या होत्या. अप्पासाहेब जवळच बसले होते.

"कुसुम," अप्पासाहेब म्हणाले. कुसुमबाईनीं प्रश्नसूचक नजरेनें आपल्या पतीकडे पाहिलें.

"कुसुम, तुझी प्रकृति एकदां एखाद्या चांगल्या लेडी डॉक्टरला दाखवायला पाहिजे." अप्पासाहेब म्हणाले.

"कां बरं ?" कुसुमबाईनीं विचारलें व त्या घाबरल्या.

"कुसुम, कां हें तुला सांगायला का पाहिजे ?"

"नको गडे, माझी प्रकृति अगदीं चांगली आहे. जेव्हां परमेश्वर कृपा करील तेव्हांच माझी प्रकृति ठीक होईल." कुसुमबाईनीं उत्तर दिले व त्या हमसाहमशीं रडूं लागल्या.

अप्पासाहेबांनीं त्यांचें मस्तक आपल्या मांडीवर उचलून घेतलें.

"रडूं नकोस अशी," अप्पासाहेब म्हणाले व त्यांनीं आपलें तोंड दुसरे बाजूला फिरविलें. अप्पासाहेब कुसुमबाईना रडूं नकोस म्हणून सांगत होते, पण त्याच वेळी त्यांच्याहि डोळ्यांतून अश्रु गळूं लागले होते.

अंतःकरणाच्या खळबळीला अश्रूंच्या रूपानें एकदां वाट द्यावीच लागते. पतिपत्नी बराच वेळ अश्रुमोचन करीत होतीं.

"हें पहा, मला मूल नाही म्हणून आपल्याला माझा राग तर नाहीं ना आला ?" कुसुमबाईनीं विचारलें.

"छे–छे ! भलतीच गैरसमजूत करून घेऊं नकोस." अप्पासाहेबांनीं उत्तर दिलें, "तुला मी व मला तूं. परमेश्वरानं आपल्याला संतति दिली तर सोन्याहून पिवळं. पण त्यानं आपल्यावर कोपून आपल्याला जरी असंच ठेवलं तरी माझं तुझ्यावरील प्रेम कधींहि कमी होणार नाहीं ही खात्री बाळग !"

* * *

पाहुणे दोनचार दिवस राहून परत गेले व अप्पासाहेबांची दिनचर्या पूर्ववत् सुरू झाली.

दिवस उजाडत होते व मावळत होते. अप्पासाहेबांच्या घरच्या टापटिपीसंबंधानें अप्पासाहेबांचे मित्र त्यांची फारच स्तुति करीत. पण ही स्तुति अप्पासाहेबांना व सौ. कुसुमबाई यांना विषाप्रमाणें भासे. आपल्या घरांत एखादें तरी मूल असावें व त्यानें आपल्या घरांतली सारी व्यवस्था मोडून टाकावी असेंच त्यांना वाटे.

अप्पासाहेब कसे झाले तरी पुरुषच होते. शिवाय त्यांचा बराच वेळ

बॅंकेत जात असे. त्यामुळें त्यांना उदास राहावयाला फार वेळच मिळत नसे. सौ. कुसुमबाईचें मात्र तसें नव्हतें. त्यांना घरीं पुष्कळ वेळ रिकामा मिळत असे व त्या वेळीं त्या मनाला सारखा त्रास करून घेत.

एके दिवशीं पतिपत्नी चहा घेऊन नुकतीच बसलीं होती. अप्पासाहेबां-नी आपल्या पत्नीच्या चेहऱ्याकडे पाहिलें व त्यांच्या मनांत एक विचार आला.

"कुसुम," अप्पासाहेब म्हणाले, "तुझी प्रकृति बरीच वाईट झाली आहे. तेव्हां हवापालट करण्याकरतां तूं कांहीं दिवस पुण्यास जाऊन रहा. तेथील डॉक्टर यशवन्तीबाई फारच चांगल्या डॉक्टर आहेत असं म्हणतात. त्या तुला औषधोपचार करतील. दिवाळीला अजून जवळजवळ महिना आहे. दिवाळीच्या सुमारास तूं आपल्या माहेरीं जा, व मलाहि तेथें बोलाव. आमच्या सासूबाई मला अगदी मुलाप्रमाणं करतात बरं का. हं, कर आजच तयारी. मीच तुला आज पुण्याला पोंचवून देतों, अन् तुझी सारी व्यवस्था लावून परत येतों."

कुसुमबाई घाबरल्या. "छे-छे-छे! आज नको गडे जायला! मला घरची सारी व्यवस्था लावावी लागेल, अन् त्याला मला फार वेळ लागेल. चारपांच दिवसांनीं जाऊं या आपण."

"छे–छे! आजच जाऊं आपण. कुसुम, तूं मला काय छोटा बेबीच समजतेस होय; मला नाहीं वाटतं घर आवरतां येणार? काय पण ऐट घर आवरायची! तूं नुसती बसून रहा आज, तुझी सर्व तयारी मी करवितों. पाहूं या मला जमते की नाही सारी व्यवस्था." अप्पासाहेब म्हणाले.

झाले! अप्पासाहेबांची ओरड सुरू झाली. सर्व नोकरांची धांवाधांव सुरू झाली. सामानाच्या पेट्या बांधल्या गेल्या. स्टेशनमास्तरांना फोन करून पहिल्या वर्गाचे दोन बर्थ्स खास अप्पासाहेबांचेकरितां राखून ठेवण्यांत आले. अप्पासाहेब त्या दिवशीं बॅंकेत गेलेच नाहींत. संध्याकाळीं मेलनें अप्पासाहेब व कुसुमबाई पुण्याला जायला निघालीं.

गाडीत कुसुमबाई सारख्या रडत होत्या. अप्पासाहेबांनीं त्यांना जवळ घेतलें.

"कुसुम," अप्पासाहेब म्हणाले, "माझ्याकरतां तरी तुला आनंदी राहिलं पाहिजे."

कुसुमबाईनीं आपले अश्रु आवरले, व अप्पासाहेबांच्या मांडीवर आपलें डोकें ठेवून आपले डोळे मिटून घेतले.

'बिचारी कुसुम !' अप्पासाहेब मनाशीच म्हणाले. गाडी ठिणग्या उडवीत चाललीच होती.

*  *  *

अप्पासाहेब पुंण्याहून येऊन पंधरा दिवस झालेच होते. यंदाच्या दिवाळीत सासुरवाडी जाण्याचा त्यांचा इरादा होता. सात-आठ दिवस परगांवी जाऊन राहावयाचें असल्यामुळें मौल्यवान जिनसा व्यवस्थित रीतीनें ठेवून व चोहोंकडे कुलुपें लावून जाणेंच अप्पासाहेबांना जरूर होते.

एके दिवशी अप्पासाहेब सौ. कुसुमबाईच्या खोलीत गेले. पाहतात तों त्यांच्या किल्ल्या ड्रेसिंग टेबलाच्या कप्प्यातच होत्या.

'काय निष्काळजी बाई आहे ही.' अप्पासाहेब म्हणाले व त्यांनी त्या किल्ल्या उचलून घेतल्या. कपड्यांच्या कपाटाचे ड्रॉवर्स चांगल्या रीतीनें बंद केलेले आहेत कीं नाही हें पाहण्याकरितां त्यांनी एक ड्रॉवर सहज ओढून पाहिला. तो एकदम बाहेरच पडला, व त्यांतून एक रेशमी फितीने बांधलेलें पत्रांचें पुडकें, एक लहानसें आल्बम, व चार-पांच वर्षांच्या जुन्या डायऱ्या बाहेर आल्या.

अप्पासाहेबांनीं कुतूहलानें तें आल्बम उघडून पाहिलें. त्यांत एकाच मुलीचे दहा-बारा फोटो होते. अगदीं लहानपणापासून तों वयाच्या आठ-नऊ वर्षांपर्यंतचे ते फोटो होते.

फोटोंतील मुलीचा चेहरा अगदी हुबेहुब कुसुमबाईसारखा होता. ते निळे डोळे, निमुळती हनुवटी, हंसतांना गालाला पडणारी खळगी, विपुल केस! अगदीं कुसुमबाईची प्रतिमाच ती मुलगी दिसत होती.

"ही मुलगी कोण असावी ?" आप्पासाहेबांच्या मनांत सैतानानें प्रवेश केला. अप्पासाहेबांनीं पत्राचें पुडकें सोडलें.

तीं सर्व पत्रें त्या मुलीनें कुसुमबाईनाच लिहिलीं होतीं. पहिली कांही पत्रें चारपांच ओळींचीं व मोठाल्या अक्षरांचीं होती. शेवटचीं एकदोन साधारण सुबक अशा अक्षरांत होतीं. अक्षराचें वळणाहि थेट कुसुमबाईच्या अक्षरासारखें होतें.

अप्पासाहेब त्यांपैकी शेवटलें पत्र वाचूं लागले.

"माई,

मला किनई येथें राहावयाचा कंटाळा आला आहे. साऱ्या मुली दर वर्षी दोनतीनदां घरीं जातात. मला कां ग तूं तुझ्याबरोबर नेत नाहींस ? वर्षांतून तूं

मला सारी दोन तीन दिवस भेटतेस अन् मग मला एकटीला तूं टाकून जातेस. माई! रागावलेली नाहींस ना ग तूं माझ्यावर? मला किनई माई, शिकायला आवडतें. पण मला असें तुझ्यापासून लांब राहणें मुळींच आवडत नाहीं बघ ग. मला तूं दररोज कुशींत निजायला घेत जा अन् मग पहा कसा मी अभ्यास करते ती. माई, मला तुझ्याबरोबर येऊंच दे गडे. तूं म्हणतेस कीं तूं जिथें नोकरीला आहेस तेथल्या मालकांना मी आलेली आवडणार नाही. छे! असें कधींच होणार नाही. अन् फार झाले तर मी मुळीं त्यांच्यासमोर जाणारच नाहीं, अगदीं लपून बसेन; अन् रात्रीं मात्र तुझ्या कुशींत निजत जाईन. अन् तूं ज्या गृहस्थांच्या घरीं नोकरी करतेस त्यांना मुले नाहींत का? मी किनई माई, त्या मुलांना खेळवीन; मग तर नाही ना ते गृहस्थ मला रागें भरणार? माई, मला आतां आपल्याकडे नेच गडे. मी येथें मुळींच राहावयाला तयार नाहीं.

— तुझी नलू"

पत्रावर पुष्कळ ठिकाणीं अश्रूंचे डाग पडलेले दिसत होते. अप्पासाहेबांच्या डोळ्यांतूनहि एकदोन अश्रु खळ्कन् त्या पत्रावर पडले.

अप्पासाहेबांनी डायऱ्यांचीं पानें चाळावयास सुरवात केली.

मधुकर गोडशांची स्तुतीच बरेच ठिकाणीं त्यांना आढळली. डायरीचीं बरींच पानें कोरीहि होती.

अप्पासाहेबांचें व कुसुमबाईचें लग्न झालें त्याच्या अगोदरच्या दोनतीन दिवसांचीं पानें मात्र खचून भरलेलीं होतीं.

अप्पासाहेब वाचूं लागले—

"पुरुषजात चांगली की वाईट? एकानं केसानं गळा कापलान्, दुसरा आज सहानुभूतीचा हात देऊं पाहतो आहे. एकाच जगांत एकाच वेळीं स्वर्ग व नरक असूं शकेल काय?......मला माझ्या वडिलांच्याकरतां लग्नाला तयार झालं पाहिजे. जिथं प्रेम करायला गेलं तिथं फसलें. आतां प्रेम करायला शिकलं पाहिजे. परमेश्वर सर्व पाप्यांना क्षमा करतो असं म्हणतात. मग मला तो नाहीं का क्षमा करणार? एक वेळ वाटतं जीव द्यावा......पण माझ्या नलूचं कसं होईल......छे-छे! माझ्या नलूकरतां मला जगलं पाहिजे."

अप्पासाहेबांना घेरी आली व ते मटकन् तेथेंच जमिनीवर बसले.

कांहीं वेळानें अप्पासाहेब उठले. त्यांनीं मनाचा कांहीं तरी निश्चय केला.

देवघरांत जाऊन एकदां देवाला नमस्कार केला, व 'परमेश्वरा ! माझ्या हातून योग्य तेंच घडूं दे ! ' अशी त्यांनीं देवाची करुणा भाकली

त्याच दिवशी अप्पासाहेब मेलनें परगांवी गेले. ते कोठें गेले तें त्यांनीं कोणालाच कळविलें नाही. तीन-चार दिवसांनीं ते परत आले. त्यांचेबरोबर एक मुलगीहि होती.

" नलू, हें तुझ्या आईचं घर बर कां ! " अप्पासाहेब त्या मुलीला म्हणाले व त्यांनीं त्या मुलीचा पापा घेतला.

अप्पासाहेबांनीं सौ. कुसुमबाईना परत कुसुमपुरास यावें अशी तार केली.

" नलू, उद्यां सकाळच्या मेलनं तुझी माई येथें येणार आहे बरं का ! " आप्पासाहेब नलूला म्हणाले.

" पण अप्पा, आता मला तुम्ही बोर्डिंगांत नाहीं ना पाठविणार ? मला गडे माईच्याजवळच रहावंसं वाटतं." नलू लडिवाळपणानें म्हणाली.

" छे-छे ! बेटा आतां तूं अगदीं आपल्या माईच्या जवळच रहा बरं का ! " अप्पासाहेबांनीं नलूचा एक पापा घेतला.

दुसऱ्या दिवशीं सकाळींच नलूला घेऊन अप्पासाहेब आपल्या नवीनच मोटारमधून स्टेशनावर गेले. नलूला मोटारमध्यें बसवून ते कुसुमबाईना घेण्याकरितां प्लॅटफॉर्मवर गेले.

योग्य वेळीं मेल स्टेशनवर आली. पहिल्या वर्गाच्या डब्यांतून कुसुमबाई खालीं उतरल्या. त्यांची प्रकृति फारशी सुधारल्याचें दिसत नव्हतें.

" मला येथें एकदम कां बोलावलं ? " कुसुमबाईंनीं अधीरेपणानें आपल्या पतीला प्रश्न केला.

" पुण्यालाहि तुझी प्रकृति ठीक झाली नाहीं म्हणून तुझ्याकरतां येथेंच एक औषध आणलं आहे. आतां तुझी प्रकृति खात्रीनं सुधारणार."

पतिपत्नी स्टेशनचे बाहेर आलीं. कुसुमबाईचें सामान नोकरांनीं एका टांग्यांत टाकलें. अप्पासाहेबांनीं मोटारचें दार उघडलें.

" कोण, माई ? "

" अग बाई, नलू ! "

" कुसुम ! मला सर्व कांहीं समजलं आहे. तुझी नलू ती आपली दोघांचीहि नलू नव्हे का ? " अप्पासाहेब म्हणाले. त्यांनीं मोटारचें दार धाड्कन् लावून घेतलें व शॉफरला मोटार जोरानें बंगल्याकडे हांकण्यास सांगितलें.

---

# दत्तक पुत्र : : १

आमच्या नवेगांवचे जानराव पाटील म्हणजे मोठ्या नेकीचे गृहस्थ. साऱ्या पंचक्रोशींत जानराव माहीत नाही असा एकसुद्धा मनुष्य सांपडायचा नाहीं. जानरावाच्या घरी एखाददुसरा पाहुणा नाही असा दिवस साऱ्या बारा महिन्यांत एकसुद्धां नसायचा. आषाढी-कार्तिकी पंढरीच्या वाऱ्या जानराव आपल्या बायकोला--जनाबाईना घेऊन नेहमी करायचे. आपल्या परीनें कुणालाहि मदत लागली, अन् ती जानरावांनी केली नाही, असे कधीं व्हायचेच नाही. आला गेला, सरकारी अधिकारी, वैरागी नाही तर दुसरा मुशाफर, कोणीहि, कसाहि मनुष्य आला तरी जानरावांच्या घरी त्याची विचारपूस व्हावयाचीच.

जानरावांची शेती कांहीं फार नव्हती. जानरावांचेजवळ शंभर-सवाशें एकर जमीन असावी. बहुतेक जमीन ते स्वतःच वहात असत. कांहीं जमीन ते खंडानेहि देत असत.

जानराव हे आमच्या काकांचे मित्र. आमचे काका बुधगांवला वकिली करीत असत. जानरावांचें कोर्टात कधींच काम नसायचें. पण नवेगांवला आमच्या काकाची थोडीशी शेती होती व तिची व्यवस्था जानराव पाहत असत, त्यामुळें काकांच्याकडे बुधगांवला जानराव नेहमीं यायचे. मीहि सुट्टींत तेथें जायचा. त्यामुळें जानरावांची व माझी बरीच ओळख झाली होती.

जानरावांचा फार आग्रह म्हणून मी आमचे काका व काकूंचेबरोबर नवेगांवला गेलों होतों.

जानराव हे सुखी होते असें म्हणायला हरकत नाहीं. शरीरप्रकृति उत्तम, काम करावयाची हौस आणि पोटाला पुरेसें देईल इतकी जमीन, ही जानरावांची संपत्ति. जानरावांना एक दुःख मात्र नेहमी जाणवत असावें, आणि तें हें कीं त्यांना मुलगा नव्हता.

"तं असं आहे काकासाहेब," जानराव आमच्या काकांना म्हणाले, "माझं आतां झालं वय. या माघांत मला आतां सत्तावन्नावं वर्ष लागलं. आतां माझ्या मनाला एकच काळजी आहे. आमच्या माणकू अन् सोनू आपापल्या

सासरीं गेल्या आहेत. आता आम्हा दोघां म्हाताऱ्यांना तांब्याभर पाणी द्यायलासुद्धां कोणी नाही. आमचा वंश इथंच खुंटावा ही कल्पनाच कशी तरी वाटते आहे मला. शिवाय आम्ही मेल्यानंतर आम्हाला कुणीसुद्धां पाणी घालायला राहूं नये, आमच्या घरात दिवा लावायलाहि कोणी असूं नये ही केवढ्या दुःखाची गोष्ट आहे काकासाहेब!"

"मग तुमचं म्हणणं तरी काय आहे जानराव?" आमच्या काकानी जळत्या सिगारेटचें थोटुक फेकून दिले व शान्तपणे जानरावांना विचारलें.

"माझ्या मनांतनं काकासाहेब, दत्तक पुत्र घ्यावा असं आहे. दत्तक पुत्र घेतला म्हणजे आम्हांलाहि कुणी मायेचं होईल; आमच्या इस्टेटीला धनी होईल; आमच्या घरांत आमच्यानंतर दिवा लागेल व स्वर्गात आमचा मुलगा आम्हांला पाणी देईल." जानराव भाविकपणाने म्हणाले.

काकासाहेब थोडेसे हंसले, व लगेच पुन्हा नवीन सिगारेट पेटवूं लागले.

"मग काय काकासाहेब, घेऊं ना मी दत्तक? आमच्या शाहूरावचा धाकटा मुलगा घ्यावा असं घरधनिणीच्या मनात आहे. अन् माझीहि त्याला ना नाही. मुलगा आहे साजरा, अन् हुशार पण आहे. शाहूराव माझ्या नुसता मागंच लागला आहे काकासाहेब. शाहूराव आमच्या घरधनिणीचा लाबचा भाऊ लागतो. शाहूरावाला दोनतीन मुलं आहेत. तेव्हां त्यांचा आम्ही एक मुलगा घेतला तरी कांही हरकत नाही."

जानराव जरा वेळ थांबले. आपल्या मनांतील विचार ते बहुतकरून जुळवीत असावेत.

"माझ्या मनांत असं आहे काकासाहेब, कीं माझ्या दोन्ही मुलीना दहा दहा एकर जमीन द्यावी व उरलेली दत्तक मुलाकरिता ठेवावी."

"पण जानराव," काकासाहेब मध्येंच म्हणाले, "मुलींना इतकी थोडी जमीन अन् आजपर्यंत तुमचा कोणीहि नसलेल्या मुलाला मात्र सारी इस्टेट! हा कुठला न्याय?"

"हा आपला आम्हा भोळ्या लोकांचा न्याय, काकासाहेब." जानराव म्हणाले, "आम्हां भोळ्या लोकांचा असा साधा-भोळा न्याय आहे म्हणूनच धनवंतांच्या दौलती अजून टिकल्या आहेत. ज्यानं त्यानं आपल्या जन्मानं अन् कर्मानं घ्यावं लागतं. माझ्या मुली ह्या किती झालं तरी मुलीच. मुलगी

हें परक्याचं धन. त्यांना मी देतों आहें हेंच फार आहे काकासाहेब. मग कधीं घेऊं शाहूरावाच्या मुलाला दत्तक मी ?"

"आतां असं करा जानराव," काकासाहेब म्हणाले, "तुम्ही चार-पांच दिवसांनीं सवड काढून बुधगांवला या; म्हणजे या विषयावर आपण बोलूं व मग मी तुम्हांला माझा सल्ला देईन."

जानरावांना व जनाबाईना हा सल्ला पटला नाहीं असें मला वाटलें. त्याच दिवशी संध्याकाळी आम्हीं बुधगांवला परत आलों. 'आम्हां भोळ्या लोकाचा असा न्याय आहे म्हणूनच धनवंतांच्या दौलती अजून टिकल्या आहेत' हें भोळ्या जानरावांचे वाक्य अजूनपर्यंत माझ्या पक्कें लक्षांत राहिलें आहे.

* * *

नवेगांवाहून आम्ही परत आलों. त्याचेनंतर चारपांच दिवसांनीच आपण शाहूरावाच्या मुलाला दत्तक घेतलें आहे, अशा अर्थाचे जानरावांचें पत्र आमच्या काकांना आलें. आपण आपल्या मुलींना प्रत्येकीं पंधरा एकर जमीन बक्षीस म्हणून दिली आहे व शाहूरावाच्या मुलाला दत्तक घेऊन त्याचें नांव देवदत्त ठेवलें आहे, असें जानरावांनी लिहिले होतें. आपली दत्तक घेण्याची कल्पना काकासाहेबांना पसंत नाहा, असें दिसल्यामुळें काकासाहेबांना त्यांनीं दत्त-विधानाच्या समारंभाला बोलाविले नाही असेंहि जानरावांनी आमच्या काकांना लिहिले होतें.

"जानरावाच्या कष्टाला आतां सुरुवात झाली. यापुढें जानरावांना सुखाचा एक दिवसहि मिळायचा नाहीं!" आमचे काका जेवतांना म्हणाले.

"इकडचं आपलं कांही तरीच बोलणं. जानरावांनीं दत्तक मुलगा घेतला, आतां बिचाऱ्याचा वंश तरी चालेल."

"पण काकू, या उपटसुंभ मुलापासून जानरावांना सुख तरी लागेल का? एका विख्यात ग्रंथकारानं सुखाची व्याख्या करतांना—" मी बोलत होतों.

"हं, खालीं पाहून जेव बापू." आमच्या काकूंनीं मला मध्येंच थांबविलें. "काय विचिविचि जेवतो आहेस, अन् खाली किती खरकटं सांडलं आहेस! तुझा विख्यात ग्रंथकार काय म्हणतो तें मला सांगूं नकोस. तुझा विख्यात ग्रंथकार अन् इकडचा कायदा दोन्हीहि मला नकोत. आपला धर्म सोडूं नये असंच आपलं माझं मत आहे." काकू म्हणाली.

काकूच्या मतांचें मला व काकांनाहि मुळींच महत्त्व नसल्यामुळें तें समजून घेण्याची आम्हीं मुळीच उत्सुकता दर्शविली नाहीं, व तेवढ्यामुळें आमचें बोलणें तेवढ्यावरच थांबलें.

* * *

ही झाली उन्हाळ्याचे सुटीच्या वेळची गोष्ट. त्यानंतर मी दिवाळीच्या सुटीच्या वेळी घरी आलों. त्या वेळीहि जानराव आपल्या जनाबाईला घेऊन आमचे काकाचेकडे आलेले होते.

"काय जानराव," मी म्हणालों, "कसली चालली आहे भानगड आतांशा? तुमची प्रकृति ठीक दिसत नाहीं सध्यां! कांहीं ताप वगैरे येत होता की काय?"

"तसं नव्हे बापूसाहेब," जानराव म्हणाले, "सध्यां मी जरा अडचणींत आहें. आमच्या मुलानं आम्हांवरच दावा लावला आहे. तेव्हां त्या बाबतीत काकासाहेबांचा सल्ला घेण्याकरितां मी आलों आहें."

जानरावांनी मला आपल्या दाव्याचें 'समान्स' दाखविलें. 'ज्या अर्थी' देवदत्त जानराव यानें जानराव भाऊराव व इतर यांचेवर बुधगाव येथील सबजज्ज कोर्टात दावा लावला होता 'त्या अर्थी' जानराव व इतर यांना तारखेचे पूर्वी चार दिवस आपला जबाब 'पेश' करण्याचा कोर्टानें आपल्या सहीशिक्क्यांनिशीं हुकूम दिला होता.

"हा दावा आहे तरी कसला काका?" मी काकांना विचारलें.

"जानरावांच्या दत्तक मुलानें हा दावा आणला आहे. आपल्याला दत्तक घेतल्यावर जानरावांनी वडिलोपार्जित जमिनीपैकीं कांहीं जमीन आपल्या मुलींना बक्षीस दिली आहे. तसं करण्याचा त्यांना हिंदुधर्मशास्त्राप्रमाणं अधिकार नव्हता. तेव्हां त्या जमिनीचा कबजा परत मागण्याचा हा दावा आहे." काका मला म्हणाले.

"पण आपली जमीन परक्या घरीं गेलेल्या मुलींना देण्याची पाटलांना जरूरीच नव्हती मुळीं." काकू मध्येंच म्हणाल्या, "माझं तर 'मत्त' आहे कीं—"

पण काकूच्या 'मत्ता'पेक्षां या बाबतीत कायदेपंडितांचें 'मत्त'च श्रेयस्कर असल्यामुळें काकांनी व मीहि काकूंच्या बोलण्याकडे लक्षच दिलें नाहीं.

जानरावांनी आपला जबाब दाखल केला. दत्तविधानापूर्वीच आपण

आपली जमीन मुलींना बक्षीस दिली असल्यामुळे वादीला तें बक्षीसपत्र रद्द करून घेतां येत नाही, व शंभर-सवाशें एकर जमिनीपैकी फक्त पंचवीस-तीस एकर जमीन जानरावांनी आपल्या मुलींना दिली असल्यामुळें हें बक्षीसपत्र कुटुंबाच्या हिताचेंच होते, व तसे करण्याचा कुटुंबाचे मॅनेजर या नात्यानें जानरावांना अधिकार होता, अशा तऱ्हेचा जानरावांचा जबाब होता. आमचे काकाच जानरावांचेतर्फे वकील होते.

जानरावांच्या जांवयांनीहि खूप तयारी करून ठेविली होती. पहिल्या प्रथम चार-पाच महिने 'समानें'च न तामील होऊं देण्याची त्यांची खटपट होती. त्यानंतर बक्षीस दिलेली जमीन दहा वर्षांच्या पट्टयाने दुसऱ्याच लोकांना वहावयाला दिलेली असल्यामुळें व ते लोक जमिनीच्या कबजांत असल्यामुळें त्यांना प्रतिवादी करणें जरूर आहे ही मुलीची पहिली तक्रार होती. त्यानंतर वादीनें कोर्ट-फी बरोबर दिली नाही, व जमिनीची किमत बरोबर नसल्यामुळे दावा तेथील सबजज्ज कोर्टाला चालविण्याचा अधिकार नाहीं. ही जानरावांच्या मुलीची म्हणजे त्यांच्या जावयांची दुसरी तक्रार होती. त्यानंतर वादीचें दत्त-विधान सशास्त्र नाही. ज्या दिवशी दत्तविधान झाले असें वादीचें म्हणणें आहे, त्या दिवशी जानराव हे विषमानें आजारी असून दत्तविधान काय आहे हें समजण्या-योग्य त्यांची मनःस्थिति नसल्यामुळें तें दत्तविधान सशास्त्र नाही, असा 'जांवईशोध' जानरावांच्या जांवयांनीं मुलींच्या जबाबांत लावला होता. मुलींच्यातर्फेचा जबाब जांवयांनीं नागपुराहून एका प्रख्यात बॅरिस्टराकडून लिहून आणला होता. तो चांगला पांच-सहा कागद भरतील येवढा होता. वेळ येईल तेव्हां आपण जबाब दाखल करूं, असें जांवयांचें म्हणणें होतें.

"मी तर या त्रासाला कंटाळून गेलों आहें, काकासाहेब." जानराव म्हणाले, "सरकारी कोर्टाला अधिकारच नाही असं म्हणतां तरी कसं येतं कोण जाणे! अहो, साऱ्या कागदावर छाप मारून त्या कागदाची किंमत हजारों रुपये करण्याचा जर अधिकार सरकारला आहे, तर येवढा लहानसा दावा चालवायचा अधिकार सरकारी कोर्टाला कसा नाहीं हेंच मला समजत नाहीं. आणि देवदत्तानं कोर्टाची फी कमी दिली तर माझ्या जांवयांचं त्यांत काय नुकसान होतं, हेंहि माझ्या ध्यानांत येत नाही. तुम्हां कोर्टकचेरीवाल्या लोकांचं सारंच विलक्षण."

जानरावांची ही साधीभोळी विचारसरणी होती. ती ऐकून मी व काका

हंसलों. बरें झालें त्या वेळीं आमच्या काकू तेथें नव्हत्या; नाहीं तर त्या लगेच आपलें 'मत्त' सांगण्याकरतां पुढें सरसावल्या असत्या.

सुटीनंतर मी परत नागपूरला गेलो व उन्हाळ्याचे सुटीत परत घरीं आलों. जानरावांचे मुकद्दम्याचें काय झाले याची सहज चौकशी केली.

" अरे बापू, " काका म्हणाले, " अजून त्या मुकद्दम्याला मुळी सुरवातच झाली नाही. चार-पाच महिने मुळी साऱ्या प्रतिवादींवर समन्संच बजावून झाली नाहीत. त्यानंतर आता हा मुकद्दमा या कोर्टाला चालविण्याला अधिकार आहे की नाही या मुद्द्यावरच घासाघीस चालली आहे."

" पण काका," मी म्हणालों, " अशा चालढकलीनं लोकांचं नुकसान होत नाही का ? "

" अरे, या दिरंगाईला कोर्ट काय करणार बापू ? " काका म्हणाले, " जानरावांचे जावईच जर मुकद्दमा लांबवीत आहेत, तर त्याला कोर्टानं काय करावं ? कायदा हा दुधारी आहे बापू ! त्याचा सदुपयोगहि होतो व दुरुपयोगहि होतो कायद्याचा कोणी कायदेशीर रीतीनं दुरुपयोग करूं लागला म्हणजे सगळ्यानाच फार त्रास होतो !"

शेवटीं एकदां मुकद्दमा रुळावर आला. तक्रारी व त्यांची उत्तरें सुरू झालीं. लवकरच मुद्दे निघणार असा रंग दिसूं लागला.

या वर्षीची कार्तिकीची यात्रा जानरावांना करतां आली नाही. या दत्तक पुत्राच्या मुकद्दम्याच्या भानगडीला खर्च फार लागूं लागला.

" मला वाटतं काकासाहेव, माझ्या हयातींत कांहीं हा मुकद्दमा संपत नाही." जानराव एकदां उदासपणं आमच्या काकांना म्हणाले, " मी आमच्या जांवयाना परवां म्हटलं, कीं देवदत्त इतका भांडतो आहे, तर द्यानात त्याला माझी जमीन सोडून ! आम्हां म्हाताऱ्यांचा तुम्हाला पूर्ण आशीर्वाद आहे. तुम्ही पराक्रमी आहांत. तुम्हांला पुष्कळ दुसऱ्या जमिनी मिळतील. आमच्या मुली काकासाहेव, अगदीं आपल्या आईसारख्या सरळ आहेत बघा. माझं म्हणणं त्यांना रुचलं, पण आमच्या दोघांहि जांवयांना काहीं माझं म्हणणं आवडलं नाही."

जानराव बोलतांना थांबले. आजपर्यंत म्हाताऱ्यानं कोणाचा शब्दहि ऐकून घेतला नव्हता व म्हाताऱ्याचा शब्दहि कधी खाली पडला नव्हता. पण आज—?

"माझे जांवई म्हणाले मला काकासाहेब, की तुम्हांला म्हातारचळ लागला आहे. तुम्ही आपली सारी इस्टेट देणार त्या पोराला, अन् आम्हांला देणार नुसते आशीर्वाद. चांगलाच कावा आहे की तुमचा!"

जानराव पुन्हा बोलावयाचे थांबले. म्हाताऱ्याच्या डोळ्यांतून घळघळ अश्रु गळूं लागले. जानरावांचा पाठचा भाऊ वारला त्या वेळीं जानराव हताश झाले नव्हते व रडले नव्हते. कापसाच्या व्यापारांत दहा हजार रुपये तोटा आला त्या वेळीं जानराव रडले नव्हते; पण आज जानराव रडले. काय करतील बिचारे!

"काय होणार हो काकासाहेब या मुकद्म्याचं?"

दिवसामागून दिवस जात होते पाण्यासारखा पैसा खर्च होत होता. जानरावांच्या मनातून मुकद्मा लढवावयाचा नाही असें दिसूं लागल्यापासून जानरावांचे जांवईहि जानरावांवर रागावले होते. दुःखानें जर्जर होऊन जनाबाई बिचाऱ्या वारल्या. स्वतःच्याच घरांत जानराव चोर ठरले. म्हाताऱ्याची नवेगावला फार आबाळ होऊं लागली म्हणून आमच्या काकांनी त्यांना आपल्या घरीच आणून ठेवलें.

मी वकिलीची परीक्षा पास झालों व आमच्या काकांना धंद्यांत मदत करूं लागलों

देवदत्ताचा मुकद्मा पहिल्या कोर्टात खारीज झाला व वरिष्ठ कोर्टात तोच निकाल कायम झाला. देवदत्तानें नागपूरच्या वरिष्ठ कोर्टात अपील केलें होतें व तेथें त्यानें 'दोन बालिस्टर' व तीन वकील दिले होते. वरिष्ठ कोर्टात देवदत्त मुकद्मा जिंकणार, निदान फेर-चौकशीला मुकद्मा परत येणार अशी नवेगांवात दाट बातमी होती.

पैशापरी पैसा गेला होता. अब्रूचे धिडवडे निघत होते. म्हातारे जानराव खंगत चालले होते. जानरावांचे जावई व दत्तक पुत्र मात्र जिद्दीनें मुकद्मा लढत होते.

जानराव बरेच आजारी होते. म्हातारा कणखर व सशक्त, पण या मुकद्म्याच्या काळजीने व दगदगीने तो झिजूं लागला. जनाबाई गेली तेव्हांपासून म्हाताऱ्याचें संसारांतील लक्षच उडालें होतें. जांवयांना सासऱ्याचा राग आल्यामुळें स्वतःच्या पोटच्या मुलींना भेटणेहि जानरावाला शक्य नव्हतें. म्हाताऱ्याचा दत्तक पुत्र तर म्हाताऱ्याला सारखे शिव्याशाप देत होता. आपण

फार आजारी आहोंत, आपली यापुढें जगण्याची आशा नाहीं, तेव्हां आपल्याला एकदां भेटून तरी जावें अशी पत्रे जानरावांनीं आमच्या काकाच्या-कडून आपल्या जांवयांना व दत्तक पुत्राला पाठविलीं होती पण 'अपिला'ची तयारी करण्यात सगळेच दंग झालेले असल्यामुळें म्हाताऱ्याला कोणीच भेटा-वयाला येऊं शकले नाही.

आज जानरावाची प्रकृति विशेषच खराब होती.

"—माझ्या मुली, काकासाहेब, अल्लाच्या गाई आहेत बिचाऱ्या! भेटल्या असत्या तर मला फार बरं वाटलं असतं. पण परमेश्वराची—नव्हे माझ्या जांवयाची तशी इच्छा नव्हती! कसं होईल पुढं त्याचं कोणास माहिती!

—मेल्यानंतर मला कुणीं तरी पाणी द्यावं, म्हणून मी दत्तक घेतला; पण त्यानं मला जिवंतपणीच नरकात घातलं, काकासाहेब! दत्तक घेतल्यापासून एक दिवस कधी सुखानं झोप घेतली नाही, की कधी सुखाचा घास गिळला नाही! घरधनीण बिचारी काळजीनंच झिजून गेली, अन् मीहि आतां त्याच मार्गावर आहें.

—माझ्याजवळ जर पैसा नसता तर माझ्या जांवयानी व दत्तक मुलानं हीं भांडणंच सुरू केलीं नसतीं. मी जर भिकारी असतो काकासाहेब, तर फार सुखी असतो.

—दानधर्म केला असता तर मनाला समाधान झालं असतं; पण मुकद्दम्यांच्या खर्चात पैशापरी पैसा गेला, अन् दुःख मात्र कपाळी आलं.

—पांडुरंगाची इच्छाच मी हालांत मरावें अशी असली तर त्याला कोण काय करणार काकासाहेब!

—माझ्या म्हाताऱ्यावर तुम्ही कृपादृष्टि ठेवलीत तशीच माझ्या मुलीं-वर ठेवा! त्यांना आतां माझ्या जागी तुम्हीच आहांत.

—करायला गेलो काय अन् झालं काय! परलोकांत सुख द्यावं म्हणून दत्तक घेतला, तों त्यानं याच आयुष्यांत मला नरकांतल्या यातनांची ओळख करून दिली.

—तूंच मला दत्तक घ्यायची बुद्धि दिलीस. तुझ्याच शास्त्रांनीं मला सांगितलं, की दत्तक घेतल्याशिवाय तरणोपाय नाही, आणि तूंच मला शेवटीं इतकं छळलंस तें कां, म्हणून विचारायला मी पांडुरंगाकडे जातों आहें."

रात्रीची वेळ होती. जानराव वरील अर्थाचे शब्द बोलत होते. जानराव

वकील नव्हते, किंवा पंडित नव्हते. साध्याभोळ्या विचारसरणीचा मनुष्य; पण सभ्यांचें त्याचें बोलणें असें होतें, की मोठमोठ्या पंडितांनीहि तोंडांत बोटें घालावींत.

जानरावाची रात्रभर तगमग चालू होती. दुसरे दिवशीं एकादशी होती. उजाडत्या एकादशीला जानरावांच्या प्राणांनी दुःखाने गांजलेल्या शरिराचा त्याग केला.

आदल्या दिवशी रात्रीच जानरावाचे जांवई व दत्तक पुत्र नागपूरला 'अपिला'करतां गेले होते. जानरावाच्या मुली बिचाऱ्या आपल्या घरीं संसार-कार्यांत चूर होत्या. जगाचे बाकीचे व्यवहार जसे चालायचे तसेच चालले होते. कोर्टकचेऱ्यांत नेहमीप्रमाणेच गर्दी होती. जानरावांचा आत्मा मात्र पांडुरंगा-कडे दत्तक पुत्राची तक्रार करण्याकरता गेला होता.



# जगन्नाथाची कृपा : : १०

त्या दिवशी आमच्या अप्पासाहेबांच्या घरी खूपच गडबड होती; आणि गडबड होती तीहि काही उगीच नव्हती. तो प्रसंगच तसा आनंदाचा व महत्त्वाचा होता. आमचे अप्पासाहेब हे 'सोन्याचा चमचा तोंडांत धरून'च जन्माला आलेले होते अप्पासाहेबाचें घराणें म्हणजे एक आदर्श घराणें होतें. दहा-पंधरा गांवांची इनामदारी या घराण्यात कित्येक पिढ्या नांदत होती. इतका पैसा होता; इतकें ऐश्वर्य होतें तरी या घराण्यांतली सगळी माणसे सद्वर्तनी असत. अप्पासाहेबाचे वडील बापूसाहेब तर अगदी आजच्या कालांतले ऋषिच होते. त्यांनीं आपल्या सुस्वभावानें आपल्या कुळांना अगदी आपलेंसें करून घेतलें होते. बापूसाहेबांनी जरी विश्वविद्यालयांतून एखादी पदवी घेतली नव्हती तरी त्यांना वाचनाचा नाद फार होता.

आपल्याला उच्च शिक्षणाचा लाभ मिळाला नाहीं खरा, पण आपल्या मुलाला मात्र शक्य तेवढें चांगलें व उच्च शिक्षण द्यावयाचें हा बापूसाहेबाचा हेतु होता. संपत्तीची मुळीच ददात नसल्यामुळे अप्पासाहेब विलायतेला गेले होते तेथून ते एका प्रख्यात विश्वविद्यालयाची डॉक्टर ऑफ् फिलॉसफी ( Ph. D. ) ही पदवी घेऊन आले होते; व त्याचबरोबर ते बॅरिस्टरीची परीक्षाहि देऊन आलेले होते.

अप्पासाहेब विलायतेहून येऊन दोन वर्षे झालीं होती. देवदयेनें आप्पासाहेबाना नुकतेंच पुत्ररत्न झाले होतें. आजचा प्रसंग अप्पासाहेबांच्या मुलाच्या बारशाचा होता.

जेवणें उरकली होती. अप्पासाहेब व त्यांचे मित्र गप्पा मारीत हॉलमध्यें बसले होते. मलाहि अप्पासाहेब आपला मित्रच समजत. तेव्हां मीहि त्या मंडळींत बसलों होतों. कांहीं दिवसांपासून मी त्यांचा खास पाहुणा होतों.

" बाकी परमेश्वराची लीला अगाध आहे नाहीं अप्पासाहेब ? " बाबूराव म्हणाले, " परवां तो फाजलभाई मोटारच्या अपघातांतून कसा वांचला बरं ! "

" येऊन जाऊन तुमची कथा परमेश्वराच्या पाळुपदावर येऊन ठेपते,

बाबूराव." अप्पासाहेब उसळून म्हणाले, "अहो फाजलभाई जो वांचला तो चान्सनं वांचला. तुमच्या परमेश्वराला त्याला जर वांचवायचाच होता तर त्यानं त्याला अगोदर मोटारच्या अपघातांत सापडविलंच कां म्हणतो मी? छे, छे! मी म्हणतों, अगोदर परमेश्वरच नाही, आणि असला तरी तो दयाळु व निःपक्षपाती नाही. फाजलभाई श्रीमंत होता म्हणूनच त्याची मोटार चांगल्या स्थितीत होती, व म्हणून तो मोटारच्याबाहेर फेकला गेला. बंद, खटखुट करणाऱ्या लॉरीत जर फाजलभाई असता तर तो अपघातांत चिरडूनच मेला असता. फाजलभाई श्रीमंत होता म्हणून वांचला. त्याच्या पैशानं त्याला वांचविलं. तुमच्या दयाघन जगन्नाथानं त्याला वांचविलं नाही......"

अप्पासाहेब आणखी खूप बोलले असते, पण इतक्यांत बापूसाहेब तेथें आल्यामुळें एकदम त्यांचे भाषण थांबले. बापूसाहेबांचा परमेश्वरावर फार भरंवसा असे. त्याला ते 'दयाघन जगन्नाथ' म्हणत. उलट अप्पासाहेब हे पराकाष्ठेचे नास्तिक होते. कोणत्याहि शास्त्रज्ञाला टेस्ट-टयूबमध्यें अजून परमेश्वर दिसला नाही असे ते म्हणत...

"अप्पा," बापूसाहेब हंसत हंसत म्हणाले, "तूं अजून तरुण आहेस. परमेश्वराची कृपा सर्व जगावर कशी सारखी आहे याची तुला कल्पना नाही. तुमच्या शास्त्रज्ञांना परमेश्वर टेस्ट-टयूबमध्यें सांपडला नाही हें बरोबर आहे. तो टेस्ट-टयूबमध्ये नसून तुमच्या हृदयांत आहे. दयाघनाची जर इच्छा असली तर त्याच्या प्रेमाचा तुला लवकरच अनुभव येईल. बरं आतां उठा! मुलाचं नांव ठेवण्याची वेळ झाली."

* * *

"कुणी गोविंद घ्या!
कुणी गोपाळ घ्या!"

बायका म्हणत होत्या. मधल्या घरांत बायकांची नुसती गर्दी झाली होती.

"बाकी तुमचा मुलगा अगदीं नक्षत्रासारखा आहे, बरं का सत्यभामाकाकू!" काशीताई म्हणाल्या.

सत्यभामाकाकूंनीं (अप्पासाहेबांच्या मातोश्री) मुलाकडे प्रेमानं पाहिलें.

"जगन्नाथाची कृपा!" त्या म्हणाल्या.

"कुणी गोविंद घ्या!
कुणी गोपाळ घ्या!"

बायका म्हणत होत्या.

मालूवहिनी लहानग्या बाळाला घेऊन मधें बसल्या होत्या. वहिनी अगोदरच्याच सुंदर! आणि आजच्या प्रसंगी आपल्या चिमकुल्या बाळाला घेऊन बसलेल्या आमच्या वहिनी फारच सुंदर दिसत होत्या. अत्यंत प्रेमभरानें आपल्या मुलाकडे त्या पाहत होत्या.

" अन् सत्यभामा, दररोज मुलाची अन् सूनबाईची दृष्ट काढीत जा बरं का!" पार्वतीबाई म्हणाल्या. पार्वतीबाई ह्या बापूसाहेबांच्या मावशी होत्या.

" बाकी काकू, तुमची सून कशी गौरीसारखी दिसते, बरं का!" कृष्णावन्सं म्हणाल्या.

" जगन्नाथाची कृपा!" सत्यंकाकूंनी उत्तर दिले.

मुलगा रडूं लागला. प्रत्येकीने त्याला थांबविण्याचा प्रयत्न केला. तो राहीना.

वहिनी हंसल्या. सत्यभामाबाई हंसल्या.

" सुनबाई—"

वहिनींनी आपले काजळ घातलेले काळेभोर डोळे वर करून आपल्या सासूकडे पाहिलें.

" सुनबाई," सत्यभामाबाई म्हणाल्या, " बाळाला भूक लागली असेल. घे बरं त्याला एकदां; जा जरा आंत पाहूं."

वहिनी मुलाला घेऊन गेल्या.

" बाकी मुलगा फारच गोड आहे बरं का! मातृमुखी आहे तो!" जमलेल्या बायका म्हणत होत्या.

वहिनी मुलाला घेऊन बाहेर आल्या.

सत्यभामाबाई हंसल्या. वहिनीहि हंसल्या. आम्ही मंडळी हा सर्व प्रकार पाहत होतों. बापूसाहेबहि हंसले.

" कुणी गोविंद घ्या!
कुणी गोपाळ घ्या!"

बायका पाहत होत्या. मुलाचें नांव जगन्नाथ असें ठेवलें. सर्वांना पेढे वांटले.

* * *

बारशाच्या दुसऱ्या दिवशीची गोष्ट—

अप्पासाहेब, बापूसाहेब, मी व अप्पासाहेबांचे दिवाणजी दामूअण्णा, बापूसाहेबांचे वडगावी गेलो होतों. आपल्या कुळांना भेटावयाचें, त्यांची चौकशी करावयाची व त्याना जरूर ती मदत करावयाची हा बापूसाहेबांचा शिरस्ता असे. त्यामुळें बापूसाहेबाचेवर त्यांच्या कुळाचें फार प्रेम असे. ते बापूसाहेबांना बाबाजी व अप्पासाहेबांना दादाजी म्हणत.

एक तरुण बाई बाहेर भाडीं घाशीत होती.

" काय ग साळू, आहे का तुझा सासरा घरांत ? " बापूसाहेबांनी विचारलें.

साळूनें पदर आपल्या तोंडावर थोडासा पुढें ओढून घेतला.

" ते भोनगावी गेले आहेत "

" अन् तुझा दादला ? "

" तेही भोनगावाला गेले आहेत. आजच्या बाजारीं बैलांची जोडी घ्यायची आहे." साळूने उत्तर दिले. पण तें उत्तर देतांना ती किती लाजली, किती अवघडली. बापूसाहेब प्रेमानें व कौतुकानें तिच्याकडे पाहत होते.

आमचे बोलणें ऐकून साळूची सासू घरांतून बाहेर आली.

"अग वया ! बाबाजी ! अन् एकदम कसे आलातजी ? घरधनी अन् भाऊ बाजाराला गेले आहेत."

साळूच्या सासूचे पुराण सुरू झालें. सान्या कुळाचा बाबाजीवर फारच विश्वास ! त्यामुळें सारीं गान्हाणी ती बाबाजींच्या कानी घालीत.

साळू आपले काम करीतच होती.

" त्याहा ! त्याहा ! त्याहा !" घरांतून आवाज आला.

" काय ग साळू, मुलगा रडतो आहे तुझा ! जा बरं घेऊन ये त्याला बाहेर ! " बापूसाहेब म्हणाले.

हात धुऊन साळू घरांत गेली व आपल्या मुलाला घेऊन बाहेर आली.

साळूच्या सासूनें मुलाला घेतले.

मूल रडतच होतें.

" रडूं नको सोन्या ! तो पहा आला तुझा बाबा ! " साळूची सासू मुलाला खेळवूं लागली.

मूल रडतच होतें. " हें पहा ! साळू तुझ्या मुलाला लागली भूक. त्याला जरा घे अन् मग आण बाहेर " बापूसाहेब म्हणाले.

साळूची सासू कौतुकानें हंसली. साळू मात्र, अगदी लाजून चूर झाली. मुलाला सासूजवळून, घेऊन ती घरात गेली.

साळूच्या सासूचें पुराण पुन्हा सुरू झाले.

थोड्याच वेळात साळू आपल्या मुलाला घेऊन पुन्हा बाहेर आली.

मुलगा हंसत होता. आपला एक हात त्यानें तोंडात घातला होता.

साळूनें मुलाला आपल्या सासूजवळ दिले.

"का रे, गुलामा? खूप भूक लागली होती नाही का तुला!" बाबाजींनी मुलाच्या गुबगुबीत गालाला हात लावला व म्हणाले.

कांहीं वेळानें आम्ही घरी परतलो. मोटार चालू झाली.

* * *

मोटार चाललीच होती. "अप्पा," बापूसाहेब गंभीरपणानें म्हणाले. "साळूचा मुलगा तूं पाहिलास! काल तुझा मुलगा रडूं लागला आणि तो कसा व कां थांबला हें तूं पाहिलेस. पैशाने जमविता येईल तेवढी सर्व सुखसामुग्री त्याच्याभोंवतीं होती. पण त्याचें त्यानें समाधान होणें शक्य नव्हतें, त्याला त्याचे अन्न पाहिजे होतें तें त्याला मिळतांच तो थाबला!"

"—आज तूं साळूचा मुलगा पाहिलास. तोहि रडत होता. त्याला भूक लागली होती म्हणून तो रडत होता. साळूच्या घरीं संपत्तीची लयलूट नव्हती. पण प्रेमाची मात्र होती. त्याला साळूने पाजतांच तो रडण्याचा थांबला."

"—आपल्या घरीं खूप पैसा आहे व साळूच्या सासऱ्याच्या घरी नाही. पण दोन्हीहि घरात मातृप्रेमाची समृद्धि आहे. दोन्हीं घरात मुलांना पाहिजे तें सुख—मातृसुख परमेश्वरानें सढळ हाताने दिले आहे."

"—तुझ्या मुलाच्या दुधाची सोय जशी परमेश्वरानें आपल्या घरी केली आहे तशीच सोय साळूच्या घरीहि केलेली आहे."

"—साळू व आपली सूनबाई दोघी निरनिराळ्या परिस्थितीत वाढलेल्या. पण आपल्या मुलांच्यावर प्रेम करण्याची दोघींचीहि एकच तऱ्हा. दोघीहि माताच!"

"—अंगावरचे दूध! श्रीमंतांच्या घरीं, व गरिबांच्या घरी एकच जात! अगदीं सारखे."

"—परमेश्वरानें सर्वांना सारखे दिले आहे. गरिबी व श्रीमंती हा भेद

माणसानें केला आहे. असा फरक जर परमेश्वराजवळ असता तर श्रीमंतांच्या मुलांना मिळणारें दूध व गरिबांच्या मुलांना मिळणारें दूध यांत फरक असता."

"—परमेश्वराने श्रीमंतांच्या वाड्यांतील व गरिबांच्या झोपडीतील मुलांना एकच अन्न योजले आहे व तें अगदी एकाच जातीचे व एकाच तऱ्हेचे आहे!"

"—अप्पा! श्रीमंतांना व गरिबांना देव सारखाच लेखतो. तुझ्या टेस्ट-ट्यूबमध्ये न सांपडणारा देव तुला मातेच्या प्रेमळ हृदयांत, इतकेंच नव्हे, तर प्रत्येक प्रेमळ अंतःकरणांत सांपडेल! तो न्यायी आहे व प्रेमळ आहे. तो दयाघन आहे आणि जगन्नाथहि पण आहे."

आमची मोटार शहरांत शिरली. कोपऱ्यावरच्या जगन्नाथाच्या देवळांत आरती चालू होती. जवळच्या मशिदीत लोक प्रार्थना करीत होते व सिव्हिल स्टेशनमधील चर्चमध्यें लोक प्रार्थनागीत म्हणत होते!



# आंधळें प्रेम : : ११

तसं म्हटलं तर माझ्या मनांतून ही हकीकत मुळीं लिहायचीच नव्हती. माझ्या लग्नाची हकीकत ती, त्यात नवल तें कसलं असायचं? आणि शिवाय आम्हां हिंदु मुलींचं प्रेम आंधळंच असतं असं म्हणानात घटकाभर. आमचा पति कसाहि असला तरी आमची पतिभक्ति इतकी निस्सीम असते, की हाडा-मांसाच्या चालत्या बोलत्या माणसाला आम्ही प्रेमानं परमेश्वरस्वरूप बनवितों. आजच पहा ना, 'तूं आपली हकीकत एकदा लिही' म्हणून सारखं माझ्या पाठी-मागं लागायचं आहे. मी एकदोन वेळां नाहीं म्हटलं, पण आतां इतका आग्रहच आहे स्वारीचा, तेव्हां लिहिणं भागच आहे मला. मी जर उत्तम लेखिका असतें तर फार तर मी एखादी कादंबरीवजा मोठी गोष्ट डौलदार भाषेंत लिहिली असती; पण मी कांही लेखिका नाही—काही नाही. जाऊं दे तें; मला आपलं एक समजतं, स्वारीकरतां आपण वाटेल तें करायचं आणि म्हणून मी माझ्या लग्नाची हकीकत थोडक्यात लिहितें, आहे झालं!

माझे बाबा विलासपूर येथे कलेक्टरच्या कचेरीत कारकून आहेत. माझ्या बाबाना मी एक मुलगी व चार मुलगे. आमच्या सर्व भावंडात मी वडील, माझ्या पाठचा प्रभाकर, त्याच्यानंतरचा दिवाकर, त्याच्यानंतरची एक मुलगी दहा दिवसांतच वारली, आईला त्यावर सुधाकर झाला अन् त्यावर विभाकर जन्मला. बाबांची गरिबी, पगार मिळायचा सारा शंभर रुपये, आणि या महागाईच्या दिवसांत येवढाच पगार आमच्या कुटुंबाला कसा पुरायचा तुम्हीच सांगा? पहिल्यानं जेमतेम पगार पुरे, पण आम्ही सर्वच भावंडं शाळेंत जायला लागलो तेव्हांपासून बाबांची फारच ओढ व्हायला लागली. आम्हां सगळ्यांची फीच म्हटली तरी महिना दहा रुपये होत असत. अन् शिवाय इतर खर्च. पुढं माझ्या भावंडांच्या मुंजी झाल्या त्या वेळी तर बाबा फारच मेटाकुटीला आले. घरांतलं आजोबांच्या वेळचं डबोलं या वेळीं सारं खर्च झालं. मुंजी मात्र झाल्या कशा तरी एवढंच.

पण आमच्या अडचणींना आतां कुठं सुरुवात होत होती. मला चौदावं वर्ष लागलं तेव्हांपासून बाबा मला स्थळ पाहायला लागले. पण माझं मेलं कुठं

जमेनाच. अन् जमणार तरी कसं? बाबा पडले गरीब, एवढ्या मोठ्या कुटुंबाचा खर्च भागवायचा, मुलांचं शिक्षण करायचं; त्यांनीं हुंड्याकरतां पैसे तरी कुठून आणायचे अन् पैशाशिवाय मला पदरात घ्यायला तरी त्या वेळीं कोण अन् कसा तयार होणार? मला देवानं थोडं रूप तरी द्यायचं होतं, पण माझ्या वाट्याला तेंहि नव्हतं. अगोदर मी आहे बरीच काळी, अन् आजच्या काळांत काळ्या मुलीला चांगला नवरा मिळणं हें आय्. सी. एस्. परीक्षा पास होण्या-इतकंच कठीण आहे. बरं, एवढ्यात झालं असतं तरी हरकत नव्हती; पण दुर्दैव मला आणखी त्रास देत होतं. माझे केस आंखुड अन् विरळ आहेत, कपाळ अरुंद आहे, नाक नकटं आहे, अन् जिवणी रुंद आहे. आतां आणखी कशाला माझं रूप तुम्हांला सांगत बसूं? मी कुरूप आहे येवढं सांगितलं म्हणजे पुरे नाहीं का झालं?

शिवाय मुली कितीहि श्रमिंताच्या असल्या अन् शिकलेल्या जरी असल्या तरी त्यांचं रूप जर चांगलं नसलं तर त्यांच्या सर्व गुणांवर पाणीच पडतं; मुलींना रूप हें पाहिजेच कोणी कितीहि नाहीं म्हणेना का, पण प्रत्येकीला आपण सुंदर दिसावं असं वाटतच असतं, आणि आमच्यापैकी कित्येकजणी रूपाची उणीव आपल्या पोशाखानं भरून काढण्याचा प्रयत्न करीत असतात. पण जाऊं द्या तें. मी मुळी वहावतच जात होते.

बाबा गरीब व मी कुरूप, त्यामुळं माझं कुठं काही जमेना. चार वर्षं बाबा सारखी स्थळं पाहत होते. मुन्सफापासून तों त्यांच्याच हाताखालील कार-कुनापर्यंत सारी स्थळं पाहिली, पण अंऽहं. बाबा तर कावून गेले मला अठरावं वर्ष लागलं. इतके दिवस आई तरी माझ्याशी बरी वागत असे. पण पुढं तीहि माझ्याशीं नीट वागेनाशी झाली. माझी सगळ्यांना घरांत अडचणच भासूं लागली म्हणायची. पण मी तरी काय करूं ह्या गोष्टीला? रूप असणं हें कुणाच्या स्वाधीनचं का आहे? पण मुलींचे हालच करायचे मुळी देवाच्या मनांत असतं, त्याला कोण काय करणार?

बाबांनीं दोन तीन बिजवराची–तिजवराची स्थळंहि पहिलीं, अन् मी जिवंत प्रेताशींसुद्धां त्या वेळी लग्न लावायला तयार होते. म्हणजे त्यांत माझ्यामुळं घरांतला त्रास तरी टळला असता, पण तेंहि मेलं जमेना. पण बरं झालं बाई,

त्या वेळी माझं लग्न जमलं नाही  नाही तर आजचं माझं रत्न मला कसं बरं मिळालं असतं?

आमच्या घराजवळ रावबहादुर देशमुख वकील राहत असत. देशमुखांची प्रॅक्टिस चांगली हजार रुपये दरमहाची होती. देशमुखांच्या घरांत माणसं सारी चार. रावबहादुर, त्यांच्या पत्नी उमाकाकू, मुलगी प्रभावती अन् मुलगा मकरंद. प्रभावती माझ्यापेक्षा दोन वर्षांनी मोठी होती. पण तिची माझी अगदीं लहानपणापासून मैत्री. पुढं प्रभावती मॅट्रिकची परीक्षा पास झाली, अन् मुंबईला कॉलेजमध्यें गेली. तरी पण सुटींत ती जेव्हा घरी येई तेव्हां मी नेहमी तिच्याकडे जायची. दुसऱ्या सुटीत मात्र तिच्या वागण्यांत थोडा फरक दिसला, अन् मग मी माझं तिच्याकडे जाणं-येणं वरंच कमी केलं.

अन् प्रभावती खरोखरच सुंदरहि आहे  अगदी  नक्षत्रच आहे म्हणानात का जरा वेळ  अन् बायकांनी बायकांचं सौंदर्य काय वर्णन करायचं आहे? शिवाय रावबहादुरहि पैसेवाले असल्यामुळं दुधांत साखरच पडली होती असं म्हटलं पाहिजे

प्रभावतीच्या कॉलेजमध्यें दिनकरपंत देशपांडे नांवाचे एक विद्यार्थी असत. (अग बाई! पण जरा वेळ गम्भतच करतें हं मी.) दिनकरपंत हे पुण्याचे राहणारे. दिनकरपंतांचे वडील ते लहान असतानाच वारले  पुढं त्यांच्या चुलत्यानं त्यांचं पालन-पोषण करायचं ठरविलं, अन् त्यांना शिक्षणहि दिलं. शिवाय काकासाहेबांना ( दिनकरपंतांच्या चुलत्याना ) मूलबाळ कांहीएक नव्हतं. तेव्हा त्यांनी दिनकरपंतांनाच मुलगा समजायला सुरुवात केली झालं.

प्रभावती व दिनकरपंत यांचं कॉलेजमधें असतांनाच प्रेम बसलं. प्रभाकर फारच हुषार विद्यार्थी. बी. ए. होतांच ते आय्. सी. एस्. होण्याकरितां विलायतेला जायचे असं ठरलं होत  तेव्हां प्रभावतीला दिनकरपंतापेक्षां जास्त चागलं स्थळ कोणचं मिळणार? रावबहादुरांनी हें ओळखलं असावं, कारण दिनकरपंत एक वर्षी रावबहादुरांचेकडे सुटींत दोनदां आले होते  प्रभावती व ते नेहमी हंसत-खेळत फिरायला जात, वादविवाद करीत. सुखीच ते; पण एका कुमारिकेनं पुरुषाशी इतकी सलगी करूं नये असं आपलं मला वाटे  अन् एक दिवस मी माझं मत प्रभाला भीतभीत कळविलंहि.

"हं पहा वेणू," प्रभा मला म्हणाली," माझं प्रेम दिनकरपंतांवर बसलं आहे व त्यांनाहि मी आवडतें आहे. मी दिनकरपंतांची वाग्दत्त वधू आहे, व बाबांचीहि

या गोष्टीला सम्मति आहे आम्ही फक्त बी. ए व्हायचीच वाट पाहत आहोंत; तेव्हा आम्ही जरा मोकळेपणानं वागलों तर कुठं बिघडलं ? अन् शिकल्यासवरल्या मुलींना इतकीसुद्धां स्वतंत्रता नको वाटतं ?"

प्रभावतीच्या उत्तरानं माझं समाधान मात्र झालं नाही.

दिनकरपंतांना मी प्रभावतीच्या घरीं एक-दोनदांच पाहिलं होतं. त्याच्या चेहऱ्यावरनं ते फारच सज्जन असावेत असं मला वाटलं. तरी पण प्रभावतीचं व दिनकरपंतांचं लग्न जर झालं तर तें जोडपं सुखी होईल असं काही मला वाटेना. असं मला का वाटे याचा उलगडा मला त्या वेळीं कांहीं होईना, आणि आज.........

दिनकरपंत तरुण होते, सुस्वरूप होते व तितकेच देशाभिमानी होते आय्. सी. एस्. होऊन नुसता पैसा मिळविण्यापेक्षां शिक्षणविषयक ज्ञान मिळवावं व एखाद्या खाजगी कॉलेजमध्ये शिकवून देशसेवा करावी असं त्याना वाटे. प्रभावतीला तें आवडत नसे. मनुष्यानं जन्माला येऊन चैन करावी व तेवढी करून जमलं तर देशहित साधावं असं तिला वाटे.

एके दिवशीं या बाबतीत प्रभावती व दिनकरपंत यांचेमधें या विषया-संबंधी मोठा वाद झाला. वाद चालू असताच प्रभा चिडली व दिनकरपंतहि जरा गंभीरपणानंच बोलूं लागले. मी त्या वेळीं तिथंच होते. मला समजेना आपण काय करावं. मी अगदी चोरासारखी बसून होते; व तेथून उठून जाण्याची संधीहि पाहत होतें.

"वेणूताई, तुम्हीच सागा मी काय करावं ? आय्. सी. एस्. होऊन ओझ्यावारी पगार मिळवावा, का फर्ग्युसन कॉलेजांत प्रोफेसर होऊन देशसेवा करावी ?" दिनकरपंतांनी मला विचारलं.

"सागच ग तूं—वेणू" प्रभानेंहि मला आग्रह केला. ती दोघंहि माझ्याकडे अगदीं रोखून पाहूं लागलीं.

आतां काय करावं बाई ? केवढा पेंच पडला होता मला ! हो, मी लाजेनं अगदीं अर्धमेली झाले.

"मला वाटतं आपण देशसेवा करावी !" मी उत्तर दिलं. पण हें उत्तर देतांना मी किती बावरलें, किती चाचरले. हें माझं मलाच माहिती.

"Bravo !" दिनकरपंत म्हणाले. "वेणूताईना माझंच मत पसंत पडलं. पाहिलंस प्रभा ?"

" पाहिलं, पाहिलं हो!" प्रभा चिडून म्हणाली, " वेणूचं व तुझं इतकं जर मतैक्य होत असेल तर तिच्याशींच लग्न लावीनास कां तूं? म्हणजे तुला देशसेवा करायला या कुरूप वेणूचं चांगलं साहाय्य होईल."

एवढं बोलून प्रभा तेथून झटकन् निघून गेली.

अरे देवा! हें कांहीच्याबाहीच झालं, नाहीं? मी करायला गेलें एक अन् प्रकार झाला भलताच.

" वेणूताई," दिनकरपंत मला शान्तपणानं म्हणाले, " प्रभा रागावली बरं का! पण हरकत नाही, मी करीन तिची समजूत; पण तुम्ही तिच्यावर रागावूं नका. ती रागावते, पण आहे फारच प्रेमळ!" दिनकरपंत प्रभाच्या मागोमाग गेले.

ही झाली सकाळची गोष्ट. संध्याकाळी मी प्रभावतीला व दिनकरपंतांना फिरायला जातांना पाहिलं; तेव्हां मला जरा बरं वाटलं पुन्हा वाटलं आपण प्रभाची थोडीशी थट्टा करावी; म्हणून मी प्रभा परत आल्यावर तिच्याकडे गेलें.

" काय ग प्रभा," मी म्हणालें, " सकाळी तूं दिनकरपंतांचेवर शेवटी रागावलीस; अन् मग झालं वाटतं पुन्हा सख्य?"

" हो, झालं हो! वेणूताई, माझं मुळी त्याच्यावर आंधळं प्रेम आहे. त्यांचं माझं कांही बाबतींत पटलं नाही तरी आम्ही दोघं एकच आहोत; पण वेणू, तुला सांगतें मी, कीं आम्ही बोलत असतां तूं तिथं आलेली मला आवडत नाहीं."

प्रभाचं हें बोलणं ऐकून मी थक्कच झालें. प्रभाला माझा हेवा वाटायला लागला कीं काय? मी किती कुरूप अन् अशिक्षित, मग प्रभासारख्या सुशिक्षित मुलीला माझा हेवा कां बरं वाटावा?

त्या दिवशीं रात्रीं मला लवकर झोंप येईना. किती तरी वेळ मी रडत होते.

'वेणूचं व तुझं जर इतकं मतैक्य होत असेल तर तूं तिच्याशी लग्नच लावीनास.'

प्रभाचे हे शब्द सारखे माझ्या कानांत घुमत होते.

प्रभाचे हे शब्द लवकरच खरे व्हायचे आहेत, याची त्या वेळी कुणालाहि कल्पना नव्हती; पण आज......

* * *

महात्मा गांधींची असहकारितेची चळवळ सुरू झाली. महात्माजींची पुण्याई फार. भराभर शाळा व कॉलेजं ओस पडूं लागली. दिनकरपंतांनींहि

कॉलेज सोडलं. दिनकरपंतांनी आपल्या इंग्रजी तऱ्हेच्या कपड्यांना रजा दिली. व खादीचे कपडे वापरण्यास सुरुवात केली. दिनकरपंतांनी असला 'वेडेपणा' करूं नये म्हणून प्रभावतीनं पुष्कळ प्रयत्न केले. प्रभावतीच्या वडिलांनीहि त्यांना सांगून पाहिलं. काकासाहेबांनी तर त्यांना काहींहि पैसे न देण्याचा धाक घातला; पण रामाचं नाव. दिनकरपंताचा निश्चय मुळींच ढळला नाहीं.

दिनकरपंत गांवोगावी स्वदेशीवर व्याख्यानं द्यायला लागले. यामुळं प्रभावतीचं व त्याचं बिनसलं. रावबहादुराना त्यात कांहीएक वाटलं नाहीं. दिनकरपंतांचे रावबहादुराच्या घरांत असलेले फोटो काढून टाकले गेले त्यांचं नांवसुद्धा घरांत कोणी काढूं नये अशी सर्वांना ताकीद पण झाली.

"प्रभा, पण असं कसं झालं बाई? तुझं तर त्यांच्यावर फार प्रेम होतं!" मी एक दिवस प्रभाला म्हणाले प्रभा सुटीत घरी आली होती. "छे-ग! वेणू, माझं मुळी त्याच्यावर प्रेमच नव्हतं. तो म्हणत होता माझं तुझ्यावर प्रेम आहे म्हणून, अन् म्हणून मीहि तसंच म्हणत होतें झालं. पण जाऊं दे गडे तें; मला त्या विषयासंबंधानं बोलणं मुळींच आवडत नाहीं"

मला दिनकरपंताची जी माहिती मिळे ती प्रभाकडनं. आतां तिकडनं माहिती मिळायची बंद झाली. पुढं सहा महिन्यांनी प्रभाचं रा. रा. ओक नावाच्या एका तरुण आय्. सी. एस्. गृहस्थाशीं लग्न झालं. रा. ओक हे जवळजवळ कुरूपच होते. पण ते होते आय्. सी. एस्.!

"प्रभा, बापूसाहेब तुला फार आवडतात खरे; पण ते तर कुरूपच आहेत ग. मग कसं ग हें?" मी प्रभाला एक दिवस चेष्टेनं म्हणाले.

"होय हो वेणूताई! ते कसेहि असले तरी मला ते सुरूपच आहेत. कारण माझं त्यांच्यावर आधळं प्रेम आहे."

आमचा संवाद तेवढ्यावरच राहिला.

* * *

आतां मलाहि विसाव वर्ष लागलं होतं. बाबा सारखी स्थळं पाहत होते. मी कुरूप, अन् त्यांतून एवढी वाढलेली अन् अशिक्षित; तेव्हां माझ्याशी कोण लग्न करणार?

शेवटी एकदांचं माझं लग्न जमलं. आमच्या घरांत तयारी जारीनं सुरू झाली. आम्ही लग्नाला उठून जाणार होतों; कारण विलासपुरांतच लग्न करणं बाबांना पसंत नव्हतं. लग्न कुणाशीं ठरलं होतं हें मात्र बाबांनीं अगदीं गुप्त

ठेवलं होतं. आजपर्यंत माझं जुळलेलं लग्न सात-आठदा तरी मोडलं होतं; अन् म्हणून बाबांनीं स्थळाची बातमी अगदी गुप्त ठेवली होती. एकदां दोनदां मला वाटलं आपणच बाबाना निलाजरेपणानं विचारावं; पण पुन्हा म्हटलं जाऊं द्या, बाबांची काळजी दूर होते आहे ना? मग झालं! कुणाशीहि आपलं लग्न झालं तरी काय हरकत आहे? मनाला लागलेली हुरहुर वरील तऱ्हेचे विचार करून मी घालविण्याचा प्रयत्न करीत असे.

मुहूर्ताच्या आधल्या दिवशीच आम्ही सकाळच्या गाडीनं सोनगांवला जायला निघालो. आम्ही म्हणजे फक्त घरातलीच माणसं, अन बाहेरचे म्हणजे काय ते माझे मामा कस तरी करून मला एकदां उजवून टाकायची हाच साऱ्यांचा मुळी हेतु; अन् मलाहि तो समजला होता त्यामुळं माझ्या लग्नाच्या बाबतीत कुणालाच उल्हास वाटत नव्हता यात काही नवल नव्हतं.

सोनगांव होतं लहानसं खेडं; विश्वासपूरच्या स्टेशनापासून सरासरी पांच कोस आहे सोनगाव. रस्ता आपला साधाच, तरी पण आम्हाला न्यायला सोनगावच्या पाटलाकडनं २३ गाड्या आल्या होत्या.

हे लोक माझ्या भावी पतीकडून आलेले होते. त्यानी आमची व्यवस्था चांगली ठेवली होती. खेड्यांतील लोक ते– जितके भडभडे तितकेच प्रेमळ; अन् आमच्यासंबंधी त्यांना तर फारच आदर वाटत होता असं दिसलं. आपल्या वहिनीबाईना ( म्हणजे मला ) पाहून ते सारे अगदी खूप झाले; अन् माझी सारखी स्तुति करूं लागले.

"खरं बोलतुया मी दादासाब," लक्ष्मण पाटील म्हणाले, "आमच दिनकरपंत लई भाग्याच!"........

लक्ष्मण पाटील आणखी कांही तरी बोलणार पण बाबांनी त्यांना चूप बसाविलं. म्हातारा तरी बिचारा बाबांचेपुढं काय करणार; चूप बसला, झालं.

'आमच दिनकरपंत!' कोण हे दिनकरपंत? प्रभावतीचे दिनकरपंत तर नाहीत? माझ्यापुढं तो सारा इतिहास उभा राहिला. तेच जर दिनकरपंत असले........अहाहा! मी जर त्यांची झालें........माझ्यासारखी दुसरी कोण सुखी होईल? पण मी कुरूप अन् अशिक्षित; दिनकरपंत माझ्याशी काय म्हणून लग्न करतील? आपल्याला जें सुख मिळणं मुळी अशक्य त्याचा मेला विचार तरी कशाला करायचा?

आम्ही सोनगावला पोहोचलो व दुसऱ्या दिवशीं सकाळपासून लग्नाच्या

सोहळ्याला सुरवात झाली. वधूपक्षाकडची माणस अगदी थोडी, अन् त्यांतनं माझ्या आईला मुळीं कसला तो उल्हासच नव्हता; त्यामुळं आमच्याकडची मंडळी कांहा तरी करीत होती झाल वरपक्षाकडे मात्र माणसांची फार गर्दी, गांवांतली सारी मंडळी, पुरुष-बायका; अन् मुलं– सारी आपली तिकडे. जणुं-काय गांवच्या साऱ्या लोकांना आपल्या घरचंच लग्न वाटत होतं. दिनूमामाच लगीन म्हणून मुलं नाचत होती खेड्यातील बायका दिनुदादाच्या लग्नात काम करायला अगदी पदर खोचून तयार होत्या

खरं पाहिलं असता या वेळी मी चागली वीस-बावीस वर्षांची होतें. लग्नाच्या वेळी मला लाजायचं काहीएक कारण नव्हतं. तशातून प्रभा व दिनकरपंत एकमेकाना एकेरी नावानं हाक मारताना मी कित्येक वेळां ऐकलं होत. तरी लग्नाच्या वेळी माझी मान लाजेनं आपोआप खाली गेली माझे भावी पति मंडपांत आले, जे काय विधि व्हायचे ते झाले; अन् मग मधं अंतर्पाट धरून ब्राह्मणांनीं मंगलाष्टकं म्हणायला सुरुवात केली.

दोनच मिनिटं जास्त, अन् मी विवाहिता स्त्री होणार! मी हळूच वर पाहिलं; बाबाची मुद्रा मला अगदी उदास दिसली माझ्या पोटांत अगदीं धस्स झालं. आता खरं म्हटलं तर माझं चागलं लग्न होत होतं; मग तरी बाबांची काळजी दूर होणार होती ना?

शुभमंगलऽसावधान! सावधान! सा ऽ ऽ व धा ऽ ऽ ऽ न.

ताशाचा खडखडाट सुरू झाला. मी माझ्या हातातली माळ स्वारीच्या गळ्यांत घालण्याकरतां मान वर केली. अगबाई! माझ्यापुढं दिनकरपंतच उभे; अन् अरे देवा! दिनकरपंत माझे पति पूर्ण आंधळे, मग लग्न झाल्याच मी सुख मानू की दुःख मानूं? मला दिनकरपंत पति मिळाल्याबद्दल आनंद होत होता, व ते आंधळे झाले असल्याबद्दल मला दुःख वाटत होतं.

* * *

त्या रात्री मला एकान्त मिळतांच मी एकदां पोटभर रडून घेतलं. भावना फार प्रबल झाल्या, की मनुष्यानं एकदा पोटभर रडून घ्यावं. रडणं जर नसतं तर मनुष्य दुःखात झुरून फुटून मेला असता.

माझं लग्न जमल्यावरसुद्धां बाबा व आई इतकीं उदास कां असत याचं कारण माझ्या आतां लक्षांत आलं. माझं लग्न एका कुलीन पण आंधळ्या

गृहस्थाशीं ठरवावं लागलं. पैसे जवळ नसल्यामुळं आपल्याला आंधळ्याला मुलगी द्यावी लागली याबद्दल बाबांना व आईला फार वाईट वाटत होतं.

लग्नानंतर बाबा व घरची सर्व मंडळी विलासपूरला परत गेली; व मी माझ्या पतीबरोबर सोनगांवालाच राहिले.

पुढं स्वारीकडूनच मला सारी हकीकत कळली. स्वारीनं आय्. सी. एस्. च्या परीक्षेला जायचं नाकारल्यामुळं काकासाहेब संतापले व त्यांनी आपली सारी इस्टेट आपल्या एका नातेवाइकाला बक्षिस देऊन टाकली. स्वारी सोन-गांवला येऊन राहिली, व तेथं शेतकऱ्याच्या मुलाना लिहिणं-वाचणं शिकवायला सुरुवात केली स्वारीला शेतीचीहि चांगली माहिती असल्यामुळं स्वारीचा चांगला जम बसला पुढं सोनगांवांतच एका गरीब माणसाच्या झोंपडीला आग लागली होती, व झोंपडीत त्या माणसाचं तीन वर्षाचं मूल निजलेलं होतं. झोंपडी चोहोंकडनं पेटली असल्यामुळं मुलाला वांचवायला आत जाण्याची कुणाचीच हिम्मत होईना. सरतेशेवटी स्वारीनं धाडस केल, व लोक नको नको म्हणत असतां स्वारी आगींत शिरली. पुढं स्वारीनं तें मूल बाहेर आणलं, पण त्या आगीनं स्वारीचं सगळं अंग होरपळून निघालं काहीं दिवसांनी अंगावर-च्या जखमा बऱ्या झाल्या, पण डोळे मात्र अजिबात गेले. बर तर बरं हें संकट डोळ्यांवरच निभावलं; नाही तर प्राणांवरच बेतलं होतं म्हणायचं !

प्रभाशी लग्नाचं बिनसल्यापासून स्वारीनं लग्न करायचं नाहीं असं ठरविलं होतं. पण पुढं स्वारीचे डोळे गेले, तेव्हा कुणी तरी काळजी घेणाऱ्या माणसा-ची स्वारीला जरूर वाटायला लागली तसंच सोनगावच्या लोकांनीहि स्वारीला लग्नाचा फार आग्रह केला; तेव्हां स्वारी कशी बशी लग्नाला तयार झाली. पण लग्न करायचं कुणाशी ? हा स्वारीपुढं मोठा प्रश्न पडला. आंधळ्याला मुलगी देणार तरी कोण ?

"अशा वेळी मला तुझी आठवण झाली, अन् म्हणून मी तुझ्या वडिला-ना एक पत्र लिहविलं तुझ्या वडिलांनी तुला मला देण्याचं कबूलहि केलं. मी तुझ्या वडिलांना सांगितलं, मी आंधळा आहें, निष्कांचन आहे, हें समजून-सुद्धां जर ती माझ्याशी लग्न करायला तयार होईल तरच मी तिच्याशी लग्न करीन." स्वारी मला एक दिवस म्हणाली.

"मग बाबांनीं आपल्याला काय सांगितलं ?" मीं कुतूहलानं स्वारीला विचारलं.

" तुझे वडील मला म्हणाले, कीं मी वेणूला सर्व हकीकत सांगितली, व ती तुमच्याशी लग्न करायला तयार आहे. खरंच का तुझे वडील तुझ्याशीं या संबंधांत बोलले होते ?"

" मुळीच नाही." मी उत्तर दिलं. " येवढंच नव्हे तर माझं कुणाशी लग्न व्हायचं आहे हेंहि त्यांनीं मला कळूं दिलं नाही " माझी ब्याद त्यांना कशी तरी काढून टाकायची होती झालं. खरोखरीच मला या वेळी बाबांचा फार राग आला होता, आणि त्या रागाच्या भरांत मी काही तरी बोलून गेलं झालं.

" तर मग वेणू," स्वारी मला गंभीरपणानं म्हणाली, " मला खरं सांग, माझ्याशी लग्न झाल्यामुळं तुला आपण बुडलों असं वाटतं का ?"

" मुळीच नाहीं आपल्या पदरात पडल्याचा मला अभिमान वाटतो आहे. आपण देशसेवा करायचं ठरविलंत, लोकसेवा करीत असता आपले डोळे गेले, मला या आपल्या कर्तबगारीचा अभिमान वाटत आहे. आपली कामगिरी मी माझ्या शक्तीप्रमाणं पुढं बजावीन. आपला मला आशीर्वाद असावा." मी म्हणालें.

" तर मग तुझं माझ्यावर प्रेम आहे का ?" स्वारीनं विचारलं.

" असं का बरं मला विचारायचं ?" मी उत्तर दिलं, " माझं आपल्यावर निस्सीम प्रेम आहे, माझं आपल्यावर आंधळं प्रेम आहे !" मी पुढं बोलणार होतें पण माझं तोंड एकदम बंद झालं.

" पण आपलं माझ्यावर प्रेम आहे का ?" मी स्वारीला थट्टेनं विचारलं. "मी आहे कुरूप, अशिक्षित अन् गांवढळ; चालते का स्वारीला मी अशी बायको ?"

" हो-हो ! न चालायला काय झालं ?" स्वारीनंहि मला तितक्याच थट्टेनं उत्तर दिलं. " तुझ्यासारख्या डोळस मुलीचं जर माझ्यावर आंधळं प्रेम आहे, तर माझ्यासारख्या आंधळ्या माणसाचंहि तुझ्यावर आंधळंच प्रेम राहील यांत कसली शंका आहे !"

असे प्रेमसंवाद आमच्यांत नेहमी होतात. मी दुपारी खेड्यांतील मुलांना शिकवितें, रात्री स्वारीला पुस्तकं वाचून दाखवितें, त्यानंतर स्वारी आपले लेख मला सांगते व मी ते लिहून घेतें. स्वारीच्या लेखन-व्यवसायावर आम्हांला थोडेसे पैसे मिळतात. गांवांतील लोक सुशिक्षित नाहीत; पण त्यांचंहि बिचाऱ्यांचं आमच्यावर आंधळं प्रेम आहे. ते आम्हांला नेहमीं मदत करतात, व

स्वारीच्या सल्ल्याचा त्यांना नेहमीं फार उपयोग होतो. सोनगांवांत स्वारीच्याच खटपटींनं एक स्वदेशी मालाचं दुकान व परस्पर साहाय्यकारी मंडळ आणि एक वाचनालय स्थापन झालं आहे. आम्ही पैशानं गरीब आहोंत, पण आम्ही खरोखरी दुसऱ्याची आम्हांला दृष्ट लागेल इतकी सुखी आहोंत; व असंच आम्ही सुखी रहावं अशीच माझी अंबाबाईपाशीं प्रार्थना आहे.



# सुखस्वप्न : : १२

" काय प्रभाकर, चाललं आहे तरी काय ? " मी प्रभाकराच्या खोलीत शिरता शिरता विचारलें.

प्रभाकर हा माझा लहानपणापासूनचा मित्र. आमचं मराठी शिक्षण एकाच शाळेंत झाले. उमरावतीच्या हायस्कूलमध्यें आमचें इंग्रजी शिक्षणहि एकाच वेळीं झालें. आम्ही दोघेहि मॅट्रिकची परीक्षा बरोबरच पास झालों व दोघेहि पुण्यास एकाच कॉलेजात अभ्यास करीत होतों. प्रभाकर हा आमच्या कॉलेजात एक हुषार विद्यार्थी समजला जात असे. निरनिराळ्या मासिकातून प्रभाकर गोष्टी व कविता पाठवीत असे, व एका मासिकाच्या खास अंकांत प्रभाकराचा फोटोहि प्रसिद्ध झालेला होता. प्रभाकराची सांपत्तिक स्थिति फारशी चांगली नव्हती; तरी पण मासिकांत आपला फोटो पाठवावयाचा तो अत्यंत चांगला असला पाहिजे, म्हणून प्रभाकरानें आपला एक फोटो पुण्याच्या सर्वांत उत्तम फोटोग्राफरकडून काढवून घेतला होता. 'आपण एक प्रतिभावान् कवि व खंदे लेखक आहोंत. आपल्या लेखणीनें आपण सर्व महाराष्ट्राला मोहून सोडूं.' असे त्याला वाटत असे, व त्याचा हा अहंकारी स्वभाव जर सोडून दिला तर प्रभाकर एकंदरीत खरोखरच दिलदार मित्र होता. त्याचा स्वभाव मला फार आवडतहि असे.

" काय प्रभाकर ! काय चाललं आहे ? " मीं पुन्हा म्हटलें.

प्रभाकर टेबलाशी कांही तरी लिहीत बसला होता. त्यानें हलकेच मागें वळून पाहिले, " ये, ये ! वासुदेव," प्रभाकरानें आपले डोळ्यावर येणारे केस सावरीत म्हटलें, " ये कीं आंत. आज दुपारच्या वेळेलाच कुठं बाहेर निघाला आहेस तूं ? " प्रभाकरानें मला विचारले.

" वा महाराज ! " मी हंसत हंसत उत्तर दिले, " आता दुपार का आहे ही ? चांगले साडेपांच वाजून गेलें आहेत की ! वेळेकडे लक्ष तरी असतं का तुझं ? तुम्हां लेखकांचं एकंदर सर्वच विलक्षण असतं बुवा ! " मी म्हणालों.

" म्हणजे म्हणतोस तरी काय तूं वासू ! साडेपांच वाजले ? " प्रभाकर आपल्या चष्म्याची भिंगें पुशीत म्हणाला, " छेः बुवा ! वेळ कसा गेला तें मला

मुळी समजलेंसुद्धां नाही. दीड वाजतां मी लिहायला बसलों, अन् इतक्यांत चार तास झाले अं!"

"पण प्रभा, लिहीत तरी काय होतास तूं?" मी विचारले व प्रभाकराच्या टेबलावरील कागद पाहण्याकरितां पुढें सरकलों.

"अं ऽहं!" प्रभाकराने झट्कन् माझा हात मागे केला. "असा स्वयंपाक चाललेला असतांनाच पाहुण्यांनी घरांत येऊन जेवायचं नाही कांही!" प्रभाकर म्हणाला.

"अरे, पण पाहूं तर दे मला प्रभा, तूं काय लिहीत आहेस ते! तूं चागलं लिहितोस म्हणून मी तुझे येवढे आर्जव करतों. निदान तूं काय लिहीत होतास हें तरी मला सागशील की नाही?"

"हं तेवढं करीन मी." प्रभाकरानें आपल्या आरशीची भिंगें पुन्हा साफ करीत म्हटलें, "तुला तें 'विहार' मासिक माहीत आहे ना?"

"होय." मी म्हणालो.

"विहारच्या संपादकांनी मला त्यांच्या मासिकाकरिता एक कादंबरी लिहून देण्याची विनंति केली आहे. माझी कादंबरी या वर्षी ते आपल्या ग्राहकांना बक्षिस म्हणून देणार आहेत. 'मला थोडंबहुत लिहितां येतं, अन् तें माझं लिखाण लोकांना आवडतं' असं मला 'विहार'चे आपटे म्हणत होते."

"अस्सं! तर मग आमचे प्रभाकरपंत आतां कादंबरीकार म्हणून जगा-पुढं येणार म्हणायचे. बाकी प्रभा! तुझ्या गोष्टी गड्या, खरोखरी मला फार आवडतात." मी म्हणालो.

"खरं!" प्रभा म्हणाला. आपल्या आरशांतून तो माझ्याकडे पाहूं लागला. आनंदाची चमक मला त्याच्या डोळ्यांत दिसूं लागली. "खरं!" प्रभाकर मला पुन्हा म्हणाला.

"खरंच प्रभा!" मी बोलूं लागलो, "तूं खरोखर फारच उत्तम गोष्टी लिहितोस. तुझ्या 'मनोरंजनां'त प्रसिद्ध झालेल्या गोष्टी मी किती तरी वेळ वाचतों. प्रभाकर! खरंच तूं एक दिवस फारच मोठा लेखक होणार बुवा! पण मग आमच्यासारख्या गरिबाची आठवण तरी ठेवाल का?"

प्रभाकर छताकडे पाहत होता. कदाचित् पुढील आयुष्यांत येणाऱ्या मोठेपणाचा तो विचार करीत असावा. कांही वेळानें तो हंसला. "झालं का तुझं पुराण?" प्रभाकरानें मला विचारलें.

" माझं कसलं आहे पुराण ! " मी म्हणालो, " अन् माझं बोलणं तुला वाटायचंच पुराण ! आम्हांला कुठं येताहेत तुझ्यासारख्या प्रेमाच्या गोष्टी लिहायला ! मला तर परीक्षेच्या पेपरमधील प्रश्नांनासुद्धां उत्तरं लिहितां येत नाहींत. घरी वडिलांना पत्रं लिहितों. पण तीसुद्धां नुसती खुशालीची ! "

" अन् वहिनींना ? " प्रभाकराने आपले डोळे मिचकावीत मला विचारलें.

" अरे, तुझी वहिनी आहे बिचारी बालबोध वळणाची ! तिला स्वतःला एक कार्ड वाचायला एक तास लागतो अन् स्वतःला लिहायला दोन लागतात ! इतकं असूनहि...... "

" बरं बरं." प्रभा मध्येच म्हणाला, " समजली तुझी अक्कल ! विद्याभ्यासजड मनुष्य तूं. तुला रोमान्सची काय कल्पना आहे ? "

" मला नको आहे रोमान्सची कल्पना यायला ! पण मला साग, तूं सध्या कोणती कादंबरी लिहितो आहेस ? अन् आतां लिहिणं पुरे कर की ! "

" छे-छे ! असं कसं होईल वासू ! " प्रभाकर मला म्हणाला, " आज आहे सप्टेंबरची पंधरा तारीख 'विहार'चा खास अंक दिवाळीला निघायचा आहे, व त्याच वेळी जमल्यास माझी कादंबरीहि आपटे प्रसिद्ध करणार आहेत. आतां मला शक्य तेवढ्या लवकर माझी कादंबरी पुरी केली पाहिजे." टेबलावरील लिहिलेलीं पानें जुळवीत प्रभाकर म्हणाला.

" कां ! आताशा आपट्याच्यासंबंधानं फारसं प्रेम वाटायला लागलंय् ? का त्यांच्या कुसुमशी Love marriage करायचा बेत आहे वाटतं तुझा ? नाहीं तरी कुसुम आपल्याच वर्गात आहे; तेव्हां आपट्यांच्या 'विहार'च्या लेखकवर्गात सामील होऊन आपट्याचा जांवईच तर व्हायचं मनांत नाही तुझ्या ? बाकी कुसुमचा व तुझा जोडा कांही वाईट दिसायचा नाही प्रभा ! " मी हंसत हंसत म्हणालों.

" वाहवा !" प्रभाकर मध्येंच म्हणाला. आपले डोळ्यांवर आलेले केस त्यानें सावरले आणि समोरच्या आरशांत एकदां आपली नजर फेंकली. " तूं तर अगदीं कवीच झाला आहेस वासू ! पण खरं म्हटलं म्हणजे आपट्यांची कुसुम मला कां मिळूं नये ? सध्यां मला साधारण बरं लिहितां येतं, असं सारे लोक म्हणतात. मी जर पुढं उत्तम लेखक झालों, तर माझा चांगला नांवलौकिकहि होईल अन् मला पैसाहि चांगला मिळेल. इतकं झालं, की मला कुसुमला चैनींत नाहीं का ठेवतां यायचं ? "

" अहो शेखमहमद ! तुम्ही तर हवेंत किल्लेच बाधायला लागलांत की ! आपट्यांची कुसुम तुला पाहिजे असली, तर तुझ्याजवळ भरपूर पैसा असायला पाहिजे ! आपटे तुला फार तर लेखक म्हणून फार वाखाणतील; पण तुझ्याजवळ जर पैसा नसला, तर तुला ते आपला जावई काही खात्रीनं करून घेणार नाहींत ! अन् तुझ्यासारखा दरिद्री नवरा कुसुमलाहि पसंत पडणार नाही " मी म्हणालो.

" तर मग पहाच तूं मजा वासू ! " प्रभाकर मला म्हणाला, " कुसुम-सारखी बायको मिळावी ही माझी महत्त्वाकांक्षा आहे. कुसुम माझ्या गोष्टी वाचते व तिला त्या फार आवडतात, हें मला माहीत आहे. माझ्या लेखणीच्या जोरावर मी सपाटून पैसा मिळवीन असा मला आत्मविश्वास आहे; व कुसुम-सारख्या सुंदर व सुशिक्षित पत्नीच्या सहवासांत माझं आयुष्य मी सुखमय करीन, अशी मला उमेद आहे ! "

" बरं बाबा ! तुझं आयुष्य सुखांत जावं एवढीच माझ्यासारख्या तुझ्या मित्राची इच्छा आहे ! " मी म्हणालो.

" वासू ! " प्रभाकर म्हणाला, " वासू, मी काय सागतों तें लक्ष देऊन ऐक. आज इ. स. १९२१ सालच्या सप्टेंबरची पंधरा तारीख आहे. आजपासून पाच वर्षांनी हा प्रभाकर तुला महाराष्ट्रातील कसलेला लेखक म्हणून नावाजला गेला आहे; लक्ष्मीची त्याच्यावर पूर्ण कृपा आहे व आपट्यांच्या कुसुमच्या सहवासांत आनंदानं राहत आहे असं तुला दिसेल ! "

" तथास्तु ! " मी म्हणालों, " पण राहूं दे तुझ्या या साऱ्या गप्पा. आतां चल जाऊं जरा फिरायला ! " मी म्हटलें.

प्रभाकरानें आपले बंडखोर केस पुन्हा सावरले. केसांवरून ब्रश फिरविला व तो माझ्याबरोबर बाहेर यावयास तयार झाला.

टेबलावरील अस्ताव्यस्त पडलेल्या कागदांवर मी नजर फिरविली. प्रभाकराच्या कादंबरीचे नांव होते ' सुखस्वप्न.'

आम्ही घराबाहेर पडलों. मोटारच्या हॉर्नच्या आवाजामुळें आम्ही बाजूला झालों. आमच्याजवळून डॉक्टर परांजप्यांची मोटार गेली. कुसुम आपटे हीहि त्या मोटारींत होती.

* * *

पुढच्याच वर्षी मी पुणें सोडलं व घरची शेती बघूं लागलों. प्रभाकरानेंहि

पुणे सोडल्याचे मला कळलें. तो कुठे गेला तें मला समजलें नाही. त्याचा माझा पत्रव्यवहारहि पुढें बंदच पडला. शेतकरी माणसे आम्ही. आम्हांला इतकीं पत्रें लिहायला वेळ कुठून मिळणार ?

इ. स. १९२६ च्या सप्टेंबरांत मी खांडवा येथें आमच्या मेहुण्यांचे येथें गेलों होतो. रस्त्याने जातांना प्रभाकर मला अकस्मात् भेटला.

" कोण प्रभाकर ! " मी म्हणालो " कोण ? वासू दामले !" प्रभाकर उद्गारला.

मी प्रभाकराच्या घरी गेलों. प्रभाकर तेथील पोस्टांत पन्नास रुपयांवर कारकून होता. प्रभाकराची बायको आजारी असल्यामुळें प्रभाकरालाच स्वयंपाक हाताने करावा लागे. प्रभाकराला दोन मुले होतीं व तीहि अशक्त होती.

" वासुदेव," प्रभाकर मला म्हणाला, " मी जरा बाजारांतून जाऊन येतों. आज आहे सप्टेंबरची पंधरा वी तारीख. पगार यायला अजून पंधरा दिवसांचा अवधि आहे. अशी पैशांची अडचण पडते म्हणतोस ! "

मोटारचा 'पों पों' असा आवाज झाला. प्रभाकराच्या घरावरून एक सुंदरशी मोटार गेली.

" कोणाची रे ही मोटार, प्रभा ? " मी विचारलें.

" आमच्या येथील सिव्हिल सर्जन देशमुख यांची. मोटारमधील बाई ह्या मिसेस देशमुख ! " प्रभाकर आपल्या वाढलेल्या दाढीवर हात फिरवीत म्हणाला.

" मला तर ह्या बाई पाहिल्यासारख्या वाटतात प्रभा !" मीं म्हटलें.

" अरे, पुण्याच्या 'विहार' मासिकाचे संपादक आपटे तुला माहीत आहेत ना ? त्यांची मुलगी कुसुम नव्हती का आपल्याबरोबर कॉलेजांत ? तीच ही. बरं पण मला जाऊं दे जरा बाजारांत. मी आलोंच परत दहा-पंधरा मिनिटात."

प्रभाकर बाजारांत गेला. मी टेबलावर पडलेलें पुस्तक उचललें. तें फाटलेलेंच होतें. पुस्तकाचें नांव पाहिलें तें होतें ' सुखस्वप्न ! '

—फाटक्या सुखस्वप्नाची पानें मी चाळूं लागलो !



# शेवटीं पुरुषच ! : : १३

“ काय प्रभाकर ! अरे प्रभाकर—आहेत का घरांत प्रभाकरपंत—” मी दरवाजांतूनच मोठ्यानें ओरडलों.

“ होय-होय. आहेच मी घरी, बापू.” प्रभाकराने माडीवरूनच मला ‘ओ’ दिली. मीं लगेच प्रभाकराकडे जाण्याकरितां जिन्याकडे धूम ठोकली.

प्रभाकराची व माझी अगदी बाळपणापासूनची मैत्री. ती झाली कशी हें मला आतां मुळीच आठवत नाही. अन् ती वाढली कशी याचे सर्व लोकांना—मला सुद्धां— आश्चर्यच वाटतें. प्रभाकर गर्भश्रीमंत, तर मी साऱ्या मुलखाचा दरिद्री ! प्रभाकराच्या वडिलांनी मला जर अडल्या वेळीं मदत केली नसती तर माझ्याच्यानें झाला इतका विद्याभ्यास झालाच नसता. सुरवातीला मी प्रभाकराच्या बराच पुढें होतों. पण मी बी. ए.च्या वर्गात दोन-तीन वर्षे मुक्काम केला व त्या वेळीं प्रभाकर माझ्या पुढे गेला. बी. ए. होतांच मी सरकारी शाळाखात्यांत शिक्षकाची नोकरी धरली. प्रभाकर पुढे एम्. ए., एल्एल्. बी. झाला व स्वतःच्याच गांवी वकिली करूं लागला. अशा रीतीनें मी व प्रभाकर पुन्हा एकाच गांवी राहूं लागलो.

होय, एक गोष्ट सांगावयाचीच राहिली. एम्. ए.च्या वर्गात असतांनाच प्रभाकराची व त्या वेळच्या कुमारी सुशीलाबाई देशमुख यांची ओळख झाली. प्रभाकर हा एक हुषार विद्यार्थी व उत्कृष्ट खेळाडू म्हणून त्याची कॉलेजमध्यें ख्याति होतीच आणि त्यामुळें कॉलेजमधील विद्यार्थिवर्गांतहि तो फारच आवडता असे. कुमारी देशमुख ह्या त्या वेळीं बी. ए.च्या वर्गात होत्या. कॉलेजमधील वक्तृत्वोत्तेजक सभेच्या कु. सुशीलाबाई ह्या चिटणीस होत्या. मुलांच्या सभेंत वाटेल त्या विषयावर सडेतोडपणानें बोलायला त्या भीत नसत. सुशीलाबाईंची वाणी गोड असे; भाषा जोरदार असे. प्रतिपक्षावर त्या कधींहि तोंडसुख घेत नसत, पण आपल्या विचारसरणीनें त्या प्रतिपक्षाला अगदीं निरुत्तर करीत. कु. सुशीलाबाई जितक्या हुशार होत्या, तितक्याच सुंदर होत्या. शिवाय, त्यांचे वडिलहि पूर्वीच्या पिढींतील सुधारकांपैकी एक होते. त्यांना आपल्या मुलीचें फार कौतुक वाटत असे. सुशीलाबाई बी. ए. होतांच वक्तृत्वकलेचा अभ्यास करण्याकरितां

त्यांना विलायतेस पाठवावयाचें त्यांच्या वडिलांनीं ठरविलेंहि होतें. असे बेत केले होते पण परमेश्वराची मात्र तशी इच्छा नव्हती; त्यामुळें सुशीलाबाई विलायतेस कांहीं जाऊं शकल्या नाहींत. मध्यंतरींच प्रभाकराची व सुशीलाबाईची ओळख झाली; नंतर पुढें त्यांचा परिचय दाट होत गेला व शेवटीं त्याच्या मैत्रीचें पर्यवसान विवाहबद्ध होण्यांत झालें. प्रभाकराच्या वडिलाना हें लग्न फारसें पसंत पडलें नाहीं; पण त्यानी त्यांत फारसा मोडताहि घातला नाही. प्रभाकरानें आपली इच्छा वडिलांच्याजवळ जेव्हां सांगितली त्या वेळीं ते प्रभाकराला इतकें मात्र म्हणाले, की 'तूं या लग्नाच्या भानगडीत पडूं नयेस; कारण तें तुला सुखकर होणार नाही.' कोणत्याहि संकटाला न जुमानतां प्रभाकरानें सुशीलाबाईशी लग्न केले व कु. सुशीलाबाई देशमुख ह्या सौ. प्रभावतीबाई देशपांडे झाल्या.

प्रभाकराचें लग्न होऊन थोडे दिवस झाले होते. प्रभाकरानें आपली वकिली नुकतीच सुरू केलेली असल्यामुळें त्याला वेळहि बराच मिळत असे. पूर्वी प्रभाकर क्लबाचा फारच शौकी असे; पण आतां तो पुरा घरकोंबडा झाला होता. एकदोन दिवसांआड, संध्याकाळी शाळा सुटल्यावर मी प्रभाकराकडे जात असें व त्या वेळीं बहुतकरून प्रभाकर व वहिनी माडीवरील गच्चीवर गप्पा मारीत बसलेलीं असत. आजहि मी असाच त्यांचेकडे गेलों होतों.

जिना चढून मी वर गेलो. वहिनी टेबलाशीं कांहीं तरी लिहीत बसल्या होत्या व प्रभाकर त्यांच्या खुर्चीच्या पाठीवर हात ठेवून उभा होता. माझ्या पावलांचा आवाज होताच दोघांनीं माझ्याकडे मागें वळून पाहिलें. प्रभाकर हंसला; वहिनी लाजल्या.

"खरंच प्रभाकर," मी म्हणालों, "आज अम्मांना (प्रभाकराच्या आईला) तुम्हां दोघांची दृष्ट काढायला सांगितलं पाहिजे. नाही तर एखादे वेळेला तुमच्या सुखाला माझीच दृष्ट लागायची!"

"पुरे-पुरे तुझं ब्रह्मज्ञान!" प्रभाकर मध्येंच म्हणाला, "हा बापू म्हणजे अगदीं Il Penseroso आहे. प्रभा, मोठा Pessimist बुवा हा अगदीं. अन् तूं ध्यानांत ठेव बापू, की आमचं सुख हें नुसत्या दृष्टीनं कोमेजण्याइतकं नाजुक नाहीं. अरे बाबा, प्रभा मला मिळावी म्हणून मला किती प्रयत्न करावे लागले व अप्पादेखील त्या वेळीं थोडेसे माझ्यावर नाखूष झाले. इतक्या आटापिटीनं

प्राप्त करून घेतलेलं हें सुख तुझ्या काल्पनिक दृष्टीनं रे कसं कमी होईल ? मूर्खच आहेस झालं !"

"बाकी इतकं खरं बापूराव, की आमच्या सुखाला एखादे वेळी कुणाची तरी दृष्टच लागायची ! अप्पासाहेबांना आमचं लग्न पहिल्याप्रथम पसंत नव्हतं खरं, पण आतां ते अन् अम्मा मला अगदीं जीवप्राण करतात. मला इतकीहि तकलीफ होऊं नये म्हणून ते किती काळजी वाहतात म्हणून सागूं ! अन् आतांशा अप्पासाहेब तर मी म्हणेन तें पुस्तक आणून द्यायला केव्हांहि तयार असतात. आताशा आम्ही दर महिन्याला जवळजवळ शंभर रुपयांची पुस्तकं घेतों."

"खरंच, नशीबवान आहांत बुवा तुम्ही दोघंहि." मी अगदी सहज म्हणालों, "पण वहिनी, आज मुद्दाम कसची तयारी करीत आहात तुम्ही ?" मी विचारलें.

"अरे, कसची म्हणून काय विचारतोस बापू ?" प्रभाकर मध्येंच म्हणाला, "परवांचे दिवशी येथील सार्वजनिक गणपतीपुढं सौ. प्रभावतीबाई देशपांडे यांचं 'सद्यःस्थिति' या विषयावर व्याख्यान होणार आहे. आहे बुवा ! मी एम्. ए., एल्एल्. बी. झालो आहे खरा, पण आम्हाला कांहीं अजून कोणी म्हणत नाही, की तुम्ही व्याख्यान द्या. आणि या आमच्या विदुषी ! नुसत्या बी. ए.च आहेत तरी त्यांनीं व्याख्यान द्याव म्हणून कोण निमंत्रणं त्यांना येत आहेत. आहे बुवा ! चैन आहे एका माणसाची !"

मला या प्रेमळ नवराबायकोचें किती तरी कौतुक वाटलें; पण लगेच मनांत एक चमत्कारिक विचार आला. हें त्यांचें प्रेम असेंच टिकेल का ?

इतक्यांत मोतीरामनें तीन पेले कोको आणला, व त्या गडबडीत मी माझ्या मनांतील दुष्ट विचार लगेच विसरूनहि गेलों.

गणेश-उत्सवांतील सौ. वहिनींच्या व्याख्यानाला मी गेलों होतों. व्याख्यानाला खूप गर्दी जमली होती. व्याख्यानाला कधीहि न जाणारे कित्येक गृहस्थहि व्याख्यानाला आले होते. आणि खरोखरच सौ. वहिनींचें व्याख्यान फारच उत्तम झाले. आपले विचार त्या अत्यंत कळकळीनें व मुद्देसूदपणानें सभेपुढं मांडीत होत्या. व्याख्यानानंतर अध्यक्षांनीं अगदीं मोकळ्या मनानें व्याख्यात्रींची स्तुति केली. इतकं चागले व्याख्यान बरेच दिवसांत ऐकायाला मिळालें नव्हतें, असें म्हणत सर्व लोक आपआपल्या घरी गेले.

दुसऱ्या दिवशीं मी प्रभाकराकडे गेलों. प्रभाकर व वहिनी यांच्या नेहमींप्रमाणें गप्पाच चालल्या होत्या.

“या बापूराव, या. तुमच्या वहिनी आतां आपल्या प्रान्ताच्या ॲनी बिझंटबाई होणार बुवा. पाहिलंस का बापू, आपल्या खास अंकाकरतां हिनं कांहीं तरी लिहावं म्हणून दोनतीन मासिकांच्या संपादकांची हिला पत्रं आलेलीं आहेत. ‘गृहलक्ष्मी’नं तर आमच्या गृहलक्ष्मीचा फोटोहि मागितला आहे. आतां हिला ‘प्रभाकरपंत देशपांडे यांची बायको’ असं लोक ओळखण्याऐवजी, मलाच ‘प्रभावतीबाई देशपांडे’ यांचा नवरा असं लोक ओळखायला लागणार. आम्ही सर्व दिवस कोर्टांत जातो, व ही सारा दिवस वाचीत बसते. आम्हाला धड स्मॉल कॉज कोर्टातल्यासुद्धा भानगडीचे मुकद्मे मिळत नाहींत व हिला मात्र राष्ट्रसंघाच्या आर्थिक परिस्थितीसंबंधानं अभ्यास करायला वेळ मिळतो. एकेकाचं नशिब असं असतं.” प्रभाकर म्हणाला.

मी मनात थोडासा चरकलों. बाहेर एक घुवड ओरडत होतें!

वहिनींना मिळणाऱ्या मानावद्दल मी वहिनीचें अभिनंदन केले.

“पण मानाला कारण कोण, बापूराव?” वहिनी म्हणाल्या.

“कोण बुवा?” मीं मुद्दाम विचारलें.

“हा वेडा मुलगा!” वहिनी प्रभाकराच्या केसांशीं खेळत म्हणाल्या.

‘परमेशा, या जोडप्याला निरंतर सुखांत ठेव!’ मीं परमेश्वराची अनन्यभावानें प्रार्थना केली.

असेच आणखी कांही दिवस लोटले. सौ. वहिनीचे लेख बहुतेक सर्व मराठी मासिकांतून प्रसिद्ध होत; आणि त्यांचा Indian Womanhood हा लेख विलायतेंतील एका स्त्रियांच्या मासिकांतहि प्रसिद्ध झाला होता. डिसेंबर महिन्यांत आमच्या जिल्ह्यांतील स्त्रियांची परिषद भरली होती व तिचें अध्यक्षस्थानहि सौ. वहिनींनाच मिळालें होते. वहिनीच्या त्या सभेंतील भाषणाची सर्व लोकांनी मुक्तकंठानें स्तुति केली होती.

अप्पासाहेबांचेकडे लखनौ विश्वविद्यालयाचे प्रोफेसर रॉय आले होते. प्रोफेसर रॉय हे लंडन विश्वविद्यालयाचे अर्थशास्त्र व राजकारणशास्त्र या विषयाचे Ph. D. होते. प्रोफेसरसाहेबांचे आमच्या गांवीं एक व्याख्यानहि झाले. प्रोफेसर रॉय यांना अप्पासाहेबाचे घरी जी एक पार्टी झाली तिला मी हजर

होतों. 'अल्पसंख्याक लोकांची भवितव्यता' या विषयावर प्रोफेसरांचें व प्रभाकर आणि सौ. वहिनी यांचें पुष्कळ भाषण झालें.

" खरेंच सांगतों मी आपल्याला, रावबहादुर देशपांडे, आपल्या सूनबाईंचं वाचन बरंच आहे; अन् विचारसरणीहि अगदीं सरळ आहे. She is a jewel in your family." रॉय म्हणाले.

अप्पासाहेबांनी अत्यंत कौतुकाने सौ. वहिनीच्याकडे पाहिलें.

" माझी सून आहेच तशी गुणांची ! " अम्मा म्हणाल्या.

प्रभाकर खिडकीवाटे बाहेर पाहत होता; " काय या घुवडांचा भलत्याच वेळीं ओरडण्याचा त्रास आहे हा ! " तो म्हणाला.

वहिनीनीं एक सुस्कारा सोडला.

असाच एक दिवस मी प्रभाकराकडे गेलों होतो. आतांशा पुष्कळ वेळां प्रभाकर एकटाच बसलेला माझ्या दृष्टीला पडे.

" काय प्रभा," मीं विचारलें, " एकटाच बसला आहेस ? वहिनी काय करीत आहेत ? "

" बसली असेल एखादा लेख लिहीत. नाहीं तर कोणी तरी प्रोफेसर रॉय-सारखे एखादे विद्वान आले असतील भेटीला. आतांशा तिला माझ्याशीं बोलायला वेळ मिळतो आहे कुठं ? "

" काय म्हणालास प्रभा ? " वहिनी हॉलमध्यें येतां येतां म्हणाल्या, " हे तुझेच का विचार ? तुझे असे विचार असतील असं मला वाटलं नव्हतं."

" आणि तूंहि अशी वागशील असंहि मला वाटत नव्हतं." प्रभाकर चिडून म्हणाला.

" कशी रे वागलें मी ? " वहिनी म्हणाल्या. त्यांच्या डोळ्यांत अश्रु उभे राहिले होते. " तुला बरं वाटावं म्हणून मी लेख लिहूं लागलें, व व्याख्यानं देऊं लागलें. तुला बरं वाटावं म्हणून मी कांहीं काहीं विषयांचा मुद्दाम अभ्यास केला. तुला बरं वाटावं म्हणून मी......"

" प्रोफेसर रॉयसारख्या मनुष्याबरोबर वादविवाद केला." प्रभाकरानें वहिनींचें वाक्य पुरें केले.

" हं—पुरे कर." वहिनी संतापानें म्हणाल्या, " तूं काय बोलतो आहेस याची तुला कल्पना तरी आहे का ? प्रोफेसर रॉय हे अप्पासाहेबांचे पाहुणे होते. मला ते अप्पासाहेबांच्याइतकेच पूज्य होते. तुझ्या डोक्यात मात्र इतकी

घाण असेल अशी मला कल्पनाहि नव्हती. पुरुष हे शेवटीं पुरुषच!" वहिनी संतापानें आंत गेल्या.

मी आश्चर्यमूढ झालो. गोष्टी या थराला गेल्या असतील अशी माझी कल्पनाहि नव्हती.

वहिनींनीं आपल्या लेखांचें पुडकें बाहेर आणलें, शान्तपणानें एक एक लेख त्या फाडूं लागल्या. सर्व कागद फाडल्यावर त्यांनीं ते कागद वेस्टपेपर बास्केटमध्यें टाकून त्यांना काडी लावली. नंतर त्यांनी लायब्ररींतील कपाटांच्या किल्ल्या प्रभाकरापुढें टाकल्या.

"प्रभा," वहिनी म्हणाल्या, "माझं तुझ्यावर किती प्रेम आहे याची तुला कल्पनाहि नाहीं. तुझ्याकरतां मी लेखिका बनलें व आतां तुझ्याचकरतां मी लिहिणं सोडून देत आहे; तुझं हें वागणं गैर आहे असं माझं ठाम मत आहे. पण आपल्या घरांत शान्तता व सुख नान्दावं व मुख्यतः तूं सुखी व्हावंस म्हणून मला आतां या नवीन परिस्थितीचा अंगिकार केला पाहिजे!"

प्रभाकर शून्य दृष्टीनें बाहेर पाहत होता.

सौ. वहिनी टेबलावर डोकें ठेवून अश्रुमोचन करीत होत्या.

पतिपत्नींच्या या अशा भांडणाच्या वेळीं आपण तेथें नसावें म्हणून मी तेथून उठून हळूच बाहेर आलो.

* * *

असेच आणखी कांही दिवस गेले. विदर्भ साहित्य सम्मेलनाला सौ. वहिनींना आग्रहाचें बोलावणे आलें. सूनबाईनीं सम्मेलनाला जावें म्हणून अप्पासाहेबांनीं व अम्मानीसुद्धां सौ. वहिनींना पुष्कळ सांगितलें; पण सौ वहिनींनीं एकदां नाहीं म्हटलें तें म्हटलें. प्रभाकरानेंहि त्यांना तसा आग्रह केला नाहीं.

मनोरंजनाच्या खास अंकांतील लेखिकांत सौ० प्रभावतीबाई देशपांडे यांचें नांव यंदा चमकलें नाहीं.

त्यानंतर लवकरच माझी बदली परगांवीं झाली. देशपांडे मंडळींचा मीं जड अंतःकरणानें निरोप घेतला.

मी जातांना ती. अप्पासाहेब व अम्मा यांना विचारावयाला गेलों. "बापू, तूं पाहिलंसच आतांशा आमचं घर कसं झालं आहे तें. सूनबाई इतकी सद्गुणी, पण आमच्या प्रभाचं तिच्याशीं पटलं नाहीं."

"पण असं कसं झालं, अप्पासाहेब?" मीं विचारलें.

"अरे बाबा, प्रभाकर किती झाला तरी पुरुषच. शेवटीं पुरुषच! तो आपल्या जातीवर गेला." अम्मा म्हणाल्या. अप्पासाहेब खिन्नपणानें हंसले!

* * *

मी माझ्या नोकरीच्या गांवीं रुजू झालों. पण मधून मधून सौ. प्रभावती-वहिनींचे ते शब्द माझ्या कानांत कोणी तरी गुणगुणत आहे, असें मला वाटतें. 'शेवटीं पुरुषच!' होय—शेवटीं पुरुषच!



# भूगांवचा संभू— : : १४

चंपीची गडबड ऐकून मी माझ्या खोलीबाहेर आलों. पाहतां तों संभू आपल्या झोपडीच्या बाहेर उभा होता अन् चंपी त्याला अगदी घट्ट बिलगली होती. आणखीहि मला एक आश्चर्य दिसले. चंपीला कुरवाळीत असतां संभूच्या डोळ्यांतून अश्रु गळत होते. संभू आणि रडणें! छे छे! या दोन्हीहि गोष्टी एके ठिकाणी येणें अशक्यच. संभू भार्गवराव सावकार यांचेकडे नोकर होता. आपल्या कुळांकडची थकलेली बाकी आणि भारी व्याजानें दिलेल्या रकमा गोळा करण्याकरितां भार्गवरावांनीं जे कांहीं पुरभय्ये अन् असेच धिप्पाड जवान नोकरीला ठेवले होते त्यांपैकी संभू हा एक प्रख्यात गुंड होता. आमच्या खेड्यांतील लोक संभूला थरथर घाबरत असत. तें त्याचें पिळदार शरीर, लाल डोळे व जगाकडे तुच्छतापूर्वक पाहणारी ती त्याची बेदरकार दृष्टि अजूनहि माझ्या डोळ्यांपुढें उभी राहते. एकदां कृष्णा कुणब्याच्या घरावर सावकाराच्या डिक्रीची अम्मलबजावणी करण्याकरितां संभू गेला होता. घरांतली सर्व चीजवस्त बाहेर काढतांना संभू कसा वाघासारखा गर्जत होता. कृष्णाची म्हातारी आजी एका जुनाटशा खाटेवर निजली होती. खाट जप्त करण्याकरितां संभूने ती ओढली व म्हातारीला जमिनीवर लोटून दिले. म्हातारी बिचारी विव्हळायला लागली. कृष्णाची बायको व मुलगी मोठ्याने रडूं लागली व कृष्णाहि रडूं लागला; तेव्हां संतापाने संभूनें कृष्णाच्या थोबाडीत मारली व त्याला नाही नाहीं त्या शिव्या दिल्या. त्या दिवशीची संभूची मुद्रा अजून माझ्या डोळ्यांपुढें उभी आहे. इतका निष्ठुर हृदयाचा संभू आज रडत आहे हें पाहून मला फारच आश्चर्य वाटलें.

संभू हा सावकारांचा अगदी विश्वासु नोकर. संभूच्या धाकदपटशाला सावकारांचीं सारीं कुळें कशीं थरकांप भीत. सावकारांची भलीं-वाईट वाटेल तीं कामें संभूनें करावयाची. विश्राम तेली व सावकार यांचें एकदां भांडण झालें. प्रश्न असा होता, कीं चांग्या महाराचें शेत सावकारांनीं घ्यावयाचें कीं विश्रामनें घ्यावयाचें. दोघांच्याहिकडे तेंच शेत गहाण होतें व दोघांनाहि शेताचा ताबा पाहिजे होता. सावकाराचा भरंवसा कोर्टाच्या डिक्रीपेक्षा संभूच्या लाठीवर जास्त. या भानगडींत संभू व विश्राम यांची मोठी मारामारी झाली व संभूनें

विश्रामला खूप ठोकले. पुढें रीतीप्रमाणें संभू व संभूचे चारपाच हस्तक यांवेवर खटला भरला गेला व त्या मुकदम्यांत सावकाराचीहि साक्ष झाली. दंगा करून दुखापती केल्याबद्दल संभूला व त्याचे मित्रांना दोन-दोन वर्षांच्या शिक्षा झाल्या.

संभू तुरुंगांत गेला याचेबद्दल आमच्या खेड्यांतील लोकांना कांही वाटले नाहीं. 'बरें झालें, त्याला त्याच्या पापाचें फळ मिळालें !' असेंच गांवांतील लोक म्हणत. संभू तुरुंगांत गेल्यावर एकदोन महिन्यांनीच सावकारांनी संभूच्या बायकोला स्वतःचे घर सोडावयाला लावलें. संभू सावकाराच्या एका घरांत राहत असे; पण आतां संभू गेला होता तुरुंगात. तेव्हां त्याच्या बायकोला त्याच घरात राहूं देण्याची सावकारांना जरूर वाटली नाहीं. शिवाय त्या घराचें महिना दीड रु. भाडें सावकारांनी का बुडवायचे? साराश, संभूच्या बायकोला सावकारांनी घर सोडावयाला लावले. नंतर त्या बिचाऱ्या बाईला आमच्या काकांनी आमच्या घरासमोरील गोठ्याजवळची एक खोली राहावयाला दिली. त्या खोलींत संभूची बायको रुक्मा अन् त्याची मुलगी चंपी राहत असे. रुक्मा मोलमजुरी करून आपली व आपल्या मुलीची उपजीविका करीत असे.

माझी मॅट्रिकची परीक्षा होऊन मी कॉलेजमध्यें गेलों होतो. दिवाळीच्या सुटीत मी नेहमींप्रमाणे काकांच्या घरीं आलों होतों.

संभू आपल्या मुलीला कुरवाळीत होता. इतका निर्दय संभू अश्रु गाळीत होता. पहिल्याने माझा माझ्या डोळ्यांवर विश्वासच बसेना. 'होय,' हा संभूच ! ' त्याची शिक्षेची मुदत संपून तो परत आला होता.

"संभू—"

"काय भाऊसाहेब ?"

संभूनें आपल्या मुलीला खाली ठेवलें आणि चटकन येऊन माझ्या पायां पडला.

"सभू, केव्हां आलास रे बाबा तूं?" मी विचारलें.

"मी होय ? आताच आलों कीं." संभू म्हणाला, "कालच मी तुरुंगांतून सुटलों अन् तसाच सरळ गांवाकडे आलों बघा. पहिल्यानं धन्याच्या घरीं गेलों, त्याच्या पायां पडलों अन् मग माझ्या जुन्या घराकडे गेलों. तिथं कळलं, की माझी लक्ष्मी आपल्या आवारांत राहायला आली म्हणून, तसाच मी इकडे आलों. बरं, सगळीं खुशाल?" संभूनें मला विचारलें.

" होय! आम्ही सगळीं खुशाल आहोंत. पण संभू, यापुढ आतां मारामारी नाहीं ना करणार तूं ? " मी त्याला विचारले.

संभू खिन्नपणे हंसला.

इतक्यांत संभूची लक्ष्मी घरीं आली व संभू आपल्या घराकडे गेला.

* * *

दुसऱ्या दिवशीं संभू आपल्या अंगणांत बसला होता. त्याची चंपी जवळच खेळत होती. संभू अगदीं उदासपणानें बसला होता.

" काय रे संभू, " मी म्हटलें, " असा उदास काय बसला आहेस? "

संभू नुसता खिन्नपणानें हंसला. " काय झालं रे संभू तुला? " मी संभूला पुनः विचारलें.

" काय सांगूं भाऊसाहेब, मी सावकारांच्या घरी नोकरी मागायला गेलों होतों. यांच्याचकरतां मी मारामारी केली अन् तुरुंगात गेलों—

मी तुरुंगांत गेलों अन् इकडे सावकारांनी माझ्या लक्ष्मीला घर सोडायला लावलं. आज सावकार मला म्हणतात कसे, कीं 'तुझ्यासारख्या गुंडाला आम्हांला नोकरीला नाही ठेवतां येत. कारण आम्ही आहोंत इज्जतदार लोक. असे तुरुंगांतून सुटलेले गुन्हेगार जर आम्ही नोकरीला ठेवूं लागलों तर पोलिसांचा आम्हाला विनाकारणच त्रास होईल!'

आता तुम्हीच सांगा भाऊसाहेब, मीं गरिबानं आतां काय बरं करावं ? माझ्याजवळ शेतीभाती कांहीं नाहीं. तेव्हां माझं, माझ्या लक्ष्मीचं अन् माझ्या चंपीचं पोट मला मजुरी करूनच भरलं पाहिजे. मी मारामारी केली, पण ती कां केली भाऊसाहेब? अहो, माझा त्यांत स्वतःचा काय फायदा होता? पण मालकाकरितां हिम्मत केली अन् आतां मालकच मला दूर लोटतात! "

" पण संभू, आतां तरी तूं चांगला वागशील ना? "

" भाऊसाहेब, मी मनानं नीच नाही. माझी चंपी रडली की मला रडूं येतं. तसंच दुसऱ्याचीं मुलं रडलीं, की त्यांना वाईट वाटत असेल हें मला समजतं. पण मला तुम्ही लोकांनी चांगल्या रीतीनं वागूं दिलं पाहिजे ना? "

" म्हणजे ? " मी संभूला विचारले.

" म्हणजे काय भाऊसाहेब," संभू म्हणाला, " माझी इमानानं राहायची इच्छा असली तरी लोकांनीं मला तसं राहूं दिलं पाहिजे ना? पण मी एकदां गुन्हा केला म्हणून जर तुम्ही मला दूर लोटूं लागलांत अन् मला अन्नाला

मोताद केलंत तर मग माझ्यासारख्या गुन्हेगाराला पुनः गुन्हा करण्याशिवाय कोणता मार्ग मोकळा राहील ? भाऊसाहेब, तुम्हीच सांगा."

मी स्वस्थ बसलों. संभूचें बोलणें होतें साधेच. त्यांत पाचपेंच कांहींहि नव्हते. मला त्याचें बोलणे पटलें. 'खरंच, मनुष्यानें आयुष्यांत एकदां गुन्हा केला म्हणजे जन्मभर तो मनुष्य वाईटच समजला गेला पाहिजे काय ?' मी मनांत म्हणालों.

संभू तेथून गेला. दुपारी जेवण्याचे वेळीं मी संभूची हकीकत काकांना सांगितली.

" संभूची हकीकत खरोखरीच अगदीं हृदयद्रावक आहे." काका म्हणाले, " पण तूं दुसऱ्या तऱ्हेनं म्हणजे लोकांच्या बाजूनं या गोष्टीचा विचार कर. संभूनं एक वेळ गुन्हा केला, पुनः तोच गुन्हा संभू करणार नाही कशावरून ? आणि नोकरानं जर गुन्हा केला तर त्याची थोडीबहुत तरी झळ मालकाला नाही का लागणार ? आतां दुसरे लोक नोकर म्हणून मिळत असतांना उघड्या डोळ्यांनी मुद्दाम गुन्हेगार मनुष्य नोकर ठेवायला कोण धजेल, तूंच सांग भाऊ ?" काकांनीं आपलें भाषण पुरें केले.

" तुमचंहि म्हणणं खरं आहे काका !" मी म्हणालों, " पण अशा परिस्थितींत गुन्हेगारांनीं आयुष्यक्रम सुधारायचा तरी कसा ?"

" त्यालाहि उपाय आहेत, पण ते एकट्यादुकट्यांनीं अंमलांत आणण्यापेक्षा समाजानं अंमलांत आणले पाहिजेत. तुरुंगातून सुटून आलेल्या कैद्यांच्या साहाय्याकरतां कांही संस्था—"

" पुरे—पुरे ! भात निवून चालला. अगोदर जेवायचं अन् मग सुटून आलेल्या कैद्यांची व्यवस्था करायची." काकू मध्येंच बोलल्या व आमचं बोलणें तेवढेंच राहिलें.

दररोज मी पाहत होतों. संभू नोकरी शोधण्याकरितां म्हणून जाई व संध्याकाळीं निराश होऊन परत येई.

एके दिवशीं दुपारीं अर्थशास्त्रावरील एक पुस्तक मी वाचीत पडलों होतों, इतक्यांत संभू रागाने आपल्या लक्ष्मीशीं कांहीं तरी बोलत आहे असें मीं ऐकलें.

" संभू—" मी हाक मारली. पहिल्यानें संभूनें मला ओच दिली नाहीं. नंतर तो कांहीं वेळानें माझ्याकडे आला व नुसता उभा राहिला.

" काय रे संभू ?" मी म्हणालों, " रुक्मावर कां रागावतो आहेस ?"

" काय सांगूं भाऊसाहेब," संभू म्हणाला, " आमच्या चंपीनं आज भातक्या-करतां हट्ट घेतला अन् माझ्या लक्ष्मीजवळ नव्हता पैसा. तिनं चंपीला पुष्कळ समजाविलं, पण ती कांहीं ऐकेना. तेव्हां तिनं तिला रागानं मारलं. भाऊ-साहेब, चंपी आमची एकुलती एक मुलगी. आम्हांला तिचा हट्ट पुरवितां येऊं नये अन् तिच्या आईनं आमच्याच अपराधाबद्दल तिला मारावं याचा मला राग आला अन् मी माझ्या लक्ष्मीला बोललों. भाऊसाहेब ! आज माझी लक्ष्मी मिळविते आहे अन् माझ्या अन् चंपीच्या पोटाला घालते आहे. मी जर गुन्हे-गार नसतों भाऊसाहेब, तर असा प्रसंग माझ्यावर कां येता ? अन् मला गुन्हेगार तरी कोणी केलं ? अन् आतां......" एवढा पुरुषासारखा पुरुष संभू, पण तो मट्कन खालीं बसला व हमसाहमशीं रडूं लागला.

या वेळीं संभूची समजूत घालणें अशक्य होतें म्हणून मी त्याला तेथेंच सोडून घरांत गेलों. काकू आपल्या बेबीला चाकोलेट देत होत्या त्यापैकी एक वडी त्यांनी मलाहि दिली.

" काय रे भाऊ, संभू असा रे काय रडतो आहे ?" काकूंनी विचारलें.

माझ्याच्यानें काकूंना उत्तर देववले नाही.

माझी दिवाळीची सुटी संपली व मी परत माझ्या कॉलेजांत गेलो. अभ्यासांत मन रमल्यामुळें आमच्या भूगांवांत काय चाललें होतें ह्या गोष्टीकडे माझे लक्षहि नव्हतें, व काकाहि मला त्यासंबंधाने कांही कळवीत नसत.

नाताळच्या सुटीत मी काकांचेकडे गेलों होतों. रुक्मा सकाळीच कामा-वर गेली होती. चंपी अंगणांत एकटीच खेळत होती.

" काका, संभू कुठं दिसत नाहीं ?" मी काकांना जेवतांना विचारलें.

" संभू का ? त्याचं पुन्हा नशीब ओढवलं बिचाऱ्याचं चोरी करतांना तो पकडला गेला, आणि एक वेळचा जुना गुन्हेगार म्हणून त्याला कोर्टानं तीन वर्षांची शिक्षा दिली. बाकी एकंदर वाईटच झाली ही गोष्ट पण !......"

" पुरे—पुरे ह्या गोष्टी. जेवतांनासुद्धां वेदान्त कसला म्हणतें मी ? अगोदर हीं भजीं कशीं झालीं आहेत हें सागायचं—" काकू मध्येंच म्हणाल्या व आमचें बोलणें तेवढ्यावरच राहिलें.

आमच्या भूगांवचे व्यवहार पूर्वीप्रमाणेंच चालले होते. रुक्मा दररोज मजूरीला जात होती; चंपी दररोज रस्त्यावर खेळत होती. काकू दररोज जेवणाचे वेळीं माझे व काकांचें बोलणें मध्येच बंद करीत होत्या. सावकारांचा

व्यवहार पूर्वीप्रमाणेच चालला होता. त्यांच्या बलभीमसिंग नांवाच्या नोकरावर मात्र दंग्याच्या आरोपावरून जिल्ह्याचे गांवीं खटला चालू होता, पण सावकारांना त्याची फिकीर नव्हती. ते आपल्या दिवाणी दाव्यांतील भानगडींतच गर्क होते. मी माझी सुटी चैनीने घालवीत होतों आणि संभू—?

—तो तुरुंगांत होता. दुसऱ्यांदा गुन्हा केल्याबद्दल त्याला कडक शिक्षा झाली होती. संभूचें भूगाव संभूला विसरलें होतें. पण भूगांवचा संभू आपल्या गांवाची आठवण काढीत तुरुंगांत आपली शिक्षा भोगीत होता.



# आईबापांची माया : : १५

आणि माया खरोखरच अत्यंत गोड मुलगी होती व आहे. मायेचे वडील आमच्या वाड्यांतच राहतात. त्यांचे नांव दत्तोपंत भावे. दत्तोपंताना सध्यां साठ रुपये दरमहा पगार मिळतो. सिव्हिल सर्जन साहेबांच्या ऑफिसांत ते क्लार्क आहेत. दत्तोपंत आमच्या वाड्यांत सरासरीं पंधरा वर्षांपासून राहत आहेत. सुरवातीला त्यांना तीस-चाळीस रुपये पगार होता. आतां तो साठ रुपये आहे व पेन्शनच्या वेळेपर्यंत ऐंशी रुपयांपर्यंत पगार वाढावयाची दत्तोपंतांना उमेद आहे.

मायेच्या आईचे नांव अनसूयाबाई. विचारी नांवाप्रमाणेंच अगदीं अनसूया आहे. अनसूयाकाकू नेहमी आनंदी असतात. घरचीं सर्व कामें मन लावून करावींत, नवऱ्याच्या कधींहि मर्जीविरुद्ध जाऊं नये व कोणाची कधींहि निंदा करूं नये हा आपला काकूंचा नेहमींचा साधाभोळा कार्यक्रम. काकूंचीं व्रतें-वैकल्येंहि बरींच असत व त्यांत त्यांचा पुष्कळसा वेळ जाई.

दत्तोपंत—यांना काका असेंहि लोक म्हणत—व अनुकाकू यांना अपत्य, एकच; आणि तीहि मुलगी. यासंबंधीं नवराबायको दोघेंहि थोडींबहुत नाखुष होतीं. एकच मूल व्हायचें तें मुलगा व्हायला पाहिजे होतें, असें काकूंचें म्हणणें. दत्तोपंत यासंबंधानें कांहींहि बोलत नसत. येवढी गोष्ट मात्र खरी, कीं आई-बापांची मायेवर अत्यंत माया होती.

"आमची माया हीच आमचे सारे पांग फेडील. ती खूप शिकेल अन् मोठी डॉक्टरीण होईल." काकू म्हणत.

"होय. आपली माया डॉक्टरीण होईल अन् पैसे मिळवील. म्हणजे आपल्याला पेन्शन घेतल्यावर चैनीनं राहतां येईल, नाही ?" दत्तोपंत म्हणत.

"ग बाई! कांहीच्या बाहींच आपलं बोलणं! मुलीच्या पैशावर का आईबापांनीं राहायचं ? आपल्या पेणसलीचं जेवढं कांहीं मिळेल तेवढ्यावरच आपण आपलं समाधानानं राहूं. आपली माया मोठी डॉक्टरीण होईल अन् मग तिचं एखाद्या बड्या अधिकाऱ्याशीं लग्न होईल. अन् मग—"

"पुरे पुरे—" दत्तोपंत मध्येंच म्हणत, "मुलीला येवढं शिकवून तिचं लग्नच करायचं आहे कीं नाही तुझ्या मनांत ? मग तिच्या शिक्षणाला पैसा तरी

कशाला खर्च करायचा ? न शिकतांच तिला आपण डॉक्टरीण बनवून देऊं. आपल्या समोरचे डॉक्टर फडके कसे आहेत ? मोटार, बंगला—अन् काय थाट ! तसाच एखादा नवरा आपल्या मायेला पाहिला म्हणजे झालं."

" आमच्या मायेला नको फडक्यांच्यासारखा चंगीभंगी नवरा. किती ग बाई दारू पितात ते. अन् त्यांचं वर्तनसुद्धां नीट नाही म्हणतात. पैसा काय मेला जाळायचा आहे ? पण मायेला पैसा काय नकोच मुळीं, काय ग बाळ ? "

असे म्हणून काकू मायेचे खूप पापे घेत. या बाबतीत मायेला काही समजत नसे. म्हणून ती आपली आणखीनच आईला चिकटून बसे. त्या वेळी माया फक्त पांच-सहा वर्षांची होती बाप मात्र फक्त तिच्या तोंडाकडेच पाही. तरी पण आईबापांची मायेवर फार माया होती.

* * *

आईबाप मायेवर फार रागावले होते. माया आता दहा-अकरा वर्षांची झाली होती. शेजारची मुलें अंगणात कांही खेळत होतीं त्यांत मायाहि जाऊन खेळूं लागली. खेळतांना माया पडली, आणि तिचे कपडे धुळीने भरले व थोडे फाटलेहि.

" काय कार्टी खराब आहे ! कालच हिला मी नवीन कपडे करून आणले व आजच कार्टीनं ते मळवले अन् फाडले. इच्या असल्या गुणांमुळं कुबेरा-सारखा बापसुद्धां दरिद्री व्हायचा, मग माझी काय कथा ?" दत्तोपंत गरजले.

" आतां ही मुलगी लहान का आहे मुलांत खेळायला ! " काकू स्वतःशीच बोलत होत्या, " या वयांत आम्ही कशा चोरासारख्या घरांत राहत होतों. वरसुद्धां आमच्यानं त्या वेळी बघवत नव्हतं. आता हिचं लग्न झालं म्हणजे हिची सासू नांवं ठेवील मलाच. अन् ही मुलगी जर अशी मुलांत खेळूं लागली तर हिचं लग्न होणंसुद्धां फार कठीण जाईल की ! " मायेचे कपडे मळले व फाटले याबद्दल काकूंना कांहींच वाटले नाही.

" मायेनं काय वाटेल तसं खेळावं; पण आपल्या वस्तूंची नासधूस करूं नये." दत्तोपंत म्हणाले.

आईबाप मायेवर जरी पुष्कळ रागावले होते तरी एवढं मात्र खरं, कीं आईबापांची मायेवर फारच माया होती.

* * *

दत्तोपंत व अनुकाकू यांच्यापुढें एक मोठाच प्रश्न होता. माया मराठी चौथीची परीक्षा पास झाली होती. तिला आतां चौदावें वर्ष लागले होतें. यापुढें मायेनें उमरावतीच्या मुलीच्या शाळेंत जावे की काय हा मायेच्या वडिलांना प्रश्न पडला होता.

" आतां मायेनं शाळा सोडावी. उमरावतीच्या शाळेचा खर्च माझ्याच्यानं काही झेपणार नाहीं आता तूंच मायेला आपल्या हाताखाली गृहकृत्यात तरबेज कर. नाही तरी मुलीच्या जातीला फार शिकून करायचं आहे काय ?" दत्तोपंत म्हणाले.

"मला नाही असं वाटत." काकू म्हणाल्या, " आपल्याला एकच मुलगी. तिच्या शिक्षणाला पैसा नाही खर्च करायचा तर मग तो मेला जवळ ठेवून तरी काय करायचा ? अन् शिकलेल्या मुलींना स्थळंहि कशी चांगली मिळतात. शिक्षणाकरतां मुलीचं लग्न काही लांबणीवर टाकूं नये. पण जितके दिवस चांगलंसं स्थळ आपल्याला मिळत नाही, तितके दिवस तरी मायेला उमरावतीच्या शाळेंत ठेवायची. आपल्याला खर्च झेपत नसला तर मी घरची भाडीसुद्धां स्वतः घाशीन; पण मायेच्या शिक्षणाची आपण आबाळ करूं नये." काकू म्हणाल्या.

" तुला कांहीएक समजत नाही. मायेवर माझी माया नाहीं असं का तुला वाटतं ! पण तिच्या शिक्षणाचा खर्च कांही मला झेंपणार नाही येवढं मात्र खरं." दत्तोपंत म्हणाले.

दुसऱ्या दिवसापासून माया आईच्या हाताखाली गृहशिक्षणाचे धडे घेऊं लागली. मायेचे शिक्षण संपलें. येवढी गोष्ट मात्र खरी, की आईबापांची मायेवर अत्यंत माया होती.

* * *

मायेला आतां पंधरावें वर्ष लागले. माया खरोखरच सुंदर व गोड मुलगी होती. माया होती काळीसांवळीच; पण तिचा हंसतमुख चेहरा व नेहमींची उल्हासित वृत्ति पाहणाऱ्याच्या मनांत तिच्याविषयी आदर उत्पन्न करीत. शेजारच्या बायका म्हणत, कीं मायेला खूप श्रीमंत नवरा मिळणार.

" आम्ही जर श्रीमंत असतो व इकडे जर पैसा खर्चायची इच्छा असती तर मात्र मायेला श्रीमंत नवरा मिळाला असता. सध्यां साधारणतः उत्तम शीलाचा नवरा तिला मिळाला म्हणजे आम्ही मिळविली." काकू आपल्या मैत्रिणींना म्हणत.

" आमच्या मायेला मी खरोखर श्रीमंत नवरा पाहून देणार आहें." काका आपल्या मित्रांना व त्यांच्या ऑफिसमधल्या कारकून मंडळींना सांगत. कारण ही गोष्ट अगदी खरी, की आईबापांची मायेवर अत्यंत माया होती.

* * *

त्याच वर्षीची गोष्ट—

" मग मायेची पत्रिका त्या देशमुखांना दाखवितां का? मुलगा बरा दिसतो आहे. स्वभावानं गोड आहे. आतां त्याला महिना फक्त चाळीस रुपये मिळतात ही गोष्ट खरी; पण माझी माया तेवढ्यांतच आपला संसार कसा फक्कड रीतीनं करून दाखवील." काकू दत्तोपंतांना म्हणत होत्या.

" छे-छे, तो देशमुख कसला पाहतेस आपल्या मायेला? मुलगा चांगला आहे खरा, पण दरिद्री. आपल्या मायेला कसा सुंदर अन् श्रीमंत नवरा पाहिजे. पैशाशिवाय मायेला सुख कसं लागणार?" दत्तोपंत म्हणाले.

" का बरं? आपण गरीब असूनसुद्धा मला नाही का संसारात सुख लाभलं? सुख कांही पैशावर अवलंबून नाही. देशमुखाचंच स्थळ पहावं मायेला." काकूंनीं उत्तर दिले.

माया अंगणात उपकरणी विसळीत होती. आईबापांनीं दोघांनींहि मायेकडे मायेनें पाहिले. त्याच्या विचारांत फरक होता, पण दोघाचेंहि उद्दिष्ट मात्र मायेचं कल्याण हेंच होतें. आईबापांची मायेवर अत्यंत माया होती.

* * *

आणखी सहा महिने असेच गेले. मायेचें लग्न देशमुखांशी काहीं झालें नाहीं. कांकूंनीं थोडीशी कुरबुर केली पण ती तेवढ्यावरच थांबली. कर्मधर्मसंयोगानें त्याच सुमारास डॉक्टर फडके यांची दुसरी बायको वारली. तेव्हां लगेच दत्तोपंतांनी डॉक्टरसाहेबांशी मायेच्या बाबतीत बोलणें सुरू केले.

" आपण मनांत आणलं आहे तरी काय?" काकू दत्तोपंतांना म्हणत होत्या, " डॉक्टरसाहेब साऱ्या मुलखाचे व्यसनी आहेत, आणि त्याच्या त्रासामुळंच त्यांच्या दोन बायका गेल्या असं लोक म्हणतात हें माहीत नाहीं का आपल्याला? असल्या व्यसनी अन् वयस्क मनुष्याला आपली मुलगी देऊं म्हणतां तेव्हां मायेची माया सगळी मेली गेली तरी कुठं आपल्या मनांतली?

" मला मायेची माया आहे, आणि म्हणूनच मी मायेला डॉक्टर फडक्यांना द्यावी असं म्हणतो. अग, रूप, तारुण्य आणि उमेद जरी सर्व कांहीं असलीं

अन् फक्त पैसा जरी नसला तर आयुष्य कांहीं सुखी होऊं शकत नाहीं. आजकालच्या कांहीं मोठाल्या मुलींचे पालकसुद्धां अगोदर आपल्या मुलींचीं श्रीमंतांशीं लग्नं करायला पाहतात याचं कारण हेंच. डॉक्टरना असतील कांहीं व्यसनं; पण मोठाल्या लोकांना असलीं व्यसनं असायचींच. आपल्या मुलीला खायला-प्यायला तर चांगलं मिळेल ना? सुंदर सुंदर कपडे अन् बसायला मोटार मिळेल ना? झालं तर! जगांत आणखी सुख तें काय?"

"आली आहे खरी पोर आपल्या पोटीं. तेव्हां तिची मान कापायचा अधिकार आपल्याला आहेच. पण अशा तऱ्हेनं तिला बुडविण्यापेक्षां एखाद्या विहिरींत तरी तिला ढकलून द्यायची होती!" काकू संतापानें म्हणाल्या व कांहीं वेळानें अश्रु गाळूं लागल्या. अबलांच्या संतापाचें पर्यवसान नेहमीं अश्रूंतच होत असतें.

शेवटीं मायेचें लग्न डॉक्टर फडके यांचेशींच ठरलें व एका योग्य सुमुहूर्तावर तें पारहि पडलें. कुमारी माया ही सौ. माया फडके झाली. दत्तोपंतांना आनंद झाला, काकूंना काय वाटलें कोण जाणे. कांहीं लोक म्हणत, 'बाप फारच दुष्ट मनुष्य आहे; कारण त्यानें आपली मुलगी जाणूनबुजून व्यसनी माणसाला दिली.' कांहीं लोक म्हणत, 'माया गरिबाची पोर असली तरी ती भाग्यवान् असली पाहिजे; कारण तिला डॉक्टर फडक्यांच्यासारखं श्रीमंत स्थळ मिळालं.' मायेला काय वाटत होतें याची चौकशी कधीं कोणी केली नाहीं. कारण लग्नाच्या बाबतींत मुलींना काय समजतें असेंच सगळ्यांचें म्हणणें.

दत्तोपंतांचीहि मायेवर माया होती व काकूंचीहि होती. दोघांनाहि मायेचें हितच करावयाचें होतें; पण दत्तोपंतांची विचार करावयाची पद्धति एक—तर काकूंची दुसरीच. त्यामुळें मायेच्या हिताच्या बाबतींत दोघांचाहि मतभेदच होई.

माया जेव्हां जेव्हां माहेरी येते तेव्हां तेव्हां दत्तोपंत म्हणतात, 'माझी माया नशीबवान्. तिला पहा कसं चांगलं स्थळ मिळालं आहे.' अन् मग माया खिन्नपणानें हंसते. कधीं कधीं माया आपल्या आईच्या कुशींत शिरून अश्रुमोचन करते, पण तें दत्तोपंत न पाहतील अशाच रीतीनें. काकूहि मायेचें सान्त्वन करतात, पण त्यांचीहि पद्धति तीच. अशा तऱ्हेनें जग चाललें आहे. पण ध्यानांत ठेवायची गोष्ट येवढीच, कीं आईबापांची—दोघांचीहि मायेवर अत्यंत माया आहे, व दोघेंहि जें कांहीं करतात तें मायेच्या सुखाकरतांच करतात!

# फणसाचे गरे : : १६

“ बाबुराव ! अहो बाबुराव ! ” खालून हांक ऐकूं आली. मी आवाज ओळखला. माझे मित्र अप्पासाहेब मला हांक मारीत होते.

एप्रिल महिन्याच्या दुसऱ्या किंवा तिसऱ्या आठवड्यांतील गोष्ट. माझ्या नेहमीच्या संवयीप्रमाणें मी आमच्या रस्त्याकडील माडीवर चहा घेत बसलों होतों. वाचतांना मधून मधून जवळच पडलेल्या ‘इलस्ट्रेटेड विकली’वरून नजर टाकीत होतों. अगदीं खरें बोलायचे म्हटलें म्हणजे त्यांतील नुसतीं चित्रेंच मी पाहत होतों. अप्पासाहेब माझ्याकडे याच वेळेस येतील अशी माझी कल्पनाहि नव्हती. अप्पासाहेब तीन–चार दिवसांतच मसूरीला सहकुटुंब राहायला जाणार होते. तेव्हां उरलेले दोन–चार दिवस आपल्या मित्रमंडळींबरोबर मोठ्या मजेनें घालवावे असें त्यांना वाटत असल्यास मुळीच नवल नव्हतें.

“ या हो अप्पासाहेब ! या— असे सरळ माडीवर या ! ” मी वरूनच ओरडलों व आमच्या नाथूरामला आणखी चहाचा एक कप आणून द्यायला फर्मावलें.

अप्पासाहेब या वेळेस खूप खुशीत असतील अशी माझी कल्पना होती, पण मला ते अगदीं घुश्शांतच दिसले.

“ काय अप्पासाहेब ! मसूरीची तयारी खूप धडाकून चालली असेल नाहीं ? नशीबवान आहांत बुवा ! खरोखर अप्पासाहेब, तुमच्यासारखे भाग्यवंत जगांत फार थोडे. वहिनींच्यासारखी सालस अन् सुविद्य बायको आणि दादासाहेबांच्यासारखे प्रेमळ वडील—”

“ हं ! दादासाहेबांच्यासारखे प्रेमळ वडील ! ” अप्पासाहेब मध्येंच म्हणाले. त्यांच्या भव्य कपाळावर तिरस्काराच्या दोन आठ्या पडल्या. “ बाबूराव ! परदुःख शीतळ म्हणतात तें उगीच नव्हे. दादासाहेबांच्यासारखे वडील. हं ! जावं त्याच्या वंशा तेव्हां कळे.”

मी चपापलो. अप्पासाहेबांचे व दादासाहेबांचे मधून मधून खटके उडतात हें मला माहीत होतें. आजहि असाच कांहीं खटका उडाला असेल हें

माझ्या लगेच ध्यानांत आलें. पण अप्पासाहेब आज इतके गरम कां झाले आहेत हें मात्र माझ्या लक्षांत येईना.

"पण अप्पासाहेब," मी म्हणालों, "आज तुम्हांला येवढं संतापायला झालं तरी काय? बरं आतां असं करा, येवढा चहा घ्या म्हणजे तुम्हांला जरा बरं वाटेल; आणि मग तुम्ही तुमच्या संतापाचं कारण मला सांगा."

"तें असं झालं बाबूराव," अप्पासाहेब चहा घेत घेत मला म्हणाले, "आज सकाळीच दादासाहेब आपल्या हिशेबाच्या वह्या पाहत होते. मला पाहतांच ते मला म्हणूं लागले, कीं 'अप्पा, यंदांच्या वर्षी वसुली कांहीं बरोबर झालेली नाहीं, आणि नापिकी पण झाली आहे. तेव्हां तूं यंदा मसूरीला जाऊं नकोस.' काय सांगूं बाबूराव तुम्हाला मी, म्हातारा दिवसेंदिवस जास्तच पैशाचा लोभी होऊं लागला आहे. मसूरीला जाऊन कांहीं हजार दोन हजार रुपये खर्च करणार नव्हतों. चार-पांचशें रुपये मला पुरले असते; पण नाही—म्हातारा आपण येथेंच धडपडेल अन् सर्वांना येथेंच डांबवून ठेवील. पूर्वजन्मीचा सूड उगवितो आहे म्हातारा! मला तर वाटतं बाबूराव, म्हाताऱ्याच्याविरुद्ध वांटणीचा दावा दाखल करावा. अन् त्याच्याकडून आपल्या हिश्शाशी इस्टेट अलग करून घ्यावी."

"हो—हो अप्पासाहेब!" मी म्हणालों, "इतके वाहवूं नका. म्हातारा कसाहि असला तरी तुमचा पिता आहे. तुम्ही मसूरीला जाऊं नये म्हणून दादासाहेबांनी जीं कारणं दिलीं आहेत तीं कांहीं अगदींच गैर नाहींत. तरी पण येवढं मात्र खरं, कीं दादासाहेबांनी तुम्हांला मसूरीला जाऊं द्यायला कांहीं हरकत नव्हती."

माझें हें न्यायाधिशासारखे म्हणजे दोन्ही बाजूंना चुचकारून दोघांनाहि चुका दाखविणारें भाषण ऐकून अप्पासाहेब थोडेसे खूष झाले. कारण इतर मुद्द्यांवर जरी मी अप्पासाहेबांच्या विरुद्ध बोललों होतों, तरी मुख्य मुद्द्यावर मात्र मीं त्यांच्याच म्हणण्याप्रमाणे निकाल दिला होता.

"आमच्या दादासाहेबांचं हें असंच आहे बाबूराव!" अप्पासाहेब म्हणाले, "स्वभाव साऱ्या मुलखाचा कंजुष. पैसा खर्च करणं मुळीं त्यांच्या जिवावरच येतं. हाडाचीं काडं करून एवढा पैसा मिळवला अन् तो सारखा उरस्फोड करून जपून ठेवीत आहेत. तरी बरं, की मेल्यानंतर कांहीं पैसा त्यांच्या-बरोबर जात नाहीं. कंजुषपणा तर येवढा, कीं स्वतःच्या जमाखर्चाची वही

तिजोरींत ठेवलेली असते व ती ते दिवाणजीलासुद्धां दाखवीत नाहींत. आतां नापिकी झाली आहे म्हणतात; पण कोणाहि कुळाला एक पैसाहि सोडीत नाहींत. बाकी परवांच त्यांच्याच गैदीपणामुळं दस्तऐवजांचं एक पुडकंच जळून गेलं. देव असंच शासन करतो कंजुष म्हाताऱ्यांना! लोकहि पण असे मूर्ख आहेत बाबूराव, कीं दस्तऐवज जरी जळून गेले तरी त्यांनीं आमच्या घरी येऊन पैशाची आदाईहि केलीच."

"हं!" मी म्हणालों. मी असें कां म्हणालों कोण जाणे, माझ्या मनश्चक्षूंना त्या वेळी जळते दस्तऐवज दिसत असावेत.

"बाबूराव," अप्पासाहेब मूळ मुद्द्यावर येऊन बोलले, "माझ्या मनांतून तर मसूरीला जायचं फार आहे. आमचे दादासाहेब तुमचं ऐकतात. तेव्हां तुम्ही माझ्यातर्फे त्यांच्याकडे 'कृष्णशिष्टाई' कराल का?"

अप्पासाहेबांनीं मसूरीला जावें असें मलाहि वाटत होतें. दादासाहेबांचा माझ्यावर थोडासा लोभहि होता. मी त्यांना आवडत असे व अप्पासाहेबांच्यातर्फे मी जर कांहीं थोडीफार शिष्टाई केली तर ती फुकट जाणार नाहीं असें मला वाटत होतें.

अप्पासाहेबांचें म्हणणें मीं कबूल केले व आम्ही दोघेहि दादासाहेब फणसे यांच्या वाड्याकडे निघालों.

* * *

दादासाहेब फणसे, आमच्या अप्पासाहेबांचे वडील, हे आमच्या गांवांतील प्रख्यात सावकार होते. दादासाहेब जुन्या चालीचे व बालबोध गृहस्थ समजले जात. सकाळीं चार वाजतां उठून आठ वाजेपर्यंत देवतार्चन व पोथीपाठ वगैरे करावयाचा. त्यानंतर दुकानांत जाऊन हिशेबठिशेब पहावयाचा व कुळांशीं बोलावयाचें. नंतर बारा वाजतां घरीं येऊन भोजन करावयाचें व थोडा वेळ वामकुक्षी करावयाची. त्यानंतर संध्याकाळीं आपले खुद्द स्वतःचे खाजगी हिशेब पहावयाचे, पुढें देवदर्शनाला जावयाचें व रात्रीं थोडेसें भजन करून झोंपीं जावयाचें हा दादासाहेबांचा कार्यक्रम असे. दादासाहेबांना कांहीं लोक चिक्कू म्हणत तर कांहीं धर्मात्मे म्हणत. मलाहि पण ते थोडेबहुत चिक्कू असावेत असें वाटत असे. अप्पासाहेबांना मसुरीला न जाऊं देण्यांत दादासाहेब अन्याय करीत आहेत असेंच मला वाटे.

आम्ही दोघे दुकानावर गेलों. विठू धनगराशीं दादासाहेब बोलत होते—

" हं, मग विठू, तूं पैसे कधी देणार बाबा ? "

" अवंदा तर एक पैसा नाहीं बघा दादासाहेब. समदा पैसा अम्बीच्या लग्नांत खर्च होऊन गेला."

" छे-छे ! विठू, मला तुला मुदतहि देतां येत नाहीं व पैसाहि सोडतां येत नाहीं. कराराप्रमाणं तुला आतां तुझी जमीन मला खरेदी करून दिली पाहिजे. तुझ्या रडण्याओरडण्याचा माझ्या मनावर कांहींएक परिणाम होत नाहीं."

" हं—संभू, तुझ्या पैशाचं कसं काय ? "

" दादासाहेब, आतां तुम्ही तारा किंवा मारा. अवंदा पैसा कांहीं मुळींच नाहीं. अवंदा पीकहि झालं आपलं यथातथाच, अन् जें झालं आहे त्याला बाजारांत मुळीं भावच नाहीं बघा. अहो, एवढा चांगला गहूं पण त्याला कुणी दहा रुपयांनीं विचारीना. मग आतां करावं कसं तुम्हीच सांगा."

" तर मग असं कर संभू, यंदा तूं आम्हांला चार पोतीं गहूं दे. उरलेले पैसे पुढल्या सालीं दे व त्याप्रमाणं आतां नवीन कागद करून दे. आहे तुला कबूल ही गोष्ट ? "

" वा दादासाहेब ! आपून कांहीं गोष्ट म्हटल्यावर मी नाहीं कशी म्हणन बरं ? तर मग जातो मी त्रिमकरावाकडं. रामराम दादासाब."

" रामराम संभू."

दादासाहेबांचीं व कुळांचीं बोलणी लवकरच संपली; इतक्यांत आमच्या गांवचे पुढारी दत्तोपंत जोगळेकर दुकानांत आले. ते अमेरिकेंत एक धरणीकंप झाल्यामुळें जे कांहीं लोक अन्नान्न दशेला पोंचले आहेत त्या लोकांच्या मदती-करतां एक फंड उभारला होता त्या फंडाला मदत मागण्यासाठीं आले होते. दत्तोपंतांनीं आपला येण्याचा उद्देश सांगितला.

" दादासाहेब, आपल्या रावबहादुर रामनाथांनी पन्नास रुपयांचा आंकडा टाकला आहे. ती असामी कांहीं आपल्या बरोबरीची नाहीं. तेव्हां आपण रामनाथांपेक्षां जास्त रक्कम द्यायला पाहिजे; पण आपण सध्यां निदान पन्नास रुपयांचा आंकडा टाकला तरी पुरे आहे."

दादासाहेब नुसते हंसले. त्यांनीं वर्गणीची यादी घेतली व एक रुपयाचा आंकडा टाकला. थोड्याशा इकडच्या तिकडच्या गोष्टी होतांच दत्तोपंत उठले. दादासाहेबांनीं लगेच रुपया काढून दत्तोपंतांचे हातावर ठेवला.

सर्व मंडळी गेली, तरी आम्ही बसलोंच होतों.

"काय बाबूराव," दादासाहेब मला हंसत म्हणाले, "तुम्ही आज कोणत्या कामगिरीवर आलां आहांत? मसूरीच्या कामगिरीवर आलां असाल बहुतकरून?"

मी कांहीच बोललों नाही "अप्पा, तूं व बाबूराव मला कंजूष म्हणत असाल, नांवंहि ठेवत असाल. आतां तुम्ही मुलं माझ्या बरोबरीचीच झालां आहांत, तेव्हा मला काय वाटतं तें तुम्हांला स्पष्टपणानं सांगायला मला कांहीं हरकत दिसत नाही."

"बाबूराव, माझे वडील गरीब होते व त्यांनी मरते वेळीं माझ्याकरतां कांहीं पैसा ठेवला नाहीं. मात्र त्यांनी मला एक अति महत्त्वाची देणगी दिली. ती देणगी म्हणजे माझी दानत. आज तागायत ती देणगी मी अगदी जपून ठेविली आहे.

"आदा पाहून खर्च कर," ही माझ्या वडिलाची मला सागण होती. आजपर्यंत मी स्वतःचे सुखाकरतां कधीहि कर्ज काढलं नाहीं. व्यवहाराकरता व धंद्याच्या वाढीकरतां मीं कर्ज काढलं आहे पण त्या कर्जामुळं माझा व दुसऱ्यांचा फायदाहि झालेला आहे. पैसा वांचविणं म्हणजे तो जमिनीत पुरून ठेवणं नव्हे तर त्याचा उपयोग फायद्याच्या कामीं करणं हा होय.

"मघां गणूला मी व्याज कमी करीत नाहीं म्हणून सांगितलं. कारण कर्ज घेतलेली रक्कम त्यानं लग्नांत खर्च केली. अशा माणसावर दया करणं म्हणजे त्याला पैशाची उधळपट्टी करण्याला उत्तेजन देणं.

"संभूला मीं मुदत दिली व त्याच्यापासून गहूं घ्यायचे कबूल केलं संभू बुडला तो शेतींत, तेव्हां त्याला मुदत देणं जरूर होतंच. वास्तविक पाहतां मला या वेळीं गहू विकत घेण्याची मुळींच जरूर नव्हती. पण संभूजवळून मी गहूं विकत घेतले याचं कारण काय?"

"कारण ते स्वस्त पडले म्हणून." मी म्हणालों.

"हेंच कारण नाहीं बाबूराव. माझं कारण दुसरंच आहे. आतां तें तुमच्यासारख्या तरुण लोकांना पटेल कीं नाहीं कोण जाणे!

"माझ्या मतानं की नाहीं, कोणाहि मनुष्याला कोणतीहि गोष्ट दान म्हणून देणं हा त्या मनुष्याच्या कर्तृत्वशक्तीचा अपमान आहे. संभूनं मेहनत केली, पण त्याला आज माझं कर्ज मंदीमुळं पुरं फेडतां आलं नाहीं. आतां अशा परिस्थितींत जर मीं संभूला म्हटलं असतं कीं, 'बाबा रे, तूं आतां माझं कर्ज देऊं

नकोस. मीं तुला तें माफ केलं आहे.' तर संभूला काय बरं वाटलं असतं? त्याला एक तर आपला अपमान वाटला असता, किंवा त्याला असं वाटलं असतं, कीं आपण जरी सावकाराचे पैसे न फेडले तरी चालतं. दोन्हीहि गोष्टी अनिष्ट आहेत. संभूनं माझे पैसे जरी न दिले तरी मी त्याच्यावर फिर्याद करणार नाही. पण मी संभूला हें कधींहि कळूं देणार नाही, कीं दादासाहेबांनी आपल्याला कर्ज माफ केलं आहे."

"अशा वेळीं आपण काय कराल अप्पासाहेब?" मी मध्येच विचारलें. दादासाहेबांच्या म्हणण्यांत फारच तथ्य आहे असे मला वाटूं लागले होतें.

दादासाहेब नुसते हंसले, "अशा वेळीं काय करायचं हें प्रत्येकानं आपल्याशीं विचार करून ठरवायचं असतं."

"तर मग दादासाहेब," अप्पासाहेब मध्येंच म्हणाले, "कांहीं दिवसांपूर्वी आपले कांहीं दस्तऐवज जळाले ते कांहीं उगीच नाही जळाले, त्यांत कांहीं तरी अर्थ असला पाहिजे!"

"तुम्ही काय वाटेल तें म्हणा व वाटेल ते अर्थ काढा. कागद जळाले एवढं मात्र खरं." दादासाहेब म्हणाले व मग एकदम मोठ्यानें हंसले.

"आतां, मीं मघां दत्तोपंत जोगळेकरांना फक्त एकच रुपया वर्गणी दिली हें तुम्हांला कांहीं आवडलं नसेल बाबूराव. पण माझी आपली या बाबतींत एक विवक्षित विचारसरणी आहे. माझ्या मतानं हिंदुस्थानांतल्या गरिबांनाच अजून मदतीची पुष्कळ जरूरी आहे व आपल्यासारख्या मध्यम स्थितींतल्या लोकांनीं वर्गण्या द्यायच्याच झाल्या तर त्या हिंदी लोकांच्याचकरतां अगोदर द्याव्या. Charity begins at home अशी एक म्हण आहे ना बाबूराव?"

मी नुसता हंसलों. खरं पाहिलं असतां दादासाहेबांच्या बोलण्यांत बरेंच तथ्य आहे असे मलाहि वाटूं लागले होतें.

"आतां मूळ मुद्द्यावरच येऊं आपण बाबूराव. यंदाचे वर्षी आम्हांला उत्पन्न मुळींच झालं नाहीं. कर्जवसुली फारच कमी आहे. अशा वेळीं आमच्या अप्पानं मसूरीला जाऊं नये असं आपलं मला वाटतं. पैसा मिळाला तर चैन जरूर करावी; पण गरिबांच्याकडून सक्तीनं पैसा वसूल करून घेऊन नंतर आपण हवा खाण्यास मसूरीला जायचं ही कल्पना माझ्यासारख्या जुन्या पद्धतींत वाढलेल्या मनुष्याला पटत नाही. मला आपलं वाटतं, कीं श्रीमंत मनुष्य जरी झाला तरी त्याला कांहीं समाजऋणं असतातच. आमच्या जुन्या शास्त्रांत 'सर्वांभूतीं

पहावा रमारमण' असं म्हटलं आहे. माझा आपला धर्मावर विश्वास आहे बाबूराव. आणि मी तुम्हांला मोठ्या अभिमानानं सांगूं शकतों, की या पासष्ट वर्षांच्या काळांत जी गोष्ट मीं केली असं सांगण्याची मला लाज वाटते अशी एकहि गोष्ट माझ्या हातून झाली नाहीं."

दादासाहेबांची ही धर्मश्रद्धा पाहून मला फार आश्चर्य वाटलें. आजपर्यंत माझी अशी कल्पना होती, कीं धार्मिक मनुष्य बऱ्याचशा बाबतींत मूर्ख असतो. दादासाहेबांची विचारसरणी मात्र मला फारच उदात्त वाटली.

" तर मग अप्पा, कधी जायचं मसूरीला म्हणतोस तूं ?" दादासाहेबांनी अप्पासाहेबांना विचारलें.

" नाहीं—दादासाहेब, मला यंदा मसूरीला जायचं नाही हो." अप्पासाहेब म्हणाले. त्यांचे डोळे भरून आले होते.

" बरं झालं, तुम्हां मुलांना माझ्यासारख्या म्हाताऱ्याचं बोलणं पटलं. बरं, आतां थोडेसे फणसाचे गरे खातां का ? कालच आले आहेत, पहा हे."

जनार्दननें बरेचसे कापलेले गरे एका ताटांत घालून आमच्यापुढें ठेवले. आम्हांला संकोच वाटूं नये म्हणून दादासाहेब तेथून उठून गेले.

" अप्पासाहेब—" मी गरे खातांना म्हटलें.

अप्पासाहेबांनीं प्रश्नसूचक मुद्रेनें माझ्याकडे पाहिलें.

" अप्पासाहेब, " मी म्हटलें, " फणसाची साल वरून ओबडधोबड असते पण आंतील गरे अत्यंत गोड असतात, नाही ?"

" होय बाबूराव," अप्पासाहेब म्हणाले, " या फणसाच्या गऱ्यांप्रमाणंच आमच्या दादासाहेबांचं अंतःकरण आहे. वरून दिसायला कधींकधीं निर्दय वाटतात, पण अंतर्यामीं आमचे दादासाहेब अत्यंत प्रेमळ आहेत. अशा वडिलांच्या पोटीं मी जन्माला आलों आहे याबद्दल मला आज अभिमान वाटत आहे बाबूराव."

" आणि तसं म्हटलं तर तुम्ही आहांतहि फणसेच." मी म्हणालों, " बाकी हे फणसाचे गरे फारच गोड आहेत नाहीं !"



# भिकारी कुबेर : : १७

" नारायणराव ! अहो नारायणराव ! नारायणराव ! "

" आलों—आलों साहेब."

" फारच गैदी आहांत बुवा नारायणराव तुम्ही. तुम्हांला बोलवायचं म्हणजे मला किती घसेफोड करावी लागते ! छे बुवा ! अशानं मला तुम्हांला कामावरून कमी करावं लागेल हं ! त्या तीस सालच्या हिशेबाच्या वह्या आणा बरं इकडे—कीर्द, खतावणी आणि इतर सगळ्या."

" होय साहेब."

नारायणराव तेथून हलकेंच निघून गेले.

वऱ्हाडांतल्या साधारणतः प्रत्येक माणसाला लक्ष्मीपूरचे कुबेर सावकार माहिती. 'कुबेर' सावकाराचें 'लेनदेणं' कांही लाखांचें असावें अशी लोकांत बोलवा होती. कुबेरशेठना प्राप्तीवरील कर कित्येक हजारांनीं द्यावा लागत असे. कुबेरशेठ यांची बरीचशी जमीनहि होती व ती ते दर वर्षी खंडानें लावीत असत.

सावकारांचें आडनांव कुबेर होतें व तें अगदीं सार्थहि होतें. दररोज दोनप्रहरीं सावकार आपलीं वहीखातीं पाहत. फिर्यादीअर्यादी कांही करावयाच्या असतील तर त्यांचे मसुदे तयार करीत व वेळप्रसंगी मुकद्मा कसा चालवावयाचा हें ते आपल्या वकिलांना समजावून देत. सावकारांच्या दुकानावर तीन मुनीम काम करीत असत. नारायणराव हे त्यांपैकींच एक होते.

नारायणरावांनीं हिशेबाच्या वह्या सावकारांचेपुढें ठेवल्या व एकदां हुश् असें करून आपल्या मळक्या कोटाच्या बाहीनें कपाळावरील घाम पुसला.

" नारायणराव !" सावकारांनीं वह्यांचेकडे पाहत असतांना नारायणरावांना हांक मारली.

" साहेब—" नारायणरावांनीं उत्तर दिलें.

" त्या आसलगांवच्या भिकाऱ्यावर आपण फिर्याद केली होती त्याचं काय झालं ?"

“ डिक्री झाली साहेब.”

“ पूर्ण डिक्री झाली ना ? ”

“ नाहीं साहेब. साहेबांनीं तीन रुपये दोन आणे महिन्याप्रमाणं व्याज दिलं नाहीं. त्यांनीं व्याजाचा दर कमी केला.”

“ कां बुवा ? अन् आपल्या देव वकिलांनीं त्याला कांहींच हरकत घेतली नाहीं का ? ”

“ साहेब अन् देव वकील इंग्रजीत कांही बोलले व मग देव वकील हंसले. येवढंच मला माहीत आहे.”

“ हं ! ” सावकार बोलले व त्यांच्या भव्य कपाळावर तिरस्काराच्या आंठ्या दिसूं लागल्या.

“ नारायणराव ! देव वकिलांना यापुढं आपलं काम द्यायचं नाही. अन हे जज्जसाहेब तरी चमत्कारिकच आहेत. आम्ही कोर्ट फी देतांना कधीं तक्रार करीत नाही; मग आमचाच पैसा घेऊन आमचंच नुकसान करायचं हा कुठला न्याय ? ”

कांही वेळ दोघेहि स्तब्ध होते.

“ नारायणराव ! ”

“ साहेब.”

“ भिकाऱ्यावर हकरसी काढली काय ? ”

“ नाहीं साहेब.” नारायणरावांनीं भीत भीत उत्तर दिलें.

“ कां ? ”

“ तो म्हणाला मी पैशाची सोय लवकरच करतों व त्या बाबतीत मी सावकारांना भेटणार आहे.”

“ हं—तो आला होता खरा माझ्याकडे, पण मी त्याला तसाच परत पाठविला. आतां दयामाया मुळीच उपयोगी नाहीं. तुम्ही त्याच्या घरावर जप्ती न्या, अन् आपला पैसा वसूल करायची कोशीस करा ! ”

“ बरं आहे साहेब.” नारायणराव म्हणाले.

सावकार हिशेबांच्या वह्यांचीं पानें उलटूं लागले. कांहीं वेळानें त्यांनीं वर पाहिलें तों नारायणराव आपले तेथेंच उभे.

“ काय हो नारायणराव, काय आहे तुमचं काम आतां इथं ? ” सावकार गरजले.

" कांही नाहीं साहेब." नारायणराव अडखळत म्हणाले.

" मग इथं एखाद्या कर्जदारासारखे तुम्ही उभे कशाला राहिले आहांत ! चला निघा इथून."

" पण साहेब—! वेणू घरीं आजारी आहे. तिला औषधपाणी करावं लागतं. पगार सारा संपला. फक्त दहाएक रुपये आपण जर आगाऊ दिलेत तर- -"

" छे-छे," सावकार मध्येंच म्हणाले. " माझ्याजवळ सध्या पैसे नाहीत. असा पैसा जर मी खर्चूं लागलो तर खराखुरा कुबेरसुद्धां भिकारी होईल, मग माझी काय कथा ! अन् हें पहा नारायणराव, तुम्ही आपल्या मुलीला हे डॉक्टरी इलाज करूं नका. तिला विश्वेश्वराचं तीर्थ दररोज तीन वेळ देत जा. म्हणजे आतां चार दिवसांत पोर दुरुस्त होईल. हं--जा आतां इथून."

अत्यंत जड अंतःकरणानें नारायणराव निघून गेले.

* * *

सावकाराचे पुढें गोगलगायीसारखे वागणारे नारायणराव आज वाघासारखे डुरकाळ्या फोडीत होते. भिकाऱ्याच्या घरावर कुबेर सावकारांची जप्ती आलेली होती. भिकाऱ्याचें घर तें ! त्याच्या घरांत मालमत्ता ती काय असणार ? दोनचार गाडगीं, एकदोन ताटें अन् एखाददुसरें पितळेचें भांडें ! घरांतील सर्व सामान बेलिफानीं अंगणांत जमा केलें होतें. बेलीफ सामानाची यादी करीत होता. पंचनाम्यावर सह्या करायला साक्षीदारांची अहमहमिका लागली होती.

भिकाऱ्या अंगणांत उभा होता. त्याची बायको आपल्या तान्हुल्याला घेऊन तेथेंच बसली होती. भिकाऱ्याचीं दोन मुलें तुकाराम व जिजू बिचारीं अगदीं घाबरून गेलीं होती. शेजारच्या ओटीवर नारायणराव जप्तीकारकुनाबरोबर पानसुपारीचे बार भरीत होते.

" हं ! आटपा रे आतां सारं इथलं काम." नारायणराव म्हणाले, " दहा वाजायची वेळ आली."

" मालकसाहेब--!" भिकाऱ्या म्हणाला.

नारायणरावांनीं अत्यंत तिरस्काराची मुद्रा करून त्याचेकडे पाहिलें व आपल्या अकालीं पांढुरक्या दिसणाऱ्या मिशांना पीळ भरला.

" मालकसाहेब ! " भिकाऱ्या बोलला, " इतकी इतराजी नव्हती करायची

गरिबावर. आज मला पैसा देण्याचं सामर्थ्य नाहीं हें खरं, पण मी तुमचा पैसा कधीं नसता बुडवला. आज तुम्ही मात्र मला भाकरीला महाग केलंत! पदरीं हीं तीन मुलं आहेत. आज त्यांच्या तोंडची भाकरी तुम्ही काढून घेतां आहांत. गरिबावर मेहेरनजर केली असतीत अन् माझेकडून पुढच्या वर्षी पैसा वसूल केला असतात तर आम्हां सर्वांचा दुवा घेतला असतात. यंदा पावसानं डोळे वटारले, अन् धान्याला भाव तर मुळींच नाहीं. अशा वेळीं पैसा डोळ्यांनी दिसायची मारामार! घरांत थोडंबहुत धान्य होतं तें तुम्ही आज जप्त केलंत. मालक! फारच आज तुम्ही इतराजी केलीत......" भिकाऱ्याला पुढें बोलवेना.

पुरुषासारखा पुरुष भिकाऱ्या, पण तो मटकन् खालीं बसला. परिस्थिति वाघालाहि गाय बनविते.

"अरे वा!" नारायणराव म्हणाले, "हा भिकाऱ्या तर उत्तम नाटक करतो आहे. का रे भिकाऱ्या, तूं आतां एखाद्या नाटक मंडळीत जा म्हणजे तुला तेथें चांगला पगार मिळेल. काय बेटा लबाड आहे! का रे भिकाऱ्या! मालकाचा पैसा घेतलास अन् खर्च केलास त्या वेळीं कशी रे वाटली तुला मजा! पैसे घेतांना या बेट्यांना कशी मजा वाटते अन् देतांना बेटे कधीं सुधेपणानं देतील तर शपथ! चोर कुठले! काढा रे सारं सामान घरांतलं." नारायणराव गरजले.

"मालकसाहेब," भिकाऱ्या म्हणाला, "पैसे कर्जाऊ घेतले खरे पण ते कांहीं चैनीकरितां घेतले नाहीत. लागवडीकरतां पैसे घेतले व जमिनींतच घातले. देवाची मर्जी नव्हती—सारा पैसा जमीन खाऊन बसली— पैसा गेला. पण मालक, आमचं इमान शाबूत आहे. आपण मोठे लोक आहांत; काय वाटेल तें बोलतां पण आमच्यासारख्या गरिबालासुद्धां मन आहे मालक! तुमचा एक एक शब्द काळीज कसं कापीत जातो बघा!"

"हं—हं! पहा हो देवजी पाटील या लुच्चाचं नाटक! पैसे द्यायला नकोत अन् सोंग करायला पाहिजे तुकारामाचं. काय रे चोरा! सावकाराचा पैसा काय मोफतचा आहे वाटतं? तुझ्या पोराबाळांना खायला पैसा पाहिजे. अन् सावकारांच्या पोराबाळांनीं काय हवा खाऊन राहायचं वाटतं? बाकी सावकारांचे चिरंजीव हवा खायला गेले आहेत खरेच. पण त्यांना हवा खायलासुद्धां जबर पैसा लागतो भिकाऱ्या!"

नारायणराव हंसले. देवजी पाटील हंसले. सर्व लोक हंसले; पण दया-

भाई मात्र हंसले नाहीत. तसें म्हटलें तर दयाभाईहि सावकारच होते. पण जसे सर्वच कर्जदार लबाड नसतात तसे सर्वच सावकारहि निष्ठुर नसतात.

शिपायांनीं घरांतलें सर्व सामान बाहेर काढलें.

"अरे या मडक्यांत रे काय आहे!" भिवा शिपाई म्हणाला.

जिवा शिपायानें मडक्यांत हात घातला व त्यांतून फडक्यांत गुंडाळलेल्या तीन भाकऱ्या काढल्या.

"अरे देवा! या तर पोरांच्या भाकरी; अन् या जर गेल्या तर पोरं खातील काय?" भिकाऱ्याची लक्ष्मी ओरडली.

"काय आहे रे गडबड?" नारायणराव म्हणाले, "या भिकाऱ्यानं भाकरी लपवून ठेवल्या होत्या वाटतं? अरे लुच्चा! आणखी काय काय लपवून ठेवलं आहेस रे! दे रे जिव्या त्या भाकरी फेकून. अन् बाकीचीं गाडगीं-मडकीं पहा. तसंच घरांत गव्हाचीं पोती किती आहेत ती मोजून घ्या."

जिवानें भाकरी दूर भिरकावून दिल्या.

"अव माय व ऽऽ......!" भिकाऱ्याची लक्ष्मी ओरडली.

पोरांनीं ओरडून हलकल्लोळ मांडला. भिकाऱ्या मात्र स्तब्ध बसून होता. त्यानें आपलें डोकें दोन्ही हातांनीं दाबून धरलें. सर्व तमासगीर खो-खो करून हंसले. दयाभाईच्या डोळ्यांला मात्र पाणी आलें. सहारा वाळवंटांतसुद्धां मधून मधून एखादें पाण्याचें ठिकाण आढळतेंच कीं नाही!

* * *

दिवसामागून दिवस जात होते. भिकाऱ्या आतां दयाभाईकडे नोकर होता. त्याचीं दोन्ही मुलें ढोरें राखावयाला जात व बायको शहरांत धुणें-भांडीं करी. भिकाऱ्या जन्मानें शेतकरी पण कर्मानें सालदार झाला! नको तें कपाळीं आलें, पण रावांच्या दुनियेंत भिकाऱ्याला विचारतो कोण?

* * *

"नारायणराव—"

"साहेब."

साहेब आपल्याच नादांत होते. कांहीं वेळानें साहेब बोलूं लागले.

"नारायणराव, यंदा आमचा धंदा कांहीं बरोबर नाहीं. वसुली कांहीं होत नाहीं. शेतींतहि पीक नाहीं. तेव्हां मला आतां खर्चांत काटकसर करायला

पाहिजे. आपल्या शेतीच्या लोकांचे अन् इतर दुकानच्या कारकुनांचे पगार मी वीस टक्के कमी करणार आहे. यावर तुमचं काय म्हणणं आहे ?"

"आपलं करणं बरोबर आहे साहेब." नारायणराव खालच्या मानेनं म्हणाले, "सध्यां तर धान्याचे भाव खूपच उतरले आहेत, अन् घरभाडंहि स्वस्त झालं आहे. तेव्हां आपण म्हणतां तेवढे पगार कमी केले तरी कांहींहि हरकत नाही."

"हें एक झाल. आतां येथल्या दुकानच्या खर्चांतहि मी काटकसर करणार आहें. या दुकानांत इतक्या कारकुनांची कांही जरुरी नाही, अन म्हणून मी उद्यां-पासून तुम्हांला रजा देण्याचं ठरविलं आहे. उद्यांपासून तुम्ही कामावर येण्याची कांहीं जरूरी नाही. जा आता येथून तुम्ही."

नारायणरावांच्या डोक्यावर जणूं काय वज्राघातच झाला. खिन्न मनानें नारायणराव तेथून निघून गेले

*  *  *

नारायणराव आपल्या भावाकडे जायच्या तयारीत होते. सामानाची आवराआवर झाली होती. उदास मनानें नारायणराव व लक्ष्मीबाई मोटारची वाट पाहत उभ्या होत्या.

"हें सर्व ठीक झालं खरं," लक्ष्मीबाई म्हणाल्या, "पण दुपारच्या वेळीं मुलांना खायला कांहीं आपल्याबरोबर नाहीं."

"पण आतां करायचं काय ?" नारायणराव उदासपणानें म्हणाले. विनू व वेणू जवळच उभीं होतीं. आपले आईबाप दुःखीकष्टी आहेत तेव्हा त्यांना आपण त्रास देऊं नये हें दोघांनाहि पूर्णपणें कळलें होतें.

भिकाऱ्या व त्याची सारजा आपल्या मुलांना घेऊन त्याच रस्त्यानें जात होती. नारायणरावांना मोटारच्या स्टँडपाशी उभे असलेले पाहतांच भिकाऱ्या त्यांचेकडे गेला.

"दंडवत करतो मालक !" भिकाऱ्या म्हणाला, "आज कुठं गांवाला जातां होय ! कांही जप्तीबिप्ती करायची आहे की काय ?"

"छे रे ! जप्ती कसची घेऊन बसलास भिकाऱ्या ? कुबेरसावकारांनीं मला नोकरीवरून कमी केलं, अन् म्हणून मी आज आपल्या भावाकडे जातां आहें"

" वाईट झाल मालक हें. तुम्ही इमानानं सावकाराची नोकरी केली त्याचं त्यांनीं चीज नाहीं केलं."

" बरं पण बाईजी," सारजा लक्ष्मीबाईशीं बोलत होती, " आज सांजच्या वेळीं तुम्ही घरीं पोंचणार. मुलांना तर मधल्या वेळीं भूक लागेल. तेव्हां बरोबर खायला कांहीं घेतलं असेलच."

लक्ष्मीबाई काय बोलणार ? घरात चिमूटभरसुद्धा पीठ नव्हते. पण सारजाला काय सांगणार ही लाजिरवाणी गोष्ट ? लक्ष्मीबाई कांहींएक बोलल्या नाहीत; पण त्यांचे डोळे मात्र चटकन भरून आले.

सारजा गरीब होती, पण बाई होती. स्त्रीचे हृदय स्त्रीलाच कळणार. सारजानें सर्व ताडलें. नवराबायकोचे थोडेंसे एकीकडे बोलणे झाले.

" मालक," भिकाऱ्या नारायणरावांना म्हणाला, "अधिक-उणं बोललो तर माफी करा—पण लेंकरांच्याकरतां या चार आण्यांचा रस्त्यांत खाऊ घ्या. जशीं माझीं दोन लेंकरं तशींच तुमचीं. गरिबाची इतकी विनंति ऐका."

" अन् बाईजी," सारजा म्हणाली, " तुम्हांला मी म्हटलं असतं, कीं लेंकराना माझ्याजवळच्या भाकरी खाऊं घाला; पण आम्ही कुणबी अन् तुम्ही ब्राह्मण. आमच्या हातचं तुम्ही खाल ? "

" दे ग आयबाई तुझा प्रसाद आम्हाला. आम्हीं तुम्हाला छळलं त्याची फळं आतां भोगतों आहोंत. आतां तुम्ही आमच्यावर प्रेम करतां तेव्हां आम्हांला आतां चांगले दिवस लवकरच येणार म्हणायचे." लक्ष्मीबाई गहिंवरून बोलल्या. तसें म्हटलें तर लक्ष्मीबाई ह्या जुन्या चालीच्या बालबोध बाई. पण आज कुणब्याची भाकरी घ्यायला तयार झाल्या. समाजाची कृत्रिम विषमता दूर झाली, की सर्व मनुष्यप्राण्यांचा धर्म एकच होतो !

" भिकाऱ्या," नारायणराव गद्गद स्वरानें म्हणाले, " भिकाऱ्या, पैशानं भिकारी असशील, पण मनानं मात्र तूं कुबेर आहेस रे बाबा. मी तुझं नुकसान केलं पण तूं मात्र माझं कल्याण करूं इच्छितोस. तूंच खरा ब्राह्मण आहेस भिकाऱ्या."

सर्व मंडळी एका झाडाखालीं बसली. चारी मुलें भिकाऱ्याच्या सारजाने दिलेली भाकरी खात बसलीं. इतक्यांत कुबेर सावकाराची मोटार रस्त्यानें भर्रकन् निघून गेली व चोहोंकडे धूळच धूळ झाली !

—नारायणरावांची मोटार यायची होती !



# तारिणी : : १८

तसें म्हटलें तर तो फारच उत्तम स्वभावाचा मनुष्य होता. परमेश्वरानें त्याच्यावर सर्व तऱ्हेनें कृपा केली होती. एका उच्च व श्रीमान् कुलांत त्याचा जन्म झाला होता. कोणतीहि गोष्ट पाहिजे असें त्यानें म्हटलें तरी ती त्याला मिळण्यासारखी होती. लक्ष्मी व सरस्वती यांचें वैर असतें असें लोक म्हणतात, पण त्याच्या बाबतींत तरी ती म्हण खोटी ठरली होती. तो बुद्धीने फारच सरळ होता. त्याची धारणाशक्ति असामान्य होती कोणतीहि किचकटीची भानगड जरी असली तरी तो आपल्या बुद्धीनें त्यांतून लगेच वाट काढी. शाळेत तो एक अत्यंत बुद्धिमान मुलगा होता, व त्याबद्दल त्याच्या शिक्षकांना त्याचा फार अभिमान वाटत असे. कॉलेजांतसुद्धां त्यानें आपल्या बुद्धिसामर्थ्यानें आपल्या शिक्षकवर्गावर फारच छाप बसविली होती. तर्कशास्त्र व मानसशास्त्र हे त्याचे अत्यंत आवडीचे विषय असत. राजकारणशास्त्राचाहि त्याला फार नाद असे. या विषयांवरचीं बहुमूल्य पुस्तकें त्यानें आपल्या वाचनालयांत ठेवलीं होतीं. या विषयांसंबंधानें वादविवाद करतांना त्याला फार मौज वाटे.

तो चांगला होता, पण त्याच्यांत कांहीं दोषहि होते. तो अगदीं पहिल्या प्रतीचा मुखदुर्बल होता. आपले विचार अत्यंत ओजस्वी भाषेंत तो आपल्या लेखांतून प्रदर्शित करीत असे; व आपल्या आवडत्या विषयांसंबंधीं वादविवादहि करीत असे; पण कोणीहि चार मंडळी जमली म्हणजे तो अगदीं चूप बसावयाचा. तसेंच आपल्या वडिलांचेजवळहि तो कधींच बोलत नसे. वडीलहि नेहमीं आपल्याच धंद्यांत चूर असल्यामुळें त्यांनाहि आपल्या मुलाशीं बोलावयाला वेळ नसे. वडिलांची वकिली फारच जोरांत चालत असे; त्यामुळें त्यांना वर्तमानपत्रें वाचावयालाहि वेळ मिळत नसे.

जेवतांना जो वेळ मिळेल तेवढ्या वेळांत ते टाइम्स वाचीत असत व त्याच वेळीं ते 'हॉब्स' नाहीं तर 'लॉक' यांसारख्या एखाद्या तत्त्वज्ञ लेखकाचा एखादा ग्रंथ वाचीत असे.

त्याचा व त्याचे वडिलांचा अशा तऱ्हेचा क्रम बरेच दिवस चालू होता.

त्याचे वडील श्रीमंत होते. त्यांनीं आपल्या मुलाचे लग्न करावयाचें ठरविलें. श्रीमंताची सून सुंदर असली पाहिजे व तिला एखाद्या कलेचें चांगलें ज्ञान असलें पाहिजे असें त्यांचें मत होतें. कॉलेजांतलें शिक्षण हें निव्वळ पोटार्थी आहे. हें शिक्षण फार तर तुम्हांला एखादी नोकरी मिळवून देईल; पण त्याचे योगानें श्रीमंत समाजांत तुमची चहा कांहीं वाढत नाहीं असें ते म्हणत. श्रीमंतांच्या घरच्या बायका जरी बोलण्यांत चुकल्या किंवा त्यांना चीन व जपान यांचेमधील युद्धांतील सेनापतींची नावें ठाऊक नसलीं तरी फारसें बिघडत नाहीं. इतकेंच नव्हे तर त्यांनी प्रेसिडेंट व्हॉन हिंडेन्बर्गला नेपाळचा राजा जरी बनविलें तरी त्यांना कोणी हंसूं शकत नाहीं असें ते म्हणत. श्रीमंतांच्या बायकांना एखादी कला येत असावी म्हणजे त्यांची 'सोसायटीं'त फारच चहा होते असे ते म्हणत.

आपल्या मुलाकरितां त्यानी अशीच एक मुलगी पसंत केली. त्यानें या विषयासंबंधानें फारसा विचारच केलेला नव्हता; व वडिलांच्याबरोबर या विषयावर वादविवाद करावयाची त्याची ताकदहि नव्हती. वडील आपलें नुकसान करणार नाहींत ही त्याची पुरी खात्री होती.

मुलगी सुस्वरूप आहे व तिला चित्रकला चांगली येत आहे, आणि संगीतांतहि तिची बरीचशी प्रगति आहे याची त्याचे वडिलांनीं अगोदर खात्री करून घेतली. त्यानंतर तिच्या वडिलांनीं एके जागीं बसून लग्नाचे करार करून टाकले. एका सुमुहूर्तावर वाद्यांच्या कडाक्यांत तिचें व त्याचें लग्न झालें.

* * *

ती आपल्या आईबापांची एकुलती एक मुलगी होती. तिचे वडील एक सरकारी अम्मलदार होते. ती स्वरूपानें बरीच सुरेख होती; व आपण सुंदर आहोंत याची तिलाहि जाणीव असावी असें तिच्या थाटावरून लोकांच्या ध्यानांत येई. वडिलांच्या सारख्या बदल्या होत असल्यामुळें तिच्या शिक्षणाचीहि फार हेळसांड झाली होती, व त्यामुळें वयाला अठरा-एकोणीस वर्षें होऊन गेलीं तरी ती मॅट्रिकच व्हावयाची होती. शिवाय मध्यहिंदुस्थानांतील नद्यांचीं नांवें ध्यानांत ठेवण्यापेक्षां तिला गंगाकिनाऱ्याच्या एखाद्या खेडेगांवचें चित्रच काढण्यांत फार मजा वाटे. मोरोपंतांच्या केकावलींतील आर्यांचा अर्थ करण्याचा प्रयत्न करण्यापेक्षां त्या आर्या गोड स्वरानें म्हणण्यांतच तिला सौख्य होई. बाबर,

हुमायून इत्यादि बादशहांची नांवें ध्यानांत ठेवण्यापेक्षा रागदारींची नांवें ध्यानांत ठेवणें तिला फार आवडे.

शाळेतील मास्तरणीना ती फार आवडे. मुली तिच्यावर फारच प्रेम करीत व त्या 'कला' या नावानें तिला हांक मारीत. फुलपांखरासारखें नाचावें, बागडावें, सुंदर सुंदर पोषाख करावेत, गोडशी गाणीं गावीत व मनोरम चित्रें काढावीत असे तिला वाटे. तिच्या वडिलानीहि तिचे कौतुकच केल्यामुळे तिची कलासक्ति दिवसेंदिवस वाढतच गेली.

* * *

तिचे व त्याचे लग्न झाले. सर्वांनी वधूवराचें कौतुक केले. 'जोडा कसा लक्ष्मीनारायणासारखा दिसतो' असे वृद्धजन उद्गार काढूं लागले. 'आहे ऽऽऽ ब्बुवा ऽऽऽऽ' असें म्हणून त्याच्या मित्रांनी त्याच्या पाठीवर थाप मारली. 'नशीबवान आहेस तूं' असे तिच्या मैत्रिणी तिच्या कानांत गुणगुणल्या. 'नान्दा सौख्यभरें' असा वडील माणसांनीं वधूवराना आशीर्वाद दिला. तिच्या व त्याच्या वैवाहिक आयुष्याला सुरवात झाली.

* * *

ती अगदी पहांटे उठून बागेतली फुलें तोडीत होती. या फुलांचा एक सुंदर हार करावयाचा तिचा इरादा होता. फुले तोडता तोडतां उगवत्या सूर्यबिंबाकडे तिची नजर गेली.

"काय सुंदर देखावा हा !" ती म्हणाली, "त्यांना हा देखावा पाहून फारच मजा वाटेल."

तिने त्याला उठविण्याचा प्रयत्न केला.

"निजूं दे ग मला जरा !" तो म्हणाला, "रात्रीं मी त्या जर्नलकरतां एक लेख लिहीत होतों, त्यामुळं निजायला मला फार उशीर झाला आहे. अशी काय एखाद्या लहान मुलासारखं करतेस ?" त्यानें आपल्या तोंडावरून पांघरूण ओढून घेतलें.

तिला वाईट वाटले. "पण पहा तर खरं तो सूर्य कसा लाललाल अन् सुंदर दिसत आहे तो !" ती म्हणाली.

त्यानें उत्तरच दिलें नाही.

ती आणखीच खिन्न झाली. जड पावलाने तिने खोलीच्या बाहेर पाऊल टाकले.

'काय सुंदर दिसतो आहे सूर्य!' ती मनाशीच म्हणाली.

सूर्यबिंबाकडे ती कांही वेळ पाहत होती. नंतर तिनें धांवत जाऊन आपलें चित्र काढण्याचें साहित्य काढलें व ती त्या देखाव्याचें चित्र काढूं लागली.

तो भिजलेलाच होता.

* * *

आणखी दुसऱ्या एका दिवसाची गोष्ट. ती व तो दोघं व्हरांड्यांत चहा घेत होतीं. तो एशियाटिक क्वार्टर्लीमधील राजकारणासंबंधीं एक लेख वाचीत होता

"तो पाहिलात का गुलाब किती फुलला आहे तो?" ती म्हणाली.

त्यानें लक्षच दिलें नाहीं.

"पाहूं या तुमच्या पुस्तकात काहीं चित्रं आहेत का?" तिने विचारलें.

तो कांहीं बोललाच नाहीं

ती चहा पिऊं लागली. तिला मध्येच गावेंसें वाटलें.

"उगिच कां कान्ता गांजितां दासी दीना ऽऽऽ"

आपल्या अत्यंत मधुर आवाजांत तिने पहिली ओळ म्हटली.

त्यानें अत्यंत त्रासिक मुद्रेनें तिच्याकडे पाहिलें.

ती खजिल झाली व तिने आपले गाणे बंद केलें.

त्यानें पुनः आपली नजर पुस्तकाकडे वळविली व आपल्या विषयात तो गढून गेला.

* * *

एके दिवशीं संध्याकाळीं चांदण्यात दोघेहि गच्चीवर बसलीं होतीं.

तो स्वतःशीच हंसला.

"का हंसलांत?" तिनें त्याला विचारलें.

"आज सकाळीच मी 'मनुष्य व जीविताचें ध्येय' या विषयावरचा डॉक्टर हॉल्डेननं लिहिलेला लेख वाचला व त्याचे विचार किती तंतोतंत खरे आहेत हें या वेळीं माझ्या ध्यानांत आलं त्या निबंधांत त्यानं एक विनोदी गोष्ट सांगितली आहे त्या गोष्टीची मला आठवण होऊन हंसूं आलं. जीविताचं ध्येय काय असावं याविषयीं डॉक्टर हॉल्डेननं बराच विचार केला आहे. याच विषयावर एक लेखमाला लिहिण्याचा माझाहि विचार आहे. या विषयासंबंधानं मी माझी टांचणं करून ठेवलीं आहेत. ती टांचणं मी सध्यां इमर्सन कॉलेज_

मधील स्त्री-प्रोफेसर मिस् आगरकर यांचेकडे अवलोकनार्थ पाठविलीं आहेत. त्यांच्याकडून तीं टांचणं परत आलीं म्हणजे मी तुला दाखवीन. बरं, पण आयुष्याचं ध्येय काय असावं असं तुझं मत आहे ?" त्यानें अत्यंत कुतूहलानें तिला विचारलें व आपल्या चष्म्याच्या जाड कांचांतून तिच्याकडे पाहिले.

"आयुष्याचं ध्येय म्हणजे सर्व प्राणिमात्रावर सारखं प्रेम करणं हेंच ना ?" तिनें उत्तर दिलें.

तो निराश झाला.

"अग कसले प्राणिमात्र आणि कसलं प्रेम घेऊन बसली आहेस तूं ? डॉक्टर हॉल्डेन म्हणतो, कीं आयुष्याचं ध्येय म्हणजे फलाची आशा न करतां केलेली समाजसेवा ! याला कोणी जनसेवा असंहि म्हणतात. लोकमान्य टिळकांनीं गीतारहस्यांत असंच सांगितलं आहे. जाऊं दे, तुला यांतलं कांहीएक समजायचं नाही."

तो खिन्न झाला, ती उदास झाली. उदासपणानें तो आकाशाकडे पाहूं लागला, ती खालीं पाहूं लागली. दोन मोठाले अश्रु तिच्या नेत्रांतून पटकन् खालीं पडले.

* * *

तो व ती दोघेंहि प्रोफेसर रमेशन् यांचे व्याख्यानाला गेलीं होती. व्याख्याते फारच विद्वान होते व त्यांच्या व्याख्यानाचा विषयहि त्याच्या आवडीचा होता. व्याख्यानाचा विषय 'ईश्वराचें अस्तित्व' हा होता.

व्याख्यान फारच चांगलं झाले असें त्याचें मत पडलें. व्याख्यानाच्या सुरुवातीला गांवांतील सर्व सरकारी अधिकारी हजर होते. कारण जिल्ह्याचे बडे साहेब त्या दिवशीचे अध्यक्ष होते. सुरुवातीला व्याख्यानाचा हॉल अगदी पूर्ण भरला होता.

व्याख्यान सुरू झालें.

तो अगदीं व्याख्यानांत रंगून गेला. कांहीं वेळानें त्याचे शेजारचे लोक जांभया देऊं लागले. व्याख्यान संपावयाचे वेळीं अर्धा-अधिक दिवाणखाना रिकामा झाला होता. हे सर्व लोक बाहेरील मोकळ्या पटांगणांत हिंडत होते.

व्याख्यान संपलें. प्रोफेसर रमेशन् हे तिच्या श्वशुरांचे व बड्या साहेबांचे मित्र होते. प्रोफेसरसाहेबांनीं सूचना केल्यावरून श्वशुरांचे परवानगीनें तिनें अभंग म्हणावयास सुरुवात केली.

" जेथे जाई तेथें तूं माझा सांगाती—" ती गाऊं लागली.

जांभया देणारे लोक आपापल्या खुर्चीत ताठ उठून बसले, बाहेर गेलेले लोक परत आंत येऊं लागले, पुन्हा दिवाणखाना भरला.

बडे साहेब हे एक सात्त्विक वृद्ध गृहस्थ होते ते आनंदानें डोलूं लागले. प्रोफेसर रमेशन् अगदीं तल्लीन झाले.

" जेथें जाई तेथें तूं माझा सांगाती—"

ती गातच होती. सर्व सभा चित्रासारखी स्तब्ध होती. दिवाणखान्याचें वातावरण तिच्या गाण्यानें पवित्र झालें होतें.

भजन संपल्यावर प्रोफेसर रमेशन् यानी स्वतः तिची स्तुति केली व तिचे आभार मानले.

*　　　*　　　*

" काय विचित्र लोक आहेत ! प्रोफेसरसाहेबांच्या भाषणाच्या वेळी लोकांना कंटाळा आला. ईश्वराच्या अस्तित्वासंबंधानं त्यांनीं किती चागलं विवरण केलं. इतकी तर्कप्रधान विचारसरणी आपण अजून पाहिलीहि नव्हती; पण या लोकाना त्याचं काय ? त्यांना हिचं भजनच आवडलं ! "

तो स्तब्ध बसला.

'हं ! अशाच तऱ्हेनं अजून किती दिवस काढायचे आहेत कुणास ठाऊक ! ' तो स्वतःशीच म्हणाला. रुमालानें त्यानें आपले किंचित् ओले झालेले डोळे पुसले व पुन्हा तो 'शोपेनहार' वाचण्यांत दंग झाला.

*　　　*　　　*

तोहि दुःखी होता.

तीहि कष्टी होती.

दोघेंहि चांगलीं माणसें होती.

दोघेंहि प्रेमळ होतीं.

पण दोघें एकमेकांना योग्य नव्हती असें त्यांना वाटत होतें.

दोघांच्याहिमध्यें असा एकहि विषय नव्हता, कीं ज्या संबंधांत दोघांचेंहि हटकून एकमत व्हावें.

दिवस जातच होते.

कांही दिवसांनीं तिला एक कन्यारत्न झालें.

सर्वांना आनंद वाटला.

" मुलगी अगदीं मातृमुखी आहे बरं का ? फारच गोड आहे पोर." असें शेजारी-पाजारी म्हणत.

मुलगी होती फारच गोड. सर्वांना ती हवीशी वाटे.

तिचा सारा वेळ त्या मुलीचें करण्यांत जाई. नोकरचाकर जरी पुष्कळ होते तरी त्या मुलीचें प्रत्येक काम ती स्वतः जातीनें करी.

मुलीचें नांव होतें तारिणी तिने आपल्या मुलीचे किती तरी फोटो काढले व त्या सर्वांचे एक सुंदर आल्बम बनविले.

दुपारच्या वेळी ती मुलीला तऱ्हेतऱ्हेचे कपडे शिवी. सायंकाळी मुलीला स्वतः लोटगाडीतून फिरावयाला घेऊन जाई. सकाळी मुलीला ती स्वतः न्हाऊं घाली. सारांश, तिचा सारा वेळ मुलीचे करण्यांत जाई.

* * *

" चांदोबा ! चांदोबा भागलास कां ?
निंबोणीच्या झाडाखालीं लपलास कां ?
निंबोणीचें झाड करवंदी ।
मामाचा वाडा चिरेबंदी "

ती म्हणत होती. तारिणी चंद्राकडे पाहून हंसत होती व मध्येच 'बाबाऽबाबा !' असे बोबडे बोल बोलत होती.

तो एका आरामखुर्चीवर बसला होता.

तो उठला व त्यानें मुलीला आपल्याजवळ घेतलें.

" बाऽबा ! बाऽबा !" तारिणी बोलूं लागली.

ती हंसूं लागली.

त्यानें तारिणीचा एक पापा घेतला. तारिणी रडूं लागली.

" अडगुलं मडगुलं—" ती म्हणूं लागली, तारिणी पुन्हा हंसूं लागली.

त्यानें तारिणीला पुन्हा आपलेजवळ घेतलें व तिला 'अडगुलं मडगुलं' करून खेळवूं लागला.

" हा तारूचा फ्रॉक चांगला आहे, नाही ? " तिनें विचारलें.

" होय. कुणी केला आहे हा ? "

" मी ! " तिनें गर्वभरानें उत्तर दिले.

" तारूला किनई बिस्किटं फार आवडतात. अन् गुलाम चाकोलेटकरतां अगदीं हटून बसते."

" असं ! " तो म्हणाला. तिच्या बोलण्यांत आतां त्याला फारच गोडी वाटूं लागली होती.

" फारच गोड मुलगी आहे आपली तारू. त्या सरलाबाईंना तर ही फारच आवडते; अन् तारूला गाण्याचा इतका नाद आहे म्हणतां—" ती अगदी कौतुकानें सांगत होती.

तो अगदी लक्षपूर्वक ऐकत होता व मधून मधून तिला प्रश्न विचारीत होता.

तारिणी मध्येंच बापाजवळ जाई व मध्येंच आईकडे परत जाई व प्रत्येक वेळीं आईबाप तिचे पापे घेत.

* * *

तो व ती आता खूप बोलूं लागलीं त्यांचें बोलणं फक्त तारिणीच बंद करी. बोलण्याचे विषयहि अगदीं साधे असत. तारिणीला बूट कोणत्या दुकानांतून घ्यावेत, तिला ग्लॅक्सो द्यावें किंवा नाही, तिला बिस्किटें कोणती द्यावीत, तिला फ्रॉक कोणता शिवावा या विषयावर तिच्यांत व त्याच्यांत वादविवाद होई व या वादांत बहुतकरून त्याचाच पाडाव होई.

चहाच्या वेळीं वर्तमानपत्रें वाचणे त्यानें सोडून दिले. दुपारी तारिणी-बरोबर तासन् तास तो खेळत बसूं लागला. तारिणीच्या अर्थशून्य बडबडींत त्याला परमानंद होऊं लागला.

छोट्या तारिणीनें तिच्यांत व त्याच्यात उत्पन्न झालेली अढी आपल्या बाललीलांनीं तोडून टाकली.

तो गाण्यांत व चित्रकलेंत लक्ष घालूं लागला व ती त्याच्या वेदान्ती वाद-विवादांत भाग घेऊं लागली.

दोघेंहि आनंदी दिसूं लागलीं. तारिणीवर कोण जास्त प्रेम करतो याची त्याच्यात जणुं काय चढाओढ सुरू झाली. नवराबायकांत तारिणीनें सख्य करवून दिलें म्हणून तो थट्टेनें तारूला 'मिस् कॉम्प्रमाईज' असें म्हणूं लागला.

प्रोफेसर गणेशन् यांचें व्याख्यान होतें. प्रो. रमेशन् हे परमेश्वर आहे असें म्हणणारे होते. प्रोफेसर गणेशन् निरीश्वरवादी होते. प्रोफेसर गणेशन् हे एक अति विद्वान् गृहस्थ होते व ते दांडगे वक्तेहि होते.

* * *

" काय आज व्याख्यानाला नाही कां चलायचं ? " तिने विचारले.

तो तारिणीशी खेळण्यांतच गर्क होता. " छे बुवा---" तो म्हणाला.

" कां बरं ? " तिनें विचारलें.

" कारण अर्थ असलेल्या शब्दांची निरर्थक भानगड ऐकण्यापेक्षां तारूच्या निरर्थक शब्दांचा अर्थ समजून घेण्यांतच मला आनंद वाटतो." तो म्हणाला.

तिने आमली प्रेमळ नजर त्याचेकडे लाविली.

दोघेहि उठलीं व दोघांनीहि तारिणीच्या गालाचे एकदम मुके घेतले.



# पंखावाला : : १९

"चल रामू, लवकर आटप. दहा वाजायची वेळ झाली! किती उशीर हा? उन्हं पहा बरं किती पडलीं तीं. भराभर ताट्या लावा, अन् त्यांच्यावर पाणी टाका. जेवणं झाली की मुलं येऊन बसतील दिवाणखान्यांत. तिथला पंखा तूं ओढ. अन् तिकडे बायकांच्या खोलीचा पंखा तुझ्या बायकोला ओढायला सांग. चल आटोप लवकर."

"होय बाईसाहेब."

रावसाहेब देशमुख हे अनंतपुरांतील एक मोठे सावकार, जमीनदार व रईस होते. वऱ्हाडांतील चारी जिल्ह्यांत त्यांची शेती होती, व त्यांचें देणेंघेणेंहि कांहीं लाखाचे असावे असे लोक म्हणत. लक्ष्मीची जशी रावसाहेबांचेवर कृपा होती तशी सरस्वतीची होती. रावसाहेब हे बी. ए. एल्एल्. बी. होते. ते वकिली करीत नसत. त्यांच्या शेतीचा व सावकारीचा व्यापच मोठा होता. त्यांत त्यांचा बराच वेळ जात असे. रावसाहेबांनी को ऑपरेटिव्ह सोसायट्यां-संबंधीं विशेष अभ्यास केला होता व ते तेथल्या पेढीचे अध्यक्ष होते; या त्यांच्या कामगिरीवर खूष होऊन सरकारनेंहि त्यांना रावसाहेब ही पदवी देऊन त्यांचा गौरव केला होता

रावसाहेब हे सर्व बाजूंनीच सुखी होते. रावसाहेबांना एक मुलगा व एक मुलगी अशीं दोनच अपत्यें होती. रावसाहेबाच्या पत्नीहि त्यांना अनुरूप अशाच होत्या. त्यांचे माहेर तिकडे भोर संस्थानांत होतें. त्यांचे वडील तिकडील एक मोठे सरकारी अधिकारी व जमीनदार होते. आपल्या मुलीला प्रवेशपरीक्षेपर्यंत शिक्षण देऊन नंतर त्यांनीं तिचा रावसाहेबांशी विवाह करून दिला होता. लहानपण संस्थानांत गेल्यामुळें व सासरींहि गजान्त लक्ष्मी नांदत असल्यामुळें रावसाहेबांच्या पत्नी थोड्याशा हेकेखोर व गर्विष्ठ होत्या. बाकी इतर बाबतींत मात्र त्या फारच चांगल्या तऱ्हेनें वागत. अनंतपुरांत रावसाहेब शंकरराव देशमुख व त्यांच्या पत्नी सौ. पार्वतीबाई देशमुख बहुतेक प्रत्येक सार्वजनिक चळवळींत भाग घेत असत व यांना गांवांतील लोक कौतुकानें 'शंकरपार्वतीचा अवतार' असें म्हणत.

एप्रिल महिन्याचे दिवस होते. वऱ्हाडांतला उन्हाळा तो. दुपारच्या वेळी सारी धरणी कशी तापून जावयाची. श्रीमंत लोकांचे घरी ताट्या लागत होत्या व पखे चालू होते. गरिबांना पंखेवाल्याच्या नोकऱ्या मिळत असल्यामुळें तेहि खुष होते.

पार्वतीबाई आपल्या पंखेवाल्याला हुकूम सोडीत होत्या. मुलांची व आपल्या पतीची गैरसोय होऊं नये म्हणून त्या फारच दक्ष असत.

* * *

रामूनें ताट्या लावल्या व त्यांवर वरेंचसे पाणी शिपून त्या गार करून ठेवल्या. माठांत पाणी कमी पडेल असे वाटून पाण्याची कावड घेऊन तो विहिरीवर गेला.

रावसाहेबांचें जेवण झाले होते. हात धुऊन सहज ते व्हराड्यात उभे होते. पार्वतीबाईनीं दिलेला गोविंदविडा चघळीत ते रस्त्याकडे पाहत उभे होते.

" फारच उकाडा आहे नाही, आज ? अंगाची कशी काहिली होते आहे. चलायचं ना आंत ? " पार्वतीबाई म्हणाल्या.

रावसाहेब सडकेकडे पाहत होते.

रामूची बायको सीता आपल्या छोट्या लहूला घेऊन बंगल्याकडे येत होती. लहूचे पाय भाजूं नयेत म्हणून तिने त्याला कडेवर घेतले होतें व त्याला ऊन्ह लागूं नये म्हणून तिने त्याच्या डोक्यावरून आपला पदर घातला होता. बाहेरची गंमत पहावी म्हणून लहू पदराबाहेर तोंड काढून पाहत होता.

लहूला रामू विहिरीकडे जातांना दिसला.

" मा, तो पहा बाबा."

लहू ओरडला व हंसूं लागला.

सीतानें रामाला पाहिले. तिचे डोळे हंसूं लागले. तिचे पाय आपोआप विहिरीकडे वळले.

" बाबा ! " लहू पुन्हा ओरडला व त्यानें रामूच्या अंगावर झांप टाकली.

रामूनें आपली कावड चटकन् खालीं ठेवली व सीताजवळून लहूला आपल्या कडेवर घेतलें.

" सीता, आज तूं यायला उशीर केलास ! बाईसाहेब रागावतील ना ? " रामू म्हणाला.

" पण मी तरी काय करूं ? " सीता आर्जवी स्वरानें म्हणाली, " लहूला

पाहिजे होती कांद्याची चटणी; अगदीं हट्टनच बसला तो. मग रखमाबाईच्याकडनं कांदा आणला अन् चटणी केली तेव्हां जेवला तो. म्हणून झाला मग थोडा उशीर. अगदी हटवादी आहे तुमचा मुलगा ! ”

सीतानें रामूकडे पाहिले, रामूने सीताकडे पाहिले, दोघांनी लहूकडे पाहिले. रामू पटापट लहूचे मुके घेऊं लागला. सीता गर्वभरानें आपल्या पतीच्या प्रेमळ मुखाकडे पाहूं लागली. सीतेच्या समाधानी डोळ्यांत साऱ्या जगातलें सुख साठवून ठेवलें आहे असें रामूला वाटूं लागलें.

सूर्य खूपच तापला होता. जमीनहि तापली होती. पण लहू, रामू व सीता ह्या तिघाना त्या गोष्टीची दादहि नव्हती. आपल्याच आनंदांत तिघेहि निमग्न होती.

गरिबांच्या कष्टी संसारात असे सुखाचे क्षण किती तरी थोडे असावयाचे.

रावसाहेब व्हरांड्यातून हें दृश्य पाहत होते. पार्वतीबाईहि पाहत होत्या. रावसाहेबांच्या मनांत खळबळ सुरू झाली. पार्वतीबाईना त्याचे कांहीच वाटले नाही. नाहीं म्हणावयाला त्यांना रामूचा थोडासा राग मात्र आला.

“ काय मेली चहाटळ माणसं आहेत ही ! ” पार्वतीबाई म्हणाल्या, “ भर रस्त्यावर अन् मालकाच्या समोर पाचकळपणा करीत उभीं राहिली आहेत ही ! मेल्यांना लाजा तरी कशा नाहींत म्हणतें मी.”

रामूचं वागणं व सीताचें पाहणे पार्वतीबाईना गैर वाटलें. रावसाहेबांना मात्र त्याचा निराळाच अर्थ वाटला.

एकच गोष्ट होत होती. पण पार्वतीबाईना ती गैर वाटत होती आणि रावसाहेबांना त्यांत ‘खरें सुख’ दिसत होते.

रामूला व सीताला मात्र यांपैकीं कशाचाच पत्ता नव्हता. ती दोघेंहि आपल्याच आनंदांत गर्क होती.

“ रामू, चल आटप लवकर. पाणी आण कीं ताटीकरतां ! ” पार्वतीबाई व्हरांड्यांतून ओरडल्या.

रामूनें आपल्या बाईसाहेबांचा आवाज ऐकला. तो लाजला, सीताहि लाजली. लहूचा आणखी एक मुका घेऊन त्यानं त्याला सीताजवळ दिलें. सीतानेंहि त्याला पटकन् आपल्या पदराखाली झांकून घेतलं, व झपझप पावलें टाकीत ती बंगल्याकडे येऊं लागली. आपली कावड खांद्यावर टाकून रामू विहिरीकडे गेला.

पार्वतीबाई घरांत गेल्या. रावसाहेबांनीं एक सुस्कारा टाकला व तेहि परत बंगल्यांत गेले. त्यांना आज लवकरच बँकेंत जावयाचें होते.

पंखे चालू झाले. ताट्यांवर पाणी पडूं लागलें. दिवाणखान्यांत रावसाहेबांची मुलें बसलीं. बायकांच्या खोलीत पार्वतीबाई पडल्या. दिवाणखान्यांत मुलें पत्ते खेळत होतीं. बायकांच्या खोलींत पार्वतीबाई यशवन्ताचा नवीन अंक वाचीत पडल्या होत्या. ताट्यांवर सारखे पाणी पडत असल्यामुळें व पंखे सारखे चालू असल्यामुळें बंगल्यांत खूपच गारवा होता.

बाहेरील व्हरांड्यांत रामू व सीता पंखे ओढीत होतीं. व्हरांड्यांतली फरशी फारच तापली होती. म्हणून दोघेंहि दोन लांकडी पेट्यांवर बसून पंखे ओढीत होतीं. छोटा लहू सीतेच्या जवळच एका पोत्यावर पडला होता व त्याला झोंपहि लागली होती. मधूनमधून आपल्या फाटक्या सदऱ्यानें रामू त्याचा घाम पुशीत होता.

"अरे, इथं रे काय लहू निजला आहे?" छोटा गजानन (रावसाहेबाचा मुलगा) म्हणाला. सहज म्हणून तो जरा वेळ व्हराड्यात आला होता. कुमुद आंत मेकॅनो लावीत होती.

"असूं द्या मालक त्याला इथंच; चांगलं थंड आहे की इथं!" रामू म्हणाला.

"अरे, वा रे वा!" गजानन म्हणाला, "माझे इथं भाजताहेत पाय, अन् तूं लहूला इथं खुशाल निजविला आहेस! चल त्याला आत घेऊन अन् निजव त्याला दिवाणखान्यांत."

"पण मालक," रामू बोलूं लागला. त्याचा घसा अगदी दाटून आला होता.

"कांहीं बोलूं नकोस तूं रामू" 'मालक' बोलले, "आम्ही जर असे बाहेर बसलों तर आमच्या पपाना तें आवडणार नाही. अन् लहू असा उन्हांत निजला आहे त्याचं तुला कांहींच वाटत नाहीं? तूं दुष्ट आहेस रामू!"

गजानन लहान होता. विषमतेची त्याला अजून संवय झालेली नव्हती. देवाची विचारसरणीच फक्त त्याला समजत होती. मानवी अर्थशास्त्र अजून त्याला समजलें नव्हतें, आणि व्यवहार तर त्याला मुळीच कळत नव्हता.

आपल्या मालकासंबंधानें रामूला फारच आदर वाटला. पण लहूला दिवाणखान्यांत नेऊन ठेवावा असें मात्र त्याला वाटेना. शेवटीं धाकट्या

मालकांनीं त्याला फारच दटावल्यामुळें त्यानें लहूला दिवाणखान्यांत एका कोपऱ्यांत निजविलें.

" गजू, लहूला इथं काय आणलास ? आई राग नाहीं का भरणार ?" कुमुद म्हणाली.

" मग व्हरांड्यांत त्याला ऊन नाही लागत वाटतं ?" गजूनें उत्तर दिलें. बहीणभावांचं बोलणं तेवढ्यावरच थांबलें.

" लहू कुठं गेला इथून ?" सीतेनें रामूला कांहीं वेळाने विचारलें.

" धाकट्या मालकांनी त्याला दिवाणखान्यांत नेला आहे." रामूनें उत्तर दिलें.

" अन् तुम्ही त्याला नेऊं दिला आंत ?" सीता म्हणाली, " अन् आतां बाईसाहेब म्हणतील तरी काय ? धाकटे मालक कांहींहि म्हणाले, पण तुम्हांला तरी कांही तरी हें वाटायला पाहिजे होतं कीं नाहीं ?"

रामू कांहींच बोलला नाही. तो सुधारक नव्हता. पण या वेळी आपल्या बायकोला उलट उत्तर देऊन तिला चूप बसवावे असें त्याला कांही वाटलें नाही.

पुन्हां पंखे सुरू झाले, बाईसाहेबांना झोंप लागली. मुलेंहि कांहीं वेळानें झोंपीं गेलीं.

मोटारचा पों पों असा आवाज झाला. शंकरराव आपले मित्र भास्करराव यांचेबरोबर बंगल्यावर परत आले.

मंडळी दिवाणखान्यांत आली. शंकररावांची दोन मुलं गालिचावर निजलेलीं आहेत व तेथें जवळच हातपाय पोटाशी घेऊन लहूहि निजला आहे असें त्यांना दिसून आलें.

शंकरराव व भास्करराव दोघेहि हंसले.

" आमचा गजू अगदीं पूर्ण डेमोक्रॅट आहे भास्करराव !" शंकरराव म्हणाले, " अन् मला त्याचा अभिमानहि वाटतो."

देवरामनें सरबताचे तीन पेले दिवाणखान्यांत आणून ठेवले व त्याचे पाठोपाठ पार्वतीबाईहि दिवाणखान्यांत आल्या.

" हें काय ? लहू का इथं निजला आहे ?" पार्वतीबाईनीं आंत येतांच म्हटलें, " इश्श ! याला दिवाणखान्यांत कुणी निजविला ?"

" आपल्या चिरंजीवांनीं बरं का !" शंकररावांनी उत्तर दिलें.

" गजूचं का काम हें ?" पार्वतीबाईंनी आपल्या मानेला एक हिसडा दिला व म्हणाल्या, " हं-हं ! वडिलांचाच धडा गिरविताहेत चिरंजीव ! "

" असूं दे, असूं दे." शंकरराव हंसत हंसत म्हणाले, " आतां लोकशाहीच्या काळांत श्रीमंत लोकांनीं असंच वागलं पाहिजे."

तिघांनींहि सरबत प्यावयाला सुरवात केली

" बाकी भास्करराव," शंकरराव म्हणाले, " मला एका गोष्टीची दिवसं-दिवस फारच खंत वाटते आहे. उन्हाळा फार होतो म्हणून आम्हीं ताट्या लावाव्यात व पंखे सारखे चालू ठेवून त्या गारव्यांत मोठ्या मजेनं काळ कंठावा, व त्याच वेळीं आमच्या नोकरानी भर उन्हांत व्हंगाड्यात बसून गरम झळा चालू असतांना, उन्हानं जमीनदेखील तापलेली असताना सर्व दिवसभर पंखे ओढीत बसाव ही गोष्ट मला कशीशीच वाटते आमच्या असल्या उद्दाम वागणुकीनं आम्ही श्रीमंत लोक मनुष्यत्वाचा अपमान करीत आहोंत असं मला वाटतं. आणि एक वेळ मनुष्याला पोटाला दिलं नाही तरी चालेल पण त्याच्या मनुष्यत्वाचा असा अपमान करणं, व तोहि जाणूनबुजून करणं हें अगदी अक्षम्य पाप आहे असं मला वाटतं ! "

" हां, हां ! शंकरराव," भास्करराव म्हणाले, " तुम्ही तर अगदी कल्पनासाम्राज्यात स्वतःला विसरूनच गेलांत कीं ! अहो, सध्यांच्या अर्थशास्त्र-प्रधान समाजरचनेत या गोष्टी चालावयाच्याच. सध्यांची समाज-व्यवस्था ही समाजांतील व्यक्तींच्या सहकार्यावर उभारलेली आहे. प्रत्येक माणसानं आम्ही गव्हर्नरच झालों पाहिजे असं म्हणून चालायचं नाही. ज्या परिस्थितीत आपण राहतों आहोंत व वाढलों आहोंत त्या परिस्थितींत जें काम आपल्याला करता येत असेल व मिळत असेल तें काम प्रत्येक व्यक्तीनं केलं पाहिजे. आतां समजा, शंकरराव, उद्या तुम्ही रामूची कींव येऊन स्वतःच पंखा ओढीत बसलात, किंवा स्वतःचीं कामं दुसऱ्याला सांगायचीं नाहीत म्हणून आपलीं सर्व कामे स्वतःच करीत बसलांत तर त्यातच तुमचा सारा वेळ जाईल आणि मग तुम्ही सध्यां जीं कांहीं सार्वजनिक कामं करीत आहांत तीं कांहीं तुमच्याकडून व्हायचीं नाहींत. त्या योगानं तुम्ही आपल्या समाजाचं जाग्त नुकसान नाहीं का करणार ? "

" मला तुमची ही शास्त्रीय भाषा बरोबर कळत नाहीं. भास्करराव, श्रमविभाग बरा हें मला पटतं; पण मीच काय म्हणून बँकेचं काम करावं व

रामूनं काय म्हणून नेहमी पंखा ओढावा हें मला समजत नाही." शंकरराव म्हणाले

तिघांनीहि सरबताचे पेले खाली ठेवले व देवरामने ते उचलूनहि नेले.

भास्कररावांनी आपलें तोंड पुसलें व आपल्या लांब मिशावरून एकदा हात फिरविला.

" समाजाची अशी इच्छा नाही शंकरराव, की प्रत्येक माणसाला एकच काम करणं भाग पडावं. सध्याच्या काळात आपल्या अवलोकनात अशी परिस्थिति येते आहे हें खरं, पण तो सध्याच्या अशास्त्रीय समाजरचनेचा परिणाम आहे. यापुढं प्रत्येक सरकार जितकं जितकं जास्त Socialist बनत जाईल तितकी तितकी ही परिस्थिति बदलत जाईल. लोकसत्तेच्या काळात प्रत्येक माणसाला रुचेल तो व पचेल तो उद्योग करण व त्याला अवश्य तें शिक्षण संपादन करणं शक्य आहे. पुढे काय होणार आहे तें मला समजत नाही. दुसऱ्यानं आजच्या परिस्थितीत कस वागावं हेंहि मला कदाचित् सांगता येणार नाही. पण जी गोष्ट अनीतिकारक आहे ती गोष्ट शास्त्रीय बोजड शब्दांत सांगितली म्हणजे नीतिकारक होते असं मला वाटत नाही. आपण स्वतः पंख्यांत बसायचं व आपल्याचसारखा दुसरा एक मनुष्य उन्हात सारखा पंखा ओढीत राहावयाचा ही गोष्ट मला कशीशीच वाटते. मला वाटतं या योगानं आपण त्या पंखेवाल्याच्या मनुष्यत्वाचा उपमर्द करीत आहोंत. आणि अशा तऱ्हेचा मनुष्यत्वाचा उपमर्द करून मी जरी जगाच्या संपत्तींत लाखो रुपयांची भर घातली तरी त्या योगानं मला समाधान वाटायचं नाही." शंकरराव म्हणाले.

भास्करराव हंसले. पार्वतीबाई हंसल्या.

" काय बाई बोलणं तरी हें ? अहो, पंखेवाल्यांनी जर पंखा ओढावयाचा नाहीं तर काय मालकानीं तो ओढावयाचा ? अन् रामून जर पंखा ओढला नाही तर तो उपाशी मरेल त्याची काय वाट ? " पार्वतीबाई म्हणाल्या.

" मला वाटतं ज्यांत अकलेचं मुळीच काम नाही ती सर्व कामं यंत्राकडून करून घ्यावींत." शंकरराव म्हणाले.

इतक्यांत बाहेर मोटारचें शिंग वाजले व हा अर्थशास्त्रीय वाद तेथेच थांबला.

विजेचे दिवे लागले. रस्त्याने मिणमिण जळणारे दिवे जाऊन त्या ठिकाणीं बिनधुराचे व लख्ख प्रकाश पाडणारे विजेचे दिवे आले. गांवांत वीज

आल्यावर मग श्रीमंत लोकांनीं आपापल्या बंगल्यांतून विजेचे पंखे घेतले यांत काय आश्चर्य ?

शंकररावांच्या बंगल्याजवळ होर्मसजींचा बंगला होता. शंकररावांनीं व होर्मसजींनीं दोघांनीहि आपल्या घरीं विजेचे पंखे घेतले. " बऱ्या साहेबांच्या घरांत विजेचे पंखे असतात मग आपल्या बंगल्यांत तसे नकोत कीं काय ? आपण काय साहेबलोकांचेपेक्षां कमी दर्जाचे लोक थोडेच आहोंत ? " ही होर्मसजींची विचारसरणी.

मनुष्यांतील मनुष्यत्वाचा अपमान आपल्या हातून होऊं नये म्हणून शंकररावांनीं विजेचे पंखे घेतले. श्रीमंतांच्या बंगल्यांतून विजेचे पंखे असावयालाच पाहिजेत म्हणून शंकररावांच्या म्हणण्याला पार्वतीबाईनीं अत्यंत आनंदानें सम्मति दिली.

विजेचे पंखे आले, त्यामुळें मोठ्या पंख्यांचें कामच राहिले नाहीं. याचा परिणाम रामू व सीता यांच्या नोकऱ्या सुटण्यांत झाला.

पुन्हा उन्हाळा आला. शंकररावांच्या बंगल्यांत विजेचे पंखे गरगर सुरू झाले. ताट्यांवर पाणी पंपानें घरांतल्याच मंडळींनीं टाकीत जावें अशी शंकररावांची इच्छा असे.

शंकरराव व पार्वतीबाई अशी दोघें दिवाणखान्यांत बसली होती. मुलें जवळच झोंपलीं होती.

" माझ्या हातून रामूच्या मनुष्यत्वाचा आतां उपमर्द होत नाही ही किती चांगली गोष्ट आहे ? " शंकरराव मनांत म्हणाले.

वर पंखे सारखे गरगर फिरत होते. थंड वारा सारखा चालला होता.

अगदीं त्याच वेळीं रामूच्या लहानशा खोलीत रामू खिन्नपणानें बसला होता. जवळच्या एका फटकुरावर लहू निजला होता. जवळच सीताहि नुसती पडली होती.

रामूला सध्यां नोकरी नव्हती. काळजीमुळें सीता व रामू दोघेंहि वाळलीं होतीं.

जितकीं यंत्रें जास्त होतील तितका मनुष्याला बाकीचीं कामें करावयाला वेळ मिळेल, हें अर्थशास्त्रीय तत्त्व रामूला समजत नव्हतें.

त्याला प्रश्न असा होता, कीं इतका रिकामा वेळ आहे त्याचें काय करावयाचें ?

उन्हांत पंखा ओढीत बसणारा रामू सुखी होता. आपल्याला पंखा ओढावयाला लावून आपला कोणी उपमर्द करीत आहे असें त्याला स्वप्नांतहि कधीं वाटलें नाहीं.

आपल्यांला नोकरी नाहीं याची मात्र त्याला फारच खंत वाटत होती. लहूचे व सीताचे हाल मात्र पाहवत नव्हते.

" मालकांनीं पाठीवर मारलं असतं तर चाललं असतं, पण पोटावर त्यांनीं मारायचं नव्हतं." सीता म्हणाली.

भर उन्हांत लहूचे लाड करीत असतांना सीता व रामू अगदी आनंदांत होतीं व आज सावलीत असूनसुद्धां तीं दुःखी होतीं.

शंकररावांना वाटत होतें, कीं रामूचा पंखा बंद करून आपण त्याच्या मनुष्यत्वाचा सन्मान करीत आहोंत.

रामूला मात्र वाटत होतें, की पोटाला मिळविण्याचीसुद्धां भ्रान्त पडणें यासारखी दुसरी कोणतीहि वाईट गोष्ट नाहीं.

शंकरराव व पार्वतीबाई या दोघांनाहि झोंपा लागल्या होत्या. बंगल्यांतले विजेचे पंखे गरगर फिरत होते.

रामू व सीता दोघेंहि आपल्या खोलींत पडलीं होतीं. दोघांनाहि पराकाष्टेची काळजी लागलेली आहे असें त्यांच्या चेहऱ्यावरून दिसत होते. रामूच्या खोलींत उन्हाच्या गरम झळया मात्र सारख्या येत होत्या.



## लांच्छित चंद्रमा : : २०

आमच्या अप्पासाहेबांचा सारखा आग्रह, कीं तुम्ही आमच्या गांवी दोन-चार दिवसांच्या सवडीनें तरी या. तसें म्हटलें तर अप्पासाहेबांची व माझी कॉलेजांतील ओळख. एकाच बोर्डिंगांत आम्ही दोन वर्षें होतों. अप्पासाहेब हे गर्भश्रीमंत असून हुशार होते. माझ्या बाबतींत लक्ष्मी व सरस्वती या दोघींचीहि माझ्यावर फारशी मेहेरबानी नव्हती. त्यामुळें मी कसा तरी ढकलपास बी. ए. झालों व त्यानंतर एका तालुक्याच्या गांवीं मोठ्या प्रयत्नानें व शिफारशीनें भास्तरकीची जागा मिळवली. माझे शिक्षणप्रसार करावयाचे पवित्र कर्तव्य खूप जोमानें सुरू केलें. अप्पासाहेबांची शेतीवाडी बरीच होती व म्हणून अप्पासाहेबांनीं बी. ए. झाल्यावर वकिलीचा राजमान्य व लोकमान्य पेशा न पत्करतां आपल्या शेतीचाच धंदा त्यांनी हातीं घेतला. याच गांवीं अप्पासाहेब मला बोलावीत होते.

अप्पासाहेब सोनगांवांत राहत असत. खुद्द सोनगांव जरी खालशांत होतें तरी सोनगांवच्या आसपास बाबासाहेब सुविचारे यांची बरीच मोठी जहागीर होती. खुद्द सुविचाऱ्यांचा टोलेजंग वाडा सोनगांवांतच होता. बाबासाहेब सुविचारे हे इंग्रजी अंमलाच्या सुरवातीचे पट्टीचे सुधारक होते. कै. आगरकरांना ते गुरु समजत. आपल्या जहागिरीच्या गावातून त्यांनी कांहीं शाळा आपल्या खर्चानें चालविल्या होत्या, व एक दोन दवाखानेहि गरीब लोकांचेकरतां काढले होते. येत्या जात्या अधिकाऱ्याला पार्ट्या देण्यांत बाबासाहेबांचा बराच पैसा खर्च होत असे. पण बाबासाहेबाचीं सारीं कुळेंसुद्धां त्यांच्या दयाळूपणामुळें त्यांच्यावर फार खुष असत.

कट्टे समाजसुधारक व गरिबाचे कनवाळू म्हणून लोक बाबासाहेबांना मान देत व सरकारदरबारींहि त्यांचें वजन असे.

सर्व कांहीं व्यवस्थेशीर चाललें होते. बाबासाहेबांचें कुटुंब ते पसतीस वर्षांचे असतांना निवर्तलें. वय फार झालेलें नाहीं, शरीरप्रकृति उत्तमपैकीं, स्वभाव मंडळींतला व पैसा भरपूर; आणि अशा सर्व गोष्टी अनुकूल असल्यामुळें बाबासाहेबांना पुनर्लग्न करण्याचा चोहोंकडून आग्रह होऊं लागला. त्यांतल्या त्यांत

बाबासाहेबांना मुलींच मूलबाळ नसल्यामुळें तर बाबासाहेबांचे आप्तइष्ट सर्वच त्यांना पुनर्लग्न करण्याची गळ घालूं लागले. एखाद्या विधवेशीं पुनर्विवाह करून एका पंकांत रुतलेल्या गाईला सनाथ करण्याचें पुण्य बाबासाहेबांनी घ्यावें असें सुधारकांचें म्हणणें पडलें. त्याचप्रमाणें मोठ्या वाढलेल्या मुलींचे कांहीं इष्टमित्र हें स्थळ जमलें तर बरें असें समजून त्याप्रमाणें दुरून दुरून सूचना करूं लागले.

बाबासाहेब मात्र कोणाच्याच आग्रहाला बळी पडले नाहींत. त्यांचा एक भाचा ( त्यांच्या मृत बहिणीचा मुलगा ) त्यांनीं आपल्याजवळ आणून ठेवला; व आपल्या मागें त्यालाच आपण आपल्या इस्टेटीचा मालक करणार असें ते म्हणूं लागले.

याहि गोष्टीला अठरा वर्षे होऊन गेलीं होतीं. आम्हांला बाबासाहेबांची माहिती आमच्या वडील मंडळीकडूनच कळलेली. बाबासाहेबांच्याविषयीं आम्हा तरुण मंडळींना फार आदर वाटत असे. त्यांना आम्ही आमच्या कॉलेजमधील सम्मेलनांत अध्यक्ष म्हणूनहि एके वर्षी बोलाविलें होतें. याच वर्षी एक अघटित घटना घडून आली. बाबासाहेबांनी आपल्या त्रेपन्न-चौपन्नाव्या वर्षी कुणाला-हि न कळवितां आपलें पुनर्लग्न उरकून घेतलें. त्या वेळीं त्यांची वधू सारी वीस वर्षांची अल्लड बाला होती. बाबासाहेबाचे कारभारी मोरोपंत यांची ती मुलगी. मुलगी देखणी होती पण शिकलेली मुळींच नव्हती. बाबासाहेब या उतार वयात अशा तऱ्हेनें एका वीस वर्षांच्या मुलींबरोबर लग्न करतील असें कोणालाहि वाटलें नव्हतें; बाबासाहेबाच्या या लग्नावर चोहोंकडून टीका होऊं लागली. इतक्यांत लग्नानंतर तीनच महिन्यांनीं बाबासाहेबांना पुत्ररत्नाचा लाभ झाल्याचें लोकांना कळल्यामुळें तर बाबासाहेब हा संभावितपणानें वावरणारा एक पापी गृहस्थ आहे असेंसुद्धां लोक म्हणूं लागले. एके काळीं लोकप्रिय असणारे बाबासाहेब लोकांच्या द्वेषाचा व तिरस्काराचा एक विषय होऊन बसले.

बाबासाहेबांनीं यानंतर सर्व सामाजिक चळवळींतून अंग काढून घेतलें, व त्यांनीं तसें केलें याबद्दल कोणालाहि वाईट वाटलें नाहीं. बाबासाहेब आपलें आयुष्य एकान्तांतच घालवूं लागले. लोक मात्र म्हातारा आतां फारच रंगेल झाला आहे असें म्हणूं लागले.

* * *

सहाच महिन्यांपूर्वी बाबासाहेब वारले होते. बाकीच्या साऱ्या तरुणांप्रमाणे मलाहि बाबासाहेबांविषयीं तिरस्कार वाटत असे; व इतके दिवस मी अप्पासाहेबां-

च्या गांवीं न जाण्याचें कारण मला कदाचित् अप्पासाहेब बाबासाहेबांना भेटवितील अशी भीति वाटत होती हें होय. अप्पासाहेबांच्या वडिलांची व बाबासाहेबांची अगदीं जानी दोस्ती होती, व अप्पासाहेबांच्या घरीं गेल्यावर बाबासाहेबांची भेट टाळणें अशक्य होतें. आतां बाबासाहेब वारलेहि होते, व अप्पासाहेबांचा सारखा आग्रहहि चालला होता म्हणून मी अप्पासाहेबांच्या सोनगांवीं नाताळच्या सुटींत गेलों.

* * *

एके दिवशी संध्याकाळीं मी व अप्पासाहेब फिरावयाला गेलों होतों. बऱ्याच लांब अंतरावर गेल्यावर आम्ही एक मोकळी जागा पाहून तेथें बसलों. अप्पासाहेबांची व माझी अगदीं जानी दोस्ती असल्यामुळें आम्ही निरनिराळ्या विषयांवर बोलत होतों. इतक्यांत एक अगदीं कोरी करकरीत ब्यूक गाडी गांवाकडून आली व आमच्यापासून थोड्या अंतरावर सडकेच्या बाजूला थांबली. गाडीतून एक वीस-पंचवीस वर्षांच्या दिसणाऱ्या तरुण विधवा बाई, एक चार-पांच वर्षांचा सशक्त असा मुलगा व एक कुणबीण इतकीं माणसें उतरली. त्या बाई मुलाचे बोट धरून चालूं लागल्या. मुलगा तर सारखा दंगामस्ती करीत होता, व आपल्या आईला सारखा त्रास देत होता.

मायलेंकरांची ही लीला पाहून मला फार कौतुक वाटले.

"कोण हो अप्पासाहेब ह्या बाई, अन् मुलगा तरी किती अचपळ आहे हा?" मीं विचारले.

अप्पासाहेब हंसले.

"ह्या बाई कै. बाबासाहेब सुविचाऱ्यांचं दुसरं कुटुंब व हा त्यांचा मुलगा." अप्पासाहेबांनीं मला उत्तर दिलें.

"बाबासाहेब सुविचाऱ्यांचें कुटुंब? म्हातारपणीं लग्न करून एका तरुणीचा केसानं गळा कापणारा थेरडा? स्वतःला सुधारक म्हणवून तरुणींच्या असहाय परिस्थितीचा फायदा घेऊं पाहणारा वेरड?" मी रागानें म्हणालों. बाबासाहेबांच्या पुनर्लग्नाची बातमी आम्ही आमच्या गांवींच ऐकली होती, व तेव्हांपासून माझें बाबासाहेबांच्याविषयीं फारच वाईट मत झालेलें होतें.

"हो! हो! हो!" अप्पासाहेब म्हणाले, तुमच्या अंगांत तर नुसता सुधारकच संचारलेला दिसतो आहे. बापूराव, इतक्या घाईनं आपलीं मतं बनवूं नका. जुन्या चालीचे लोक पूर्वी सर्व दोष बायकांचेवर टाकीत, आतां तुम्ही

नवीन मताचे लोक तितक्याच निर्दयतेनं पुरुषांना नांवं ठेवतां, दोघेहि सारखेच दोषी. बापूराव, बाबासाहेबांच्या लग्नाच्या बाबतीतलं सत्य समजून घ्यायची तुमची तयारी आहे का?"

"होय. सांगा मला खरी गोष्ट काय आहे ती. पण एवढं ध्यानांत ठेवा अप्पासाहेब, कीं तुमची बाबासाहेबांची तरफदारी मला मुळींच कबूल नाही." मीं उत्तर दिले.

"बापूराव, बाबासाहेबांचे श्वशूर मोरोपंत येथून दहा कोसांवर भोनगांवीं राहतात, त्यांच्या बोलण्यावर तुमचा विश्वास बसेल का?" अप्पासाहेबांनीं विचारलें.

"कां नाही बसणार?" मी म्हणालों, "आपल्या मुलीचा गळा कापणाऱ्या वृद्ध कपीची तरफदारी मोरोपंत कधीहि करणार नाहींत." मी ठांसून उत्तर दिलें.

त्या दिवशींचें आमचें बोलणें येवढ्यावरच थांबलें. दुसऱ्या दिवशीं संध्याकाळीं मुद्दाम वेळ काढून अप्पासाहेबांच्या घमनींतून आम्ही भोनगांवीं मोरोपंतांच्या घरी जावयाला निघालों.

भोनगांव हें बाबासाहेब सुविचाऱ्यांच्या जहागीर गांवांपैकीं एक होतें. गांव खेडेंच पण टुमदार दिसलें. गांवांतले आंखलेले रस्ते, कोपऱ्यावर लावलेले कंदील, स्वच्छ विहिरी, शाळा व पोस्ट-ऑफिस वगैरे गोष्टी पाहून माझें भोनगांवाविषयीं फारच चांगलें मत झालें.

एका लहानशा टुमदार घरापुढें आमची गाडी थांबली. पाहुणे कोण आले हें पाहण्याकरतां स्वतः मोरोपंतच बाहेर आले. अप्पासाहेब तर मोरोपंतांच्या चांगल्याच ओळखीचे होते. आम्हां दोघांना त्यांनीं अगत्यानें आपल्या बैठकीच्या खोलींत नेले व लोडाशीं बसविलें. खोलीला खिडक्या बऱ्याच होत्या. त्यामुळें हवा व सूर्यप्रकाश खोलीत मुबलक मिळत असे. खोलींत मोरोपंतांच्या बैठकीच्या समोरच कैलासवासी बाबासाहेबांचा मोठा फोटो लावलेला होता व त्या फोटोला ताज्या फुलांची माळ घातलेली दिसत होती.

बाबासाहेबांचा फोटो व तो मोरोपंतांच्या घरांत! ज्या म्हाताऱ्यानें मोरोपंतांच्या सुशील मुलीला बुडविलें त्या बाबासाहेबांचा फोटो येथें? मी मनांतल्या मनांतच संतापलों.

"असं पहा मोरोपंत! हे आमचे बापूराव, मास्तर आहेत हायस्कुलांत तिकडे मध्यप्रान्तांत, अन् कधींकधीं गोष्टीहि लिहितात ते. यांचं मत असं झालं

आहे, कीं बाबासाहेब हे फार दुष्ट पुरुष होते व त्यांनीं आपल्या कन्येचा केसानं गळा कापला—" अप्पासाहेब म्हणाले.

"छे-छे! अप्पासाहेब, त्या पुण्यपुरुषाची अशी निंदा करून पातकाचे धनी होऊं नका." मोरोपंत म्हणाले. त्यांचे दोन्ही डोळे अश्रूंनीं भरून आले.

मोरोपंत हे सुदृढ व सालस दिसले. पूर्ववयांत ते देखणे असावेत असें मला वाटले. या वेळी त्यांचें वय साठीच्या वर होते पण शरीरयष्टि मात्र कांटक दिसली.

"बापूराव," मोरोपंत माझेकडे वळून मला म्हणाले, "बापूराव, एखादी गोष्ट दूषणास्पद आहे ही गोष्ट माहीत असूनसुद्धां दुसऱ्याची अब्रू बांचावी म्हणून एखाद्या माणसानं ती केली व सर्व जन्मभर लोक नावं ठेवीत असतांना सर्व दोष आपल्या अंगावर घेऊन दुसऱ्या माणसाची अब्रू संभाळली तर अशा माणसाला तुम्ही काय म्हणाल?"

"अशा माणसाला मी खरोखरीचं स्वार्थत्यागी महात्मा म्हणेन." मीं उत्तर दिले.

"तर मग बाबासाहेब हेहि एक महात्माच होते!" मोरोपंतांनी उत्तर दिले.

कांही वेळ मोरोपंत स्वस्थचः वसले होते. ते बहुतकरून आपले विचार जुळवीत असावेत.

"तुम्हांला तर मग सांगतोच खरी हकीकत आता." मोरोपंत म्हणाले.

"तें असं झालं अप्पासाहेब, तीस बाबासाहेबांची नौकरी मी वर्ष केली. बाबासाहेबांची प्रथम-पत्नी वारली त्या वेळेस बाबासाहेब सारे पस्तिशीच्या आंत बाहेर होते. प्रकृति चांगली, मूलबाळ कांही नाहीं व पैसा मुबलक. मोठमोठ्या सुशिक्षित मुलीकडूनसुद्धा या स्थळाकरतां खटपट झाली; पण बाबासाहेबांचं आपल्या पहिल्या बायकोवर फार प्रेम होतं. त्यांनी पुन्हा लग्न करण्याचं साफ नाकारलं.

"बाबासाहेबांचा सारा वेळ वाचनांत, इस्टेटीच्या व्यवस्थेत व लोकोपयोगी कामं करण्यांत जाई. बाबासाहेबांनीं आपला एक पुतण्या आपलेकडे आणून ठेवला व त्यालाच ते आपल्या इस्टेटीचा मालक करणार होते.

"वसंतराव—बाबासाहेबांचा पुतण्या—हा देखणा पुरुष आहे. चुलत्यांची

मर्जी त्यानं पूर्णपणं संपादन केलेली होती. आपण बाबासाहेबांच्या पश्चात् येवढ्या मोठ्या इस्टेटीचे मालक होणार याची वसंतरावांना पूर्ण जाणीव होती.

" बाबासाहेबांनीं वसंतरावाला पुण्याच्या डेक्कन कॉलेजांत शिकायला ठेवलं होतं. सुटीचे दिवसांत वसंतराव बाबासाहेबांचेकडे येत असे."

" बाबासाहेबांच्या वाड्यामागं एका लहान घरांत मी राहत होतों. पगार कमी व माझा प्रपंच मोठा असल्याकारणानं आमच्या प्रभावतीचं लग्न लवकर करणं मला जुळलं नाहीं. आमच्या कुटुंबाचा फार आग्रह, की प्रभावतीला उत्तम स्थळींच द्यायची; पण माझ्यासारख्या गरिबाला आपली मुलगी उत्तम स्थळीं देणं कसं परवडणार ! या अशा कित्येक अडचणींमुळं आमच्या प्रभाचं लग्न राहिलं होतं. प्रभावतीला सतरा-अठरावं वर्ष लागलं होतं."

" एका सुटीत वसंतरावाचं आमच्या प्रभावतीकडे लक्ष गेलं. प्रभावतीचं बाबासाहेबांच्या वाड्यात जाणं-येणं असेच; पण वसंतराव आल्यापासून तिनं तिकडे जाऊं नये अशी आम्हीं तिला सूचना दिली होतीच.

" एके दिवशी संध्याकाळी मी वाड्यांतून परत येत होतों. वाड्याचे बागेंतील एका निर्जन भागांत मला आमची प्रभावती व वसंतराव बसलेले दिसले. वसंतरावानं प्रभावतीचं चुंबन घेतलेलं मी पाहिलं. तीं दोघेंहि आपआपल्या घराकडे गेली.

" हें दृश्य पाहून मी स्तंभितच झालों. लग्नापूर्वी एकमेकाना भेटणंसुद्धां इष्ट नाही अशी आमची जुनी कल्पना; आणि आज प्रत्यक्ष माझी मुलगीच लग्नापूर्वी एका तरुणाला चुंबन घेऊं देते ही कल्पनाच मला सहन होईना.

" मी तडक घरीं गेलों. एक वेळ वाटलं, की आपण आपल्या मुलीला खूप झाडावी व तिचं वाड्यामधें जाणं-येणं अजीबात बंद करून टाकावं.

" मी विचार करतों आहें येवढ्यांत मला बाबासाहेबांचं तांतडीचं बोलावणं आलं. त्यामुळं प्रभावतीला काय सांगायचं तें उद्यां सांगूं असं ठरवून मी वाड्यांत गेलों.

त्या दिवशीं बाबासाहेब मला फारच विचारमग्न दिसले.

" मोरोपंत, मी तुमच्याशीं एका महत्त्वाच्या विषयासंबंधानं बोलणार आहें. तुमच्या प्रभावतीची व आमच्या वसंताची मैत्री बरीच दाट होऊं पाहत आहे असं मला वाटतं. माझ्या मतानं वसंताचं लग्न एखाद्या खानदानीच्या व

श्रीमंत घराण्यांतल्या सुशिक्षित मुलीशीं व्हायला पाहिजे. तुम्हांला कसं वाट. बाबासाहेबांनीं मला विचारलं.

मी कांहींच बोललों नाहीं.

" यापुढील समाजव्यवस्था Class System वर उभारली जावी असं सध्यां तरी मला वाटतं. आतां वसंताचं व तुमच्या प्रभावतीचं लग्न होणं जर आपल्या मतानं अशक्यच असलं तर त्यांच्या मैत्रीलासुद्धां थोडासा पाय-बंदच पाहिजे. दोघंहि तरुण आहेत, व त्यांच्या मनांत जर विवाह करण्याचं आलं तर आपल्यासारख्या म्हाताऱ्यांना तें फारच जड जाईल. मोरोपंत, आमचा वसंता अजूनपर्यंत उच्छृंखलपणानं वागत नाहीं आहे ना ? "

" छे-छे ! " मी मध्येंच म्हणालो, " वसंतरावांची वागणूक अत्यंत सभ्य-पणाची आहे." मीं उत्तर दिलं. त्या वेळीं मी धडधडीत खोटं बोलत होतों व तें माझ्या पूर्णपणं ध्यानांतहि आलं होतं.

" तुम्ही सांगतां या गोष्टीवर माझा पूर्ण भरंवसा आहे. मोरोपंत, माझं वसंतवर फार प्रेम आहे व म्हणूनच वसंतानं, ज्या मुलीशी त्याचं लग्न होणं शक्य नाहीं अशा मुलीशीं जास्त मैत्री करूं नये असं मला वाटतं. वसंताची वागणूक मला आवडत नाहीं; पण त्यानं चांगला गृहस्थ व्हावं अशी माझी फार इच्छा आहे." बाबासाहेब मला म्हणाले.

त्यानंतर थोड्याशा इतर गोष्टी होऊन मी घरी आलों.

" त्या रात्रीं अप्पासाहेब, मला मुळीं झोंप येईना. वसंतराव आमच्या प्रभावतीच्या नादीं चांगलाच लागला आहे, व प्रभावतीची त्या गोष्टीला आड-काठी नाही हें प्रत्यक्ष मी डोळ्यांनी पाहिलं होतं, तरी पण असा कांही प्रकार नाही असं मी धडधडीत खोटं बोललों. असं मी कां केलं ? माझी सदसद्विवेक-बुद्धि मला म्हणूं लागली, 'मोरोपंत तूं फार स्वार्थी आहेस. तुला थोड्या खर्चांत श्रीमंत जांवई पाहिजे आहे; तुला मुलीचं हित पाहिजे आहे. पण त्याकरतां मेहनत किंवा खर्च करायला नको आहे. तुझ्या अशा करण्यानं तुझ्यावर पूर्ण विश्वास टाकणाऱ्या बाबासाहेबांच्यासारखा साधाभोळा गृहस्थ फसविला जातो आहे' !"

यावर माझं मन मला म्हणूं लागलं, 'छे-छे ! मोरोपंत, तूंच बरोबर आहेस. अरे, स्वार्थ नको आहे कोणाला ! स्वार्थ साधणं हा तर मनुष्यस्वभाव आहे.'

" कांहींहि असो, वसंतराव व आमची प्रभावती यांच्या प्रेमचेष्टांकडे मीं त्या वेळीं जाणूनबुजून दुर्लक्ष केलं.

" माझ्या लबाडीचं प्रायश्चित्त मला लवकरच मिळालं. आमची प्रभावती नाडली गेली आहे हें आमच्या कुटुंबाच्या लक्षांत आलं व तिच्याकडून तें मला कळलं.

" यासंबंधानं आम्हीं दोघांनींहि प्रभावतीपाशीं चौकशी केली. तेव्हां आमचा संशय खरा असल्याचं आम्हांला दिसून आलं !

" याच सुमारास वसंतरावांचीं आमच्या प्रभावतीला येणारीं पत्रं बंद झाली होतीं. आम्हांस फार काळजी वाटूं लागली.

" मला अगदीं वेड्यासारखं वाटूं लागलं. या गोष्टीची पुरी शहानिशा करण्याकरतां मी कांहीं दिवसांची सुटी घेऊन वसंतरावांना भेटायला गेलों. वसंतरावांनीं या बाबतींत आपल्या कानांवर हातच ठेवलं ! प्रभावतीनंच आपल्याला कित्येक अयोग्य सूचना केल्या होत्या; पण बाबासाहेबांना असं लग्न पसंत पडणार नाही हें मला पूर्णपणं माहीत असल्यामुळं मी प्रभावतीच्या म्हणण्याला कबूल झालों नाही, व यामुळं ती माझ्यावर हें भलतंच बालंट घेत आहे असं वसंतरावांनीं मला स्पष्टपणानं सांगितलं. "

" वसंतराव असे उलटतील असं मला वाटलं नव्हतं; पण ते उलटले त्याला काय करायचं ? वसंतरावांच्या वागणूकींत गैरशिस्त असं कांहींच नाहीं असें मीच स्वतः बाबासाहेबांना सांगितलं नव्हतं का ? माझ्या स्वार्थीपणाचं मला पुरेपूर प्रायश्चित्त मिळत होतं.

" शेवटीं मीं वरील भयंकर हकीकत बाबासाहेबांना सांगितली.

" मोरोपंत, तुम्हीच मला सांगितलं होतंत, कीं वसंताच्या वागणुकींत गैर असं कांहीं नाही, व फक्त तुमच्यावर विश्वास ठेवून मी स्वस्थचित्त होतों." बाबासाहेब मला म्हणाले.

" मीं चटकन् बाबासाहेबांचे पाय धरले व माझा स्वार्थीपणा अगदीं लाजलज्जा न धरतां त्यांचेपाशीं कबूल केला."

बाबासाहेबांनीं वसंतरावांना तार करून घरीं बोलाविलें व माझ्यादेखत या बाबतींत चौकशी केली. याहि वेळेस वसंतरावांनीं कानांवर हात ठेवले.

" मला वाटतं वसंत, तूं प्रभावतीशीं लग्न करावंस. तुला खूप श्रीमंताची

मुलगी बायको मिळावी असं मला वाटत होतं; पण प्राप्त परिस्थितींत तूं प्रभावतीशीं लग्न करावंस असं मला वाटतं." बाबासाहेब म्हणाले.

"छे-छे ! बाबासाहेब, प्रभावतीसारख्या बेछूट मुलीशीं लग्न करून आपल्या घरंदाज कुळाच्या कीर्तीला गालबोट लावून घ्यावं असं मला वाटत नाहीं. प्रभावतीसारखी चवचाल मुलगी सून झालेली आपल्याला आवडेल का ?" वसंतरावांनीं प्रश्न केला.

"वसंत ! प्रभावती चवचाल आहे का ?" बाबासाहेबांनी वसंतरावाला विचारलं.

"होय." वसंतरावांनीं बेदरकारपणानं उत्तर दिलं.

"प्रभावती, तुझं म्हणणं काय आहे ?" बाबासाहेबांनी विचारलं.

"बाबासाहेब, मी अत्यंत स्वार्थी होतें. मला या इस्टेटीची मालकीण व्हायचं होतं म्हणून मी वसंतरावांना उत्तेजन दिलं हें खरं; पण मी चवचाल मात्र नाही हो !" प्रभावतीनं उत्तर दिलं.

"मग वसंत, तूं प्रभावतीशीं विवाह करायला तयार नाहीस ?" बाबासाहेबांनी विचारलं.

"मुळींच नाहीं !" वसंतरावांनी ठांसून उत्तर दिलें, "जसं करावं तसं भरावं ! प्रभावतीच्या पापाची जिम्मेदारी घ्यायला मी तयार नाही !"

"हं ! 'जसं करावं तसं भरावं'- होय ! वसंत, तूं म्हणतोस तें खरं आहे. तुझी वागणूक चांगली नाहीं हें मला माहीत असतांना मी तुला जवळ केला ही माझी फार मोठी चूक झाली. परमेश्वरानं खैर केली, की मी तुला दत्तक घेतला नाहीं. तुझ्यासारखा नीच मनुष्य माझ्या इस्टेटीचा मालक होण्यास अपात्र आहे. तुझ्या शिकण्यापुरता पैसा मात्र मी तुला देईन. जा येथून तूं आतां !"

बाबासाहेब अशा तऱ्हेनं वागतील असं वसंतरावांना वाटत नव्हतं; पण आतां कांहीं इलाज नव्हता. वसंतराव तेथून निघून गेले, व त्याच दिवशीं संध्याकाळीं पुण्याला रवाना झाले.

दुसऱ्या दिवशीं दुपारीं बाबासाहेबांनीं मला व प्रभावतीला खोलींत बोलाविलं.

"मोरोपंत, मला एकट्या प्रभावतीशीं बोलायचं आहे. आजपर्यंत तिच्याशीं बोलतांना मला कधीं संकोच वाटला नाहीं व तुमच्या परवानगीची